






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
   वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






संपादक – वि. स. वाळिंबे

म. सा. प. अंक

अंक – २६२ – जुलै – सप्टेंबर १९९२

" २६३ – ऑक्टोबर – ~~नोव्हेंबर~~ डिसेंबर ९२ दिवाळी अंक

" २६४ – जानेवारी – मार्च ९३

" २६५ – एप्रिल – जून ९३

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २६२, जुलै-सप्टेंबर १९९२

*

**संपादक :** वि. स. वाळिंबे

संपादन समिती : प्रा. म. द. हातकणंगलेकर; डॉ. वि. भा. देशपांडे
प्रा. विजय कसबेकर, हरी नरके, संतोष शेणई

*

**मुखपृष्ठ :** रवि मुकुल

**या अंकाची किंमत : २० रुपये**

वार्षिक वर्गणी (संस्थांसाठी ७५ रुपये)

आजीव सदस्य शुल्क ५०० रु. वार्षिक सदस्य शुल्क ५० रु.

*

(म. रा. साहित्य संस्कृती मंडळ पुरस्कृत)

मुद्रक - प्रकाशक : डॉ. ग. ना. जोगळेकर, कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३० (दूरभाष : ४४२९६३)

अक्षरजुळणी : प्रमोद प्रिंटर्स, ११२०, सदाशिव पेठ, पुणे ३०.

मुद्रणस्थळ : स्मिता प्रिंटर्स, १०१९, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०.

अनुक्रमणिका

## या अंकात



□

# संपादकीय

## साहित्य अकादमी आणि तिची पारितोषिके

साहित्य अकादमी सध्या गंभीर आरोपाच्या आणि तीव्र आक्षेपांच्या वादळात सापडलेली आहे.

सर्व भारतीय भाषांमधील वाङ्मयाचा विकास साधण्याच्या व्यापक उद्देशाने राष्ट्रीय पातळीवर कार्यरत असलेली यंत्रणा म्हणून 'अकादमी'ची मातब्बरी मोठी

त्यामुळे साहजिकच तिच्या वतीने प्रतिवर्षी दिल्या जाणाऱ्या पुरस्कारांना वेगळी प्रतिष्ठा प्राप्त झालेली आहे

साहित्य अकादमीचे पारितोषिक लाभले की आपला विशेष गौरव झाला असे लेखकांना वाटते.

हे पुरस्कार निखळ वाङ्मयीन गुणवत्तेच्या निकषावर दिले जावेत अशी सर्वांची अपेक्षा असते

परंतु नेहमीच तसे घडते असे नाही.

आपल्या वर्गातल्या व्यक्तींची वर्णी लावण्याचा मोह उच्चपदस्थांना अधूनमधून होत असतो

तसे झाले की हे पारितोषिक संबंधित व्यक्तीला कोणाच्या आग्रही पुढाकारामुळे मिळाले, याची साहित्यिक वर्तुळात जाणकारांकडून कुत्सित कुजबूज सुरू होते

या वेळी तर ही चर्चा संबंधित वर्तुळामधल्या टीका-टिप्पणींपुरती मर्यादित राहिलेली नाही. दिल्लीतल्या पंजाबी भाषक साहित्यिकांमध्ये जोरदार कोलाहल उफाळून आलेला आहे.

पंजाबी भाषेतील सर्वोत्कृष्ट ग्रंथाचे पारितोषिक चंदीगड येथील कवी हरींद्रसिंग मेहबूब यांना त्यांच्या 'जनान दी रात' या कवितासंग्रहाला देण्यात आले.

हा कवितासंग्रह तसा जाडजूड आहे. म्हणजे सव्वाआठशे पृष्ठांचा. त्यातल्या शेवटच्या आठ-दहा पानांमध्ये 'नींदन दा कातल' या शीर्षकाची कविता आढळते.

केंद्र सरकारने काही वर्षांपूर्वी अमृतसर येथल्या सुवर्णमंदिरात जी लष्करी कारवाई

केली तिच्यासंबंधी या कवितेत कवीने आपले मनोगत व्यक्त केले आहे.

कवितेमध्ये श्रीमती इंदिरा गांधी यांचा प्रत्यक्ष नामोल्लेख नसला, तरी तीत 'चेटकीण', 'नागीण' आदी निंदाव्यंजक निर्देश इंदिरा गांधी यांच्या संदर्भात करण्यात आल्याचे वाचकांना स्पष्ट जाणवते. एवढेच नव्हे, तर जर्नेलसिंग भिंद्रनवाले आणि इंदिराजींचा एक मारेकरी बिआंतसिंग यांचा हरींद्रसिंग मेहबूब यांनी त्या कवितेत 'हुतात्मे' असा गौरव केलेला आहे.

हे कोणाच्या तरी लक्षात आले आणि त्यामुळे दिल्लीतल्या युवक काँग्रेसच्या कार्यकर्त्यांनी रवींद्र भवनवर जाऊन साहित्य अकादमीचा धिक्कार करणाऱ्या घोषणा दिल्या. काही अतिसंतप्त कार्यकर्त्यांनी तर 'अकादमी'चे सहसचिव ओ. पी. शर्मा यांना बाहेर खेचून त्यांच्या तोंडास काळे फासले.

या प्रकारामुळे 'जनान दि रात' या काव्यसंग्रहाला पारितोषिक देण्याची शिफारस कोणी केली या संबंधीच्या चर्चेला उधाण आले.

परीक्षक समितीत तिघेजण होते– श्रीमती अमृता प्रीतम, प्रा. अमरिकसिंग आणि डॉ. जसबीरसिंग अहलुवालिया.

यांपैकी अमरिकसिंग आणि अहलुवालिया म्हणतात की 'आम्ही या कवितासंग्रहाची शिफारस केलेलीच नव्हती. केवळ इंदिरा गांधी यांच्यासंबंधी निंदागर्भ उल्लेख आहे म्हणून नव्हे; तर हरींद्रसिंग मेहबूब यांच्या या संग्रहातल्या साऱ्याच कविता अत्यत सामान्य दर्जाच्या आहेत, असे आमचे मत होते.'

तिघांपैकी दोघा परीक्षकानी प्रतिकूल मत नोंदविले असतानाही. 'जनान दी-रात' हा 'संग्रह पारितोषिकाचा मानकरी ठरला.

कारण काय ?

तर अमृता प्रीतम याचा एकटीचा तसा जोरदार अनुरोध असे पहिल्यांदाच घडले आहे असे नाही.

पंजाबी साहित्यसृष्टीशी संबंधित असलेली मंडळी सांगतात की अमृता प्रीतम यांची १९८८ मध्ये परीक्षक समितीच्या निमंत्रक म्हणून नेमणूक झाली आणि तेव्हापासून गेली तीन वर्षे हेच चाललेले आहे.

पंजाबी भाषेसंबंधीचे पारितोषिक त्या म्हणतील त्याच लेखकाला दिले जाते.

आपण म्हणू तसेच अकादमीत घडते हे दाखवून देण्याने अमृता प्रीतम यांचा अहंभाव सुखावतो आणि त्यांना दुखावण्याची हिंमत कोणीही दाखवीत नाही

अमृता प्रीतम या इंदिराजींना मानणाऱ्या इंदिराजींमुळेच त्यांची राज्यसभेवर नियुक्ती करण्यात आली होती असे असूनही त्यांनी 'निंदन दा कातल' सारखी आक्षेपार्ह कविता

असलेल्या संग्रहाची शिफारस कशी केली ?

त्यांचा खुलासा असा : 'पारितोषिकाची निवड करण्याच्या वेळी मी आजारी पडले होते. त्यामुळे हरींद्रसिंग मेहबूब यांचे पुस्तक वाचू शकले नाही.'

म्हणजे जे पुस्तक अमृता प्रीतम यांनी, त्यांच्या स्वतःच्याच म्हणण्याप्रमाणे वाचलेले नाही, त्याची त्यांनी, इतर दोघा परीक्षकांचा विरोध असतानाही, पारितोषिकासाठी निवड केली.

या संबंधात श्रीमती अजित कुंवर या 'खाना बदोष' बद्दल १९८५ मधल्या अकादमी पारितोषिकाच्या विजेत्या लेखिका म्हणतात, "एखादी व्यक्ती आयत्या वेळी आजारी पडली, तर त्यात तिचा काही दोष नाही. परंतु एखादे पुस्तक न वाचताच, त्याला पारितोषिक मिळाले पाहिजे, असा हट्ट धरणे निश्चितच आक्षेपार्ह आहे."

प्रभज्योत कुंवर या अशाच आणखी एक 'अकादमी' पारितोषिकाच्या मानकरी. त्यांना या संबंधात विचारण्यात आले, तेव्हा त्या उद्गारल्या, 'त्या बिचाऱ्या अधिकाऱ्यांचे तोंड कशाला काळे केले ? कोणाच्या चेहऱ्याला काळे फासायचे असेल तर ते अमृता प्रीतम यांच्या तोंडालाच फासायला हवे होते. न वाचता पुस्तकाची शिफारस करणे निखालस चुकीचे आहे. माझ्या आजारपणामुळे हे काम दुसऱ्या कोणाकडे तरी सोपवा, असे अमृता प्रीतम यांनी कळवायला हवे होते.'

साहित्य अकादमीशी आणि तिच्या कार्यपद्धतीशी परिचित असणारे ख्यातनाम लेखक खुशवंतसिंग यांची या संदर्भातील प्रतिक्रिया तर अधिकच परखड आहे.

ते म्हणतात, "तिघा परीक्षकांपैकी एकानेही 'जनान दी रात' हे पुस्तक वाचले असेल, असे मला मुळीच वाटत नाही. आता कोणी काहीही म्हणो, अमृता प्रीतम यांनी पुस्तकाचे नाव सुचविले आणि इतर दोघांनी होकार दिला, असेच घडले असले पाहिजे."

या साऱ्या प्रकारामुळे झाले काय, तर साहित्य अकादमीची प्रतिष्ठा उणावली.

आणि याला जबाबदार कोण ?

अकादमीशी संबंधित असलेले उच्चपदस्थ साहित्यिक.

म्हणूनच हा मामला अधिक गंभीर मानला जात आहे.

### 'कुलवधू'चा सुवर्णमहोत्सव

१८८० ते १९३० ही पन्नास वर्षे म्हणजे संगीत मराठी रंगभूमीचा सुवर्णकाळ. अण्णासाहेब किर्लोस्कर, गोविंद बल्लाळ देवल, राम गणेश गडकरी, कृ. प. खाडिलकर, प्रभृती नाटककारांनी आणि बालगंधर्व, केशवराव भोसले, दीनानाथ मंगेशकर, प्रभृती गायक-अभिनेत्यांनी संगीत मराठी नाटक घराघरांपर्यंत पोहचवले, महाराष्ट्राच्या सांस्कृतिक

जीवनात रंगभूमीला आदराचे स्थान प्राप्त करून दिले. त्या कालखंडातील स्वरवैभवाने रंगलेल्या रात्रींच्या आठवणी अजूनही ऐकायला-वाचायला मिळतात.

१९३० च्या मुमाराला चित्रपट बोलू लागले आणि तेव्हापासून मराठी रंगभूमीचा वैभवकाळ ओसरू लागला. मराठी संगीत रंगभूमी लुप्तप्राय होते की काय, अशी साधार भीती वाटू लागली.

श्री. मो. ग. रांगणेकर यांचे 'कुलवधू' हे संगीत नाटक २३ ऑगस्ट १९४२ रोजी रंगभूमीवर आले आणि 'नाट्यनिकेतन'च्या या नाट्यकृतीने आधुनिक संगीत मराठी रंगभूमीची पायाभरणी करण्याचे महत्त्वपूर्ण कार्य पार पाडले. मास्तर कृष्णराव फुलंब्रीकर यांची संगीतरचना आणि श्रीमती ज्योत्स्ना भोळे यांचा मोहक स्वराविष्कार यामुळे 'कुलवधू' नाटकाला प्रचंड लोकप्रियता लाभली. संगीत मराठी रंगभूमीच्या संदर्भात नाटककार, निर्माते-दिग्दर्शक मो.ग. रांगणेकर यांनी आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी केलेल्या कार्याचा गौरव म्हणून गेल्या २३ ऑगस्टला 'कुलवधू'चा सुवर्णमहोत्सव मोठ्या उत्साहाने आणि आपुलकीने पुण्यात साजरा करण्यात आला. त्या सत्कार-समारंभाच्या निमित्ताने रसिकांना पुन्हा एकदा त्या जुन्या कालखंडाचे प्रसन्न दर्शन घडले.

मध्यंतरी खंडित झालेली संगीत नाटकांची परंपरा 'कुलवधू' पासून पुनश्च जोमाने सुरू झाली आणि गेल्या पन्नास वर्षांमध्ये मराठी रसिकांना नव्या नाटककारांनी आणि कलाकारांनी अनेक उत्तम नाट्यकृती सादर केल्या.

### अभिनंदन

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे भूतपूर्व अध्यक्ष प्रा. ग. प्र. प्रधान यांनी गेल्या २६ ऑगस्टला एकाहत्तराव्या वर्षात पदार्पण केले. त्या निमित्ताने त्यांनी साहित्य परिषदेस एक हजार रुपये किमतीचे ग्रंथ भेट देऊन परिषदेसंबंधीची आपली आत्मीयता व्यक्त केली. कार्याध्यक्ष डॉ. म. वि. गोखले यांनी परिषदेच्या वतीने ग्रंथांचा स्वीकार केला आणि या भेटीबद्दल प्रा. प्रधान यांचे आभार मानले.

प्रा. प्रधान सुपरिचित आहेत ते राजकीय आणि सामाजिक कार्यकर्ते म्हणून. १९४२ मधल्या 'भारत छोडो' आंदोलनापासून त्यांच्या या क्षेत्रातील कार्याला प्रारंभ झाला. प्रजा समाजवादी पक्ष आणि राष्ट्रसेवादल ही प्रा. प्रधान यांची प्रमुख कार्यक्षेत्रे. महाराष्ट्र विधानपरिषदेवर ते लागोपाठ तीन वेळा पदवीधर मतदारसंघातून निवडून आले होते. गेल्या काही वर्षांपासून ते 'साधना' साप्ताहिकाचे संपादन करीत आहेत. या सगळ्या कार्यामध्ये व्यग्र असतानाही प्रा. प्रधान यांनी सातत्याने वैचारिक ग्रंथनिर्मिती केली. 'भारतीय स्वातंत्र्यसंग्रामाचे महाभारत' हा त्यांचा ग्रंथ विशेष गाजला, तशीच 'साता उत्तराची कहाणी'

ही राजकीय पार्श्वभूमी लाभलेली कादंबरीही.

एक्काहत्तराव्या वाढदिवसानिमित्त प्रा. ग. प्र. प्रधान यांचे अभिनंदन आणि शुभेच्छा.

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यकारिणीचे सदस्य श्री. अरुण खोरे यांना आचार्य अत्रे विकास प्रतिष्ठानच्या वतीने दिला जाणारा पुरस्कार लाभला, याबद्दल त्यांचे अभिनंदन.

श्री. खोरे 'लोकसत्ता'च्या पुणे आवृत्तीचे प्रमुख वार्ताहर म्हणून काम करीत असून उत्कृष्ट पत्रकारितेसाठी त्यांची या पुरस्कारासाठी निवड झाली. मध्यंतरी श्री. खोरे युरोपच्या दौऱ्यावर गेले होते. तेथील महत्त्वाची निरीक्षणे टिपणारा ग्रंथ त्यांनी लिहिला आहे. तसेच 'महाराष्ट्र विकासाचे नवे पर्व' या ग्रंथाचे ते संपादक आहेत.

आचार्य अत्रे यांच्या जन्मदिनी म्हणजे गेल्या १३ ऑगस्टला सासवड येथे श्री. खोरे यांना समारंभपूर्वक हा पुरस्कार देण्यात आला.

**– वि. स. वाळिंबे.**



अनुक्रमणिका

अरविंद वामन कुलकर्णी

# कविता शिकविणे : एक तारेवरची कसरत

कविता शिकविणे, ही एक अतिशय कठीण आणि एका अर्थी अप्रामाणिक गोष्ट आहे. अप्रामाणिक अशा अर्थाने की आपण कविता जशी अनुभवितो तशी ती शिकविता येत नाही. खूप मोडतोडी आणि खूप तडजोडी करूनच जे अनुभविले ते आपण वर्गात विद्यार्थ्यांपुढे मांडत असतो, तिथे अनेक अवधानेही आपणाला सांभाळावी लागत असतात.

शिकविणे म्हटले की सोय-गैरसोय आलीच आणि सोय-गैरसोय म्हटले की तडजोडही आलीच. शिकविणे ही तशी एक सापेक्ष उपयुक्ततावादी प्रक्रियाच आहे. 'आस्वादासाठी आस्वाद' या शब्दप्रयोगाशी 'शिकविण्यासाठी शिकविणे' हा शब्दप्रयोग समकक्ष होऊ शकत नाही. कारण आस्वादप्रक्रियेत फक्त 'मी' या घटकाचेच वर्चस्व असते. 'शिकविण्या'त समोरच्या विद्यार्थ्यांपासून संस्था किंवा व्यवस्थापनाच्या मर्जी-गैरमर्जीपर्यंत अनेक 'म्येऽतर' घटक समाविष्ट झालेले असतात. तेव्हा साहित्य आणि त्यातही कविता शिकविणे, ही एक अष्टावधानी कसरत ठरते. आस्वाद आणि अध्यापन यांची सांगड घालताच येत नाही, असे नाही. पण त्यासाठी आपणास रूळ बदलावे लागतात. अध्यापनाची एकूण धाटणी प्रकट आत्मचिंतनाच्या पातळीवर आणावी लागते. आणि ती विद्यार्थ्यांच्या गळी 'अध्यापना'च्या शर्करेत अवगुंठित करून उतरवावी लागते. तेव्हा ज्याला आपण चांगला शिक्षक म्हणतो, तो या कौशल्यात प्रवीण असावा लागतो.

कविता हे शब्दांच्या साहाय्याने साधल्या जाणाऱ्या साहित्यनिर्मितीतील एक अतिशय नाजूक क्षेत्र (Sensitive Field) मानले जाते. वावगा, परिहार्य किंवा पुनरुक्त तपशील या क्षेत्रात चटकन उघडकीस येतो. विचार, तर्क वा ज्ञान यांची बौद्धिक मिरासदारी प्रस्तुत क्षेत्रात फारशी चालत नाही. इतर साहित्यप्रकारापेक्षा खूपच मोठ्या प्रमाणात निर्माता आणि निर्मिती यांतील अद्वैत या क्षेत्रातच जाणवते. अनुभव-घटकांचा सूक्ष्म पारदर्शी वेध आणि त्यांची तर्कातीत नियमांनुसार फेररचना कवितेइतकी इतरत्र आढळत नाही. अल्पविस्तारात फार व्यापक आशय पेलण्याची क्षमता कवितेतच असते याबद्दल दुमत नाही. अन्तर्गत आणि बहिर्गत असा निःसंदिग्ध नेमका लवचिकपणा हे कवितेचेच मोठे वैशिष्ट्य आहे. यामुळे कवितेचे लेखनतंत्र वा आविष्कारतंत्र अस्तित्वात येऊ शकत नाही. त्यामुळे कवितेचा गोफ उलगडण्याचा नेमका असा मार्ग उपलब्ध होत नाही. शेवटी कविता ही एक प्रतीती असते, हे



अनुक्रमणिका

लक्षात घेऊन या प्रतीतीलाच शब्दरूप द्यावे लागते. आणि शिकवायचे म्हटल्यावर शिकविण्याच्या प्रयोजनाचे भान ठेवून अशा शब्दरूपांची मांडणी साधावी लागते.

वर केलेल्या उल्लेखावरून हे ध्यानी येईल की, कविता हा एक सगुण असूनही निर्गुण किंवा साकार असूनही निराकार असा साहित्यप्रकार आहे. त्यामुळेच त्याच्या अनेक पातळ्यांवरून केल्या गेलेल्या अनेक व्याख्याही दिसतात. 'रमणीय अर्थप्रतिपादक शब्दसमूह', 'एखाद्या भावनेचा आटोपशीर आविष्कार', 'प्रबळ भावनेची उत्स्फूर्त अभिव्यक्ती'– इथपासून तो 'विविध प्रतिमांची एक सुसंगत व अर्थपूर्ण संघटना' किंवा 'विविध संवेदनांचा एक सुव्यवस्थित लयबद्ध सर्जक गुच्छ' इथपर्यंत केल्या जाणाऱ्या व्याख्या आपल्या परिचयाच्या आहेत. आणि एकूणच कवितेचा विविधरूपधारिणी पिंड लक्षात घेतल्यावर अशा व्याख्यांच्या चिमटी अपुऱ्या पडायला लागतात, हेही आपल्या परिचयाचे आहे. अशा व्याख्यांच्या भिंगातून कविता तपासता येतच नाहीत असे नाही. पण त्यासाठी केवढी कसरत करावी लागते याचे प्रात्यक्षिक स्वतः बा. सी. मर्ढेकर यांनीच 'खेड्यातील रात्र' या बालकवींच्या कवितेच्या निमित्ताने दिलेले आहे. हे सारे सांगण्याचा उद्देश एकच आहे, तो म्हणजे शिकविण्यासाठी कवितेला भिडण्याचा एखादा राजमार्ग सांगणे कठीण आहे हे सांगणे. याबाबतीत एखादी भूमिका किंवा एखादा पवित्रा हमखास आहे असे मानणे, म्हणजे बाहत्तर रोगांवर एखादा अक्सीर इलाज खरोखरच असू शकतो हे मानण्यासारखे होईल.

पण कविता हा साहित्यप्रकार अभ्यासक्रमात निवडला जातो आणि विद्यार्थ्यांना तो शिकवावा लागतो, या वस्तुस्थितीकडे दुर्लक्ष करता येत नाही. त्यासाठी सामाजिक, प्रेम, काव्य वा कलाविषयक, निसर्ग, राजकीय, कौटुंबिक अशी विषयानुरूप वर्गीकरणे केवळ व्यावहारिक सोय म्हणून पत्करावी लागतात. एकदा असे वर्गीकरण पत्करले की गोविंदाग्रजांची प्रेमकविता, तांब्यांची प्रेमकविता, माधव ज्यूलिअनांची प्रेमकविता अशी कवीवार विवेचने जशी सुलभ जातात तशीच 'प्रेम आणि मरण,' 'काढ सखे गळ्यातील', 'इतुके आलो जवळ जवळ की' अशी कवितावार विवेचनेही सुलभ जातात. सामाजिकतेचे म्हणून काही एक दालन कल्पिले की मग त्या अनुषंगाने केशवसुत, बी, कुसुमाग्रज इत्यादी कवींची वर्गवारी आपण नेमकी व निश्चित करू शकतो. वर्गीकरणातील वर्गविशेष जसे एखादी कविता शिकविताना मदत करतात, तसेच कवितेचे प्रकारविशेषही मदत करतात. भावकाव्य, गीत, सुनीत, खंडकाव्य, नाट्यगीत असे कवितेचे लेखनानुरूप प्रकार कल्पून विवेचन करणेही विद्यार्थ्यांना शिकविताना सुलभ जात असते. याशिवायही कवितेचे पंथ वा संप्रदायदृष्ट्या स्पष्टीकरण करता येते. तेही शिक्षकाला व विद्यार्थ्यांना कविता उलगडण्याच्या बाबतीत मदत करते. अभिजातवादी, स्वच्छंदवादी, वास्तववादी,

अतिवास्तववादी, इत्यादी जे काव्यात मानले जाणारे पंथ वा संप्रदाय आहेत, त्यांच्या निकषांच्या आधारावर कवींची व कवितांची तपासणी करता येते. चंद्रशेखरांची कविता अभिजातवादाच्या निकषावर, केशवसुत-तांबे-गोविंदाग्रज-बालकवी यांची कविता स्वच्छंदवादाच्या निकषावर, शरच्चंद्र मुक्तिबोधांची व बा. सी. मर्ढेकरांची वास्तव व अतिवास्तववादाच्या निकषावर तपासली जाऊ शकते आणि तिचे अंतरंग बऱ्याच प्रमाणात विद्यार्थ्यांपुढे प्रकट करणे शक्य होते.

आता वर्ग, प्रकार व पंथ यांच्या सापळ्यात प्रत्येक कविता सापडतेच असे नाही; पण सर्वसाधारणपणे शिकविण्याच्या तंत्राची साधने म्हणून हे सापळे उपयोगास येतात असे म्हणता येईल. जिथे हे सापळे निरुपयोगी ठरतात तिथे मात्र त्या त्या कवितेचा केवळ कविता म्हणूनच विचार करावा लागेल. तिथे सामान्यतः विवक्षित अनुभव आणि त्याचा आविष्कार यांच्यातील संबंध तपासावे लागतात. केंद्र आणि घटक नक्की करून त्यांच्या संबंधाचा शोध घेत कवितेचे विश्लेषण करावे लागते.

कवितेच्या जातीचा विचार करू जाता अध्यापनातील अडचणी फार वाढतात, असा अनुभव आहे. आशय व अभिव्यक्ती यांच्या एकत्र रूपावरून कवितेच्या दोन जाती पडतात असे म्हणता येईल. आणि कवितेमागील अनुभवच कवितेची जात निश्चित करीत असतो, असेही म्हणता येईल. एकपदरी, साधी (simple) कविता आणि अनेकपदरी, व्यामिश्र (complex) कविता अशा या दोन जाती दिसतात. केवळ अनुभवाच्या साधेपणावरून किंवा व्यामिश्रतेवरून कविता चांगली किंवा वाईट ठरत नाही, हे मुद्दाम लक्षात घ्यायला हवे. अनुभव कसाही असला तरी कविता ही कविता म्हणून चांगली वा वाईट असू शकते. शिवाय सूचकता, ध्वनी किंवा अनेकार्थता हे विशेष कवितेचे किंवा त्यामागील अनुभवाच्या व्यामिश्रतेचे द्योतक असतात असे नाही. उदा. बालकवींची 'औदुंबर' ही कविता. तिथे दि. के. बेडेकर बालकवींच्या एका तटस्थ सुखदुःखातीत मनोवस्थेचा संदर्भ लावतात, तर स. शि. भावे सामाजिकतेचा– विशेषतः हिंदू समाजातील विधवेच्या दुःस्थितीचा संदर्भ लावतात. प्रभाकर पाध्यांनी तर औदुंबराचे कालपुरुषाशी समीकरण केलेले आहे.

अर्थात, प्रो. छत्र्यांचा 'केसरी' किंवा 'बोगद्यात' किंवा अगदी 'अहिनकुल' सुद्धा– यांसारख्या रूपकात्मक रचनांत अर्थाचे दृश्य आणि अदृश्य पदर तर्कशुद्धरीत्या एकमेकांशी समांतरपणे वावरत असतात. तसा प्रकार 'औदुंबर' किंवा 'चाफा' यांसारख्या रचनांत नसतो. रूपकाचे दोन्ही पदर उलगडले की गणित शिकवावे तसे रूपकात्मक कविता शिकविणे सहज जमते, पण 'औदुंबर', 'पारव्यास', 'चाफा' यांसारख्या कवितांबाबत आपल्याला आपल्या कल्पनाशक्तीला जरा ताण द्यावा लागतो. थोड्याफार निर्मितिक्षम डोळ्यांनीच अशा कविता आपल्या मनावर करीत असलेले संस्करण न्याहाळावे लागते. हे जमले की

अशा कविता स्पष्ट करणे फारसे अवघड जात नाही. कारण त्यामागील अनुभवांचे स्वरूप एकपदरीच असल्याने ते आपणास तसे 'गोंधळलेल्या अन् चिंचोळ्या' आडमार्गावर नेत नाही.

खरा शिकविण्याच्या बाबतीत प्रश्न उभा राहतो तो व्यामिश्र अनुभव संक्रान्त करू पाहणाऱ्या कवितांच्या बाबतीतच. कारण इथे या अनुभवांचे दृश्य ऐंद्रिय रूपही चक्रावून टाकणारे– व्यामिश्र म्हणावे असेच असते. वानगीदाखल मर्ढेकरांच्या किंवा विंदा करंदीकरांच्या काही कविता इथे लक्षात आणाव्यात.

शिकवायचे म्हटल्यावर एरव्हीसुद्धा कवितेचे किंवा आशयाभिव्यक्तीचे विश्लेषणच करावे लागते. पण व्यामिश्र आशयाभिव्यक्तीच्या बाबतीत एका संश्लेपित रचनेचे विश्लेषण करायचे असल्याने अडचणी वाढत असतात. अशा कवितेतील घटकावयवांची जुळणी कसल्याही तार्किक नियमांना धरून झालेली नसते. पण शिकविताना तर्काचा आधार घेऊनच ती सुरू करावी लागते. मुळात अशा कवितेची नेमकी नस सापडणे आवश्यक असते. त्यासाठी आपलीही काही पूर्वतयारी– विशेपतः अशा कवितांची आधी ओळख असावी लागते. प्रत्येक कवीची अनुभव घेण्याची आणि तो व्यक्त करण्याची एक खास धाटणी असते. काही काही काळात अशा धाटणीचे नमुनेही (type) तयार झालेले दिसतात. याची माहिती आपल्याला नसेल तर मुळात शिकविण्यासाठी समोर आलेल्या कवितेचा 'अर्थ' आपल्यालाच लागणे शक्य होणार नाही.

अशा कवितांच्या बाबतीत 'अर्थ' हा शिक्षकाला नेहमीच सतावणारा भाग आहे. व्यामिश्र वळणाच्या नवकवितेबाबत मागे एकदा प्रा. रा. श्री. जोग यांनी 'मुख्यार्थबोधाची कैफियत' सादर केली होती. त्याला प्रा. गंगाधर गाडगीळ यांनी उत्तरही दिले होते. या संदर्भात इथे इतकेच लक्षात घेता येईल की, कवितेत मुख्यार्थ, लक्ष्यार्थ किंवा व्यंग्यार्थ ही एक तशी तर्काचा हात धरून उभी राहणारीच साखळी आहे. कवितेचा आस्वाद घेताना शब्दांचा व शब्दसमूहाचा अर्थदृष्ट्या इथे जो विचार होतो तो एका तर्कजन्य शिस्तीतच. अशा अर्थाच्या पातळीवरच इथे शब्दांचे अस्तित्व लक्षात घेतले जाते. एक कलाकृती म्हणून कविता या भाषिक संघटनेत तर्कातीत अशा संघटनातत्त्वांचाही आधार घेतला जात असतो हे लक्षात घेतले जात नाही; पण शब्दांची साधी जुळणीही– अर्थ वजा करून– त्या कवितेतील 'अर्था' ला वेगळे परिमाण देत असते. उदा.बालकवींची शब्दजुळणी अनेक ठिकाणी 'अर्था'ला संवेदनांचे परिमाण यशस्वीपणे देताना दिसते. किंवा आजच्या वासंती मुझुमदार यांच्या कवितेतील प्रतिमाबंध 'अर्था'ला चित्राचे परिमाण देतात.

असे सांगितले जाते की कवितेत योजिले जाणारे शब्दार्थ ही फक्त दर्शकचिन्हे असतात. ती संकेताने त्यांना चिकटलेल्या 'अर्था'च्या सीमा ओलांडून सतत 'आशया'च्या

विस्ताराकडे अंगुलीनिर्देश करीत असतात. म्हणून असेही सांगितले जाते की कलाकृतीत 'अर्थ' शोधायचा नसतो, तर 'अर्थाच्या शक्यता' शोधायच्या असतात. या शोधातूनच कलाकृतीची 'एकोऽहम् बहुस्यात्' अशी प्रतीती येत असते. तर्कगत ज्ञानात्मक बंधने झुगारत असली, तरी साहित्य ही आशयवादी भाषिक संघटना असल्यामुळे निश्चितच लौकिकतेकडे अधिक झुकणारी आहे. त्यामुळे थोड्याफार प्रयत्नांनी आणि थोड्याफार तयारीच्या आधारावर कवितेच्या व्यामिश्र आशयाचा गुंता सुटू शकतो, असे म्हणता येईल.

रूपकात्मक किंवा साध्या सरळ नसलेल्या व्यामिश्र काव्यरचनांतील केंद्र-अवयव संबंध तर्कजन्य ज्ञानात बसणारा नाही हे समजले, तरी शिकविण्यासाठी तो इतर कोणत्या तरी मार्गाने लक्षात येणे आवश्यक आहे. तो लक्षात कसा यायचा? किंवा असा मार्ग कोणता? याबाबतीत एकच मार्ग उपलब्ध दिसतो, तो म्हणजे झटितीप्रत्ययाचा- intuition चा. अडचण अशी की, हा मार्ग शिकता-शिकवता येत नाही. अभ्यास वगैरेने तो सुसंस्कारित होतो, पण निर्माण होत नाही. अभिरुचीसारखीच आणि तिच्याच जातीची ही एक मानसिक शक्ती आहे. एखादी कविता वाचल्यानंतर तिच्या मर्माची प्रतीती क्षणार्धात आपल्याला होऊन जाते. होऊन जाते वा होते हे महत्वाचे. ती व्हावी यासाठी काही खास खटपट कशी करावी हे सांगता येत नाही. अशी प्रतीती झाल्यानंतर पुन्हा एकदा त्या कवितेची सारी रचना तपासली की तिची अन्तर्बाह्य संगती लागत जाते. यातील मुळातला प्रतीतीचा उत्स्फूर्त क्षण महत्त्वाचा; त्याच्या प्रकाशात सर्व रचना सुटी करण्याचा मार्ग मग सुकर होत जातो. एकंदरीने ऑझबर्नने सांगितलेल्या गेस्टाल्टच्या साक्षात्कारी अनुभवाचाच हा प्रकार आहे.

□ या संदर्भात प्रा. गो. वि. करंदीकर यांनी रसिकाच्या सुसंस्कृततेची जी पाच लक्षणे सांगितली आहेत ती मार्गदर्शक ठरतील. ती पुढीलप्रमाणे– १) सूक्ष्म संवदेनशक्ती, २) व्यापक कल्पनाशक्ती, ३) बरेवाईटपणाच्या (औचित्यविचाराच्या) सापेक्षतेची समज, ४) सर्वसाक्षी सहानुभूती, ५) अपरिहार्य अस्वस्थता. याच्या जोडीला 'शिकविण्याची हातोटी' हे सहावे लक्षण घातले की, साहित्याच्या अध्यापकाची शिदोरी पूर्ण होईल. रूढ भाषेत सांगायचे तर कविता हा व्यक्तिनिष्ठ वाङ्मयप्रकार असल्यामुळे– त्यातही विशेष सूक्ष्म असल्यामुळे त्याच्या स्वरूपात मोठा लवचिकपणा असतो. वस्तुनिष्ठ लेखनातील ठामपणा, अर्थातच तिथे नसतो. त्यामुळे कवितेच्या गणितात दोनात दोन मिसळून चारच होतात असे नाही. बेरीज करणाऱ्याच्या कुवतीनुसार ही बेरीज चारहून जास्तही होऊ शकते आणि कमीही होऊ शकते. तेव्हा कवितेच्या अध्यापनात अध्यापकाची मर्यादित निर्मितिक्षमता हाच क्रियाशील घटक (functional factor) असतो. मर्यादित अशाकरिता की, एका बाजूला त्याला कवितेच्या संहितेच्या कक्षा सांभाळाव्या लागतात; आणि दुसऱ्या बाजूला संहितेच्या तळाशी असलेला संबंध राखूनच उड्डाणेही घ्यावी लागतात.

आणि सर्वांत महत्त्वाची बाब म्हणजे ही तारेवरची कसरत साधताना त्याला समोर बसलेल्या विद्यार्थिवर्गाचे, म्हणजेच नेमक्या स्वेतर प्रयोजनाचे भानही ठेवायला लागते.

(१४/८, स्वयंसिद्धा सोसायटी, पौड रस्ता, पुणे ४११ ०३८)

---

## महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचे नवीन आजीव सभासद

### पुणे

तांबे सुरेश दत्तात्रेय, श्रीमती चिरपुटकर प्राजक्ता शिरीष, कु. थिटे संगीता साहिराम, आंबेकर राजेंद्र कृष्ण, पांगारे शिवाजी कृष्णाजी.

### पुण्याबाहेरील

प्रा. सौ. महाजन आशालता अशोक (भुसावळ), सोमण मनीषा शरद (कल्याण), घारे शंकर परशराम (कल्याण), चावरे चंद्रकांत गणेश (कल्याण), चावरे सविता चंद्रकांत (कल्याण), देशपांडे सतीश प्रभाकर (कल्याण), काणे वसंत दत्तात्रय (कल्याण), डॉ. उपासनी जगदीश मुरलीधर (कल्याण), राजे भालचंद्र शामराव (कल्याण), सामंत उदय अनंत (कल्याण), नांदगावकर संग्राम नील (कल्याण), डॉ. मोकाशी प्रताप यशवंत (कल्याण), दवंडे अशोक जनार्दन (इचलकरंजी), पाटणी जे. ओम (इचलकरंजी), सौ. गोखले मंजुश्री नंदकुमार (इचलकरंजी), कुलकर्णी गिरीश महादेव (अहमदनगर).

□

डॉ. यशवंत साधु

# हरवलेल्या दृष्टांतकथा

संतांनी आपल्या तत्त्वनिरूपणासाठी अनेक उपमा, दृष्टांत, रूपक यांची रेलचेल केली आहे. ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, तुकोबांची गाथा इत्यादी ग्रंथांतील कोणताही उतारा घेतल्यास संतांच्या या काव्यशक्तीचा अनुभव येतो. तुकोबांचा अभंग तर कधी कधी एखाद्या गोष्टीसारखाच असतो. 'परिसे गे सूनेबाई' [१], 'वाघे उपदेशिला कोल्हा' [२] यांसारख्या अभंगांत तुकोबांनी संसारलंपट आणि लबाड माणसांची विनोदी चित्रेच रेखाटली आहेत. पंचतंत्रातील गोष्टींचे संदर्भ, पौराणिक कथांचे संदर्भ योजून संतांनी आपला प्रतिपाद्य विषय सुलभ, सुगम केला. जसे : अकराव्या अध्यायात ज्ञानेश्वरीत आलेला खालील दृष्टांत म्हणजे पंचतंत्रातील ती एक प्रसिद्ध गोष्टच होय.

*'आपुले प्रतिबिंब नेणता । सिंह कुहां घालिल देखोनि आता ।*
*ऐसा धरिजे तेवी अनंता । राखिले नेणता ॥' (ज्ञा. ११-५५)* [३]

सिंहाने एका सशाच्या सांगण्यावरून विहिरीतील स्वतःच्या प्रतिबिंबाकडे पाहून विहिरीत उडी टाकली आणि स्वतःचा नाश ओढवून घेतला, ही गोष्ट वरील दृष्टांतात गुंफली आहे.

*'का साऊली नेणता घातले । कुहा सिंहे ॥' (ज्ञा. ९-१४९)* [४]

विहिरीत दिसणाऱ्या प्रतिबिंबावर सिंहाने झडप घातली आणि स्वतःचा नाश ओढवून घेतला, हा संदर्भ वरील ओवीतही आढळतो. पौराणिक संदर्भाचाही समर्पक उपयोग ज्ञानेश्वरीत आढळतो. पांडवांना लाक्षागृहात जळण्याचा प्रसंग आला असताना कृष्णाने प्रसंगावधान राखून पांडवांचे रक्षण केले. त्याचे कृतज्ञतेने स्मरण अर्जुनास झाल्याचे ज्ञानेश्वरांनी दाखविले आहे :

*'मागा जळत काढिलो जोहरी । तै ते देहासीच भय अवधारी ।*
*आता हे जोहरवाहर दुसरी । चैतन्यासकट ॥ (ज्ञा. ११-६०)* [५]

मागे प्रभूने वराह अवतार धारण करून हिरण्याक्षाचा नाश केला व पृथ्वीचे रक्षण केले, हा संदर्भ ज्ञानेश्वर किती योजकतेने उपयोगात आणतात ते पाहा.

*'दुरामहेहिरण्याक्षे । माझी बुद्धि वसुंधरा सूदली काखे ।*
*मग मोहार्णव गवाक्षे । रिघोनिठेला ॥ तेथ तुझेनि गोसाविपणे ।*

*एकवेळ बुद्धिचीया ठाया येणे । हे दुसरे वराह होणे । पडिले तुज ॥*

(ज्ञा. ११-६१ व ६२) [६]

परंतु काही वेळा संतांच्या साहित्यातील दृष्टांतांमागील संदर्भ इतके धूसर झालेले असतात की, त्या दृष्टांतांच्या मुळाशी एखादी कथा किंवा गोष्ट आहे, हे आवर्जून सांगावे लागते. उदा. एकनाथी भागवतातील पुढील ओवी पाहा–

*'गोफणेचा सुवर्ण पाषाण । लागे तो दुःखी होय पूर्ण ।*
*तोचि वोळखिलिया सुवर्ण । दुःख जाऊनि सुख वाटे ॥*

(एकनाथी भागवत १९-४४०) [७]

सुख आणि दुःख द्वंद्वाचे वास्तव स्वरूप ब्रह्म आहे असे कळले, तर ती द्वंद्वे ब्रह्मरूप होतात किंवा अंतःकरणाने जो पुरुष निर्विकार आहे तो सुख आणि दुःख हे दोन्ही प्रकार तितक्याच समबुद्धीने सहन करतो, या विषयाचे निरूपण करताना संत एकनाथांनी वरील ओवीत एक दृष्टांत कथन केला आहे. वरवर पाहता वरील ओवीचा साधा अर्थ असा होऊ शकेल–

'गोफणीत घातलेला सोन्याचा गुंडा पाठीत लागला तर
तो मनुष्य पूर्ण दुःखी होतो पण तो गुंडा सोन्याचा आहे
हे कळले तर दुःख जाऊन सुख वाटते.'

वरील ओवीच्या प्रस्तुत अर्थाने खरे समाधान होते काय, हा खरा प्रश्न आहे. कारण गोफणीचा व सोन्याच्या गुंडांचा संबंध केव्हा आणि कसा आला याचा उलगडा येथे होत नाही. कारण गोफणीने साधे धोंडे मारणे आपण समजू शकतो. शेतकरी पाखरापासून पिकाचे रक्षण करण्यासाठी गोफणीचा उपयोग करतात. परंतु गोफणीने सोन्याचे गुंडे हाणण्याचा प्रकार अज्ञात आहे. या अज्ञात कार्यकारणभावाच्या पाठीमागे एक मजेदार गोष्ट असते ती गोष्ट थोडक्यात अशी–

एका राजाचा एक लाडका राजकुमार होता. छोट्या राजकुमारास कुठल्याही गोष्टीसाठी हट्ट करण्याची सवय होती. एकदा त्यास गोफणगुंडा खेळण्याची हौस निर्माण झाली. मग काय? राजाने त्याच्यासाठी खास चांदीच्या तारांची गोफण बनवली. त्या गोफणीस मोत्याचे गोंडे लावलेले होते. गोफणीतून मारण्यासाठी जे धोंडे लागतात ते साधेसुधे नव्हते, तर शुद्ध सोन्याचे वजनदार गुंडे राजाने तयार केले आणि राजकुमार माळ्यावर उभा राहून गोफणीतून भराभर गुंडे हाणू लागला. त्याच सुमारास शेताच्या पाणंदीतून एक वाटसरू चालला होता. त्याच्या पाठीत अचानक एक वजनदार दगड बसताच तो कळवळला. तो मटकन खाली बसला. अवतीभवती त्याने अस्वस्थ होऊन पाहिले. पण आपणास दगड कुणी मारला हे त्यास समजेना. थोड्या वेळातच त्याचे लक्ष



अनुक्रमणिका

पाठीत बसलेल्या दगडाकडे गेले, आणि तो पाहतो तर काय? तो दगड म्हणजे शुद्ध सोन्याचा एक वजनदार गुंडा होता. तो पाहताच त्या वाटसरूचे दु:ख मावळले. त्याच्या डोळ्यांत आनंद मावेनासा झाला. त्याने तो सोन्याचा गुंडा तर हस्तगत केलाच, पण अजून एखादा गुंडा येतो की काय याची तो प्रतीक्षा करू लागला.'

ही गोष्ट समजल्यानंतर मात्र संत एकनाथांच्या वरील ओवीचा खऱ्या अर्थाने उलगडा होतो. त्या ओवीतून हरवलेली एक दृष्टांतकथा उलगडल्यामुळे ओवीतील तात्त्विक आशय अधिक स्पष्ट होऊ लागतो. आजमितीस संतांच्या ओवी-अभंगाचे फक्त शाब्दिक रूप आपल्या हाताशी आहे. फार तर त्या शाब्दिक रूपाच्या वाच्यार्थावर प्रकाश टाकणारी सामग्री आपल्याजवळ आहे. पण केवळ वाच्यार्थाने काम भागेल असे वाटत नाही. काही ठिकाणी संतांनी त्यांच्या काळात प्रचलित असलेल्या दृष्टांत कथा, तसेच त्यांच्या काळातील लोकमानसात लोकप्रिय असलेले अनेक मनोरंजक संदर्भ संतांनी आपल्या साहित्यात उपयोजिले. संतांच्या काळातील श्रोत्यांना व वाचकांना ते ते संदर्भ चटकन आठवणीत येत असावेत आणि आशय उलगडत असावा. पण काळाच्या ओघात आज मात्र अशा कथासंदर्भांना आपण पारखे झालो आहोत. त्यामुळे खूपदा आशय स्पष्ट होण्यासाठी आपण अवघडतो. हे लक्षात येण्यासाठी ज्ञानेश्वरीतील पुढील ओवी आपण चर्चेसाठी घेऊ–

*मग सूर्य अंधारालागी । रिघो का भलते सुरंगी ॥*
*परी तो तयाचा भागी । नाहीचि जैसा ॥ (ज्ञा. १८-४०९)*[८]

वरील ओवीचा ढोबळ मानाने अर्थ असा होऊ शकेल–

'मग सूर्य अंधार पाहण्यासाठी वाटेल त्या भुयारात प्रवेश करो, परंतु तो अंधार जसा सूर्याच्या वाट्याला येतच नाही.' त्याप्रमाणे जो आत्मभावाने व्यापला गेला आहे, तो ज्या दृश्य पदार्थाला पाहील, तो दृश्य पदार्थ दृष्टेपणासह त्याचेच रूप होत जातो.' असा वरील ओवीतील दृष्टांताचा सिद्धांताशी संबंध जुळतो. पण दृष्टांतात सूर्य अंधार पाहण्यासाठी वाटेल त्या भुयारात केव्हा आणि का प्रवेश करतो हे कोडे मात्र उलगडत नाही. पण परंपरेने वारकरी संप्रदायाच्या कीर्तन- प्रवचनातून या संदर्भात मी स्वतः ऐकलेली गोष्ट जशीच्या तशी पुढे देत आहे–

'एकदा सूर्यास डोकेदुखीचा आजार झाला. नेहमी जगाला प्रकाश देण्याची अव्याहत कामगिरी करण्यामुळे एवढा मोठा सूर्य, पण तो देखील कंटाळला आणि त्याचे डोके दुखू लागले. अर्थातच देवांचे वैद्य जे अश्विनीकुमार यांच्याकडे जाऊन सूर्याने आपली प्रकृती तपासून घेतली. सूर्याच्या प्रकृतीत कोणताही दोष नव्हता. त्यास निवांत ठिकाणी अंधारात कुठेतरी विश्रांती घेण्याचा सल्ला अश्विनीकुमारांनी दिला. त्यानुसार सूर्य पाताळातील अनेक भुयारे शोधू लागला. पण कुठेही त्यास अंधार असलेले निवांतस्थळ विश्रांतीसाठी मिळाले

नाही. कारण सूर्य म्हणजे अंतर्बाह्य प्रकाश. तेथे अंधार कोठून असणार?'

ही आणि यापूर्वी सांगितलेली गोष्ट माझे वडील श्री. शंकरमहाराज खंदारकर यांच्या कीर्तन-प्रवचनातून मी अनेक वेळा ऐकली आहे. वारकरी संप्रदायात परंपरेने चालत आलेल्या निरूपण पद्धतीत किती गमतीजमती आहेत हेच यातून सिद्ध होते. संशोधनाच्या क्षेत्रातील मंडळी परंपरेला नेहमीच गौण स्थान देतात, पण परंपरेने ज्या गोष्टी जतन केल्या आहेत त्यांचा संशोधकांना देखील पत्ता नसतो. यासंदर्भात पुढील उदाहरण उपयुक्त ठरेल.

*'जैसे न सांगणेवरी । बाळा पतीसी रूप करी ।*
*बोलु निमालेपणे विवरी । अचचति ॥ (ज्ञानेश्वरी १५-४६८)*[१]

श्रुती परमात्मस्वरूपाचे वर्णन करताना उपाधीचा निषेध करून शेवटी शब्दाचाही बाध करून शाब्दिक चर्चेला विषय न होणाऱ्या निरुपाधिक ब्रह्माचे विवरण करतात, हा आशय स्पष्ट करण्यासाठी ज्ञानेश्वरांनी वरील ओवीच्या पूर्वार्धात एक दृष्टांत दिला आहे. त्याचा ढोबळ अर्थ असा–

ज्याप्रमाणे न सांगताच एखादी नववधू आपल्या पतीचा निर्देश करते, त्याप्रमाणे श्रुती परमात्म्याच्या निरुपाधिक स्वरूपाचे वर्णन करतात. आता येथे प्रश्न असा की, नववधू न सांगता आपल्या पतीचा निर्देश करते याचा अर्थ काय? कारण ओवीतून तर तेवढाच आशय निघतो. पण त्या आशयाच्या मुळाशी असलेला सामाजिक संदर्भ लक्षात घेतल्याशिवाय ओवीचा पूर्ण अर्थ उलगडत नाही. प्रस्तुत ओवीत परंपरेने जो सामाजिक संदर्भ दडलेला आहे तो पुढीलप्रमाणे–

'जुन्या काळी मुलींची लग्ने अतिशय लहान वयात होत असत. आणि अशीच एक नववधू पतीसह माहेरी येते. अर्थात गावातील परिचित लोक, मित्र, मैत्रिणी यांना तिच्या पतीबद्दल कुतुहल असणारच. पती आपल्या मित्रांसमवेत दूर पण थोड्याशा अंतरावर गप्पा-गोष्टी करतो आणि मग नववधूला पतीची ओळख करून देताना कोण त्रास? लाजेने तिला स्पष्टपणे बोट दाखवून 'हाच माझा नवरा,' असे सांगता येत नाही. कारण त्या काळची मर्यादा. आणि मित्रांच्या कोंडाळ्यातून आपला पती नेमका कोणता पुरुष आहे, हे तर सांगण्याची जबाबदारी नववधूवर येऊन पडते. अशा वेळी त्या लहान मुलीस 'हा तुझा नवरा काय?' असे वेगवेगळ्या पुरुषांकडे बोट दाखवून तिच्या मैत्रिणी विचारतात. प्रत्येक वेळी ती 'नाही नाही' असे म्हणते. पण जेव्हा तिच्या पतीकडेच बोट दाखवून 'हा तुझा नवरा काय?' असे जेव्हा विचारले जाते तेव्हा मात्र ती लाजेने चूर होऊन जाते, आणि काहीच बोलत नाही. तिच्या न बोलण्यातूनच ती आपला पती नेमका कोणता पुरुष ते सूचित करते. त्याप्रमाणे श्रुती निरुपाधिक परमात्म्याचे रूप वर्णन करतात.

वरील संदर्भ लक्षात घेतला तरच ज्ञानेश्वरांनी नववधूस येथे 'बाला' का म्हटले आहे ते



अनुक्रमणिका






लक्षात येते. नववधूच्या स्वभावातील मुग्धता, लज्जा, प्रेमळपणा हे सर्व संदर्भ वरील गोष्टीशिवाय उलगडणे शक्य नाही.

एकनाथी भागवततही असाच एक कथासंदर्भ पुढील ओवीत लपलेला आहे.

*'का जो दैवयोगे पालखी चढे । तो पूर्वील तुटके मोचडे ।*
*आहेत की गेले कोणीकडे । हे स्मरेना पुढे तेणे हरिखे ॥*

(एकनाथी भागवत १३-५९२) [१०]

'जो दैवयोगाने पालखीत चढला तो आपल्या पूर्वीच्या तुटक्या वहाणांना विसरतो. त्या कुठे आहेत हे देखील त्याच्या लक्षात नसते, इतका त्यास आनंद होतो.' असा वरील ओवीचा शब्दशः अर्थ होतो. पण एवढ्याने समाधान होईल का ? कारण पालखीत चढणारा कोण ? त्याचा तुटक्या वहाणांशी संबंध कसा आला ? ते वरील ओवीच्या अर्थातून सहजासहजी आकलन होत नाही. पण त्यामागील गोष्ट माहीत होताच ओवीतील सर्व संदर्भ स्पष्ट होतो. ती गोष्ट थोडक्यात अशी–

'एक फार मोठे साम्राज्य होते आणि त्या राज्याला कुणीच वारस नव्हता. अशा स्थितीत त्या राज्याचा वारस ठरविण्याची एक परंपरागत पद्धती होती, ती म्हणजे एका शुभदिनी हत्तीणीच्या सोंडेत माळ द्यावयाची. ती हत्तिणी ज्याचे गळ्यात माळ घालील तो राजा समजला जाई. याप्रमाणे एका शुभदिनी त्या हत्तिणीच्या सोंडेत विधीपूर्वक माळ देण्यात आली आणि हत्तीण निघाली. राजधानीतील प्रत्येकास उत्सुकता लागून राहिली की, आता ही हत्तीण कुणास माळ घालणार ? हत्तीणीने राजधानीत असलेल्या कुणालाही माळ घातली नाही. ती नगरीच्या बाहेर आली. जंगलात आली. तेथे एक गुराखी गुरे राखत होता. त्याच्या पायांत तुटक्या वहाणा, अंगावर फक्त लंगोटी आणि हातात काठी. अशा वेषातील गुराख्याच्या गळ्यात हत्तीणीने माळ घालताच, लगेच त्याच्या नावाचा जयजयकार करण्यात आला. मागोमाग पालखी, रथ, हत्ती, घोडे, सेनापती, मंत्री आलेच. त्या गुराख्यास मोठ्या सन्मानाने पालखीत बसविण्यात आले आणि पालखी राजधानीकडे निघाली. अशा वेळी पालखीत चढताना त्या गुराख्याच्या पायांत तुटक्या वहाणा होत्या त्या खालीच राहिल्या. त्यांची त्यास आठवण तरी होईल का ? कारण त्याच्या जीवनात एक वेगळा आनंद निर्माण झाला होता.'

ही गोष्ट समजल्यावर मात्र दृष्टांतातील सर्व संदर्भ लक्षात येऊन त्यातील अर्थपूर्णता जाणवते.

आद्यकवी मुकुंदराज यांच्या 'विवेकसिंधू'तही असाच एक लपलेला कथासंदर्भ पुढील ओवीत आढळेल.

*'ना तरी काशींये तई जो भेटला । तो इवे देशी आजी देखीला ।*
*येतावता काये दोनी जाला । आपणपेयासी ॥'*

(विवेकसिंधू– उत्तरार्ध प्रकरण ७-२६) [११]

वरील ओवीचा शब्दशः अर्थ खालीलप्रमाणे सांगता येईल.

'अथवा काशीत तेव्हा जो भेटला तोच आज या ठिकाणी दिसला. एवढ्यामुळे काय तो स्वतःपेक्षा वेगळा किंवा दोन होतो काय ?'

परब्रह्मस्वरूपाचे कोणत्याही अवस्थेत दर्शन घेतले, तरी त्या अवस्थाभेदाने त्याचे मूळ स्वरूप बदलत नाही, हे सूचित करण्यासाठी मुकुंदराजांनी हा दृष्टांत दिला आहे. पण दृष्टांतातील कथासंदर्भ आज हरवलेला असल्यामुळे दृष्टांताचे व्हावे तसे आकलन वाचकास मुळीच होत नाही. मुकुंदराजांच्या वरील ओवीत लपलेली कथा याप्रमाणे–

'एकदा दोन मित्र तीर्थयात्रा करण्यासाठी काशीक्षेत्री गेले होते. तेथे बाजारात हिंडताना त्यांना भरजरी अंगरखा घातलेला, डोक्यास मंदिल बांधलेला आणि गळ्यात मोत्याचा कंठा असलेला देवदत्त नावाचा एक गृहस्थ पालखीत बसून जाताना दिसला. पुढे ते दोन्ही मित्र तीर्थयात्रा आटोपून जेव्हा आपल्या गावी परत आले, तेव्हा काही दिवसांनी ज्या देवदत्तास त्यांनी काशीत पालखीत बसून हिंडताना पाहिले, तोच देवदत्त आपल्या गावात दरिद्रीवेषात माधुकरी मागताना त्यांना दिसला. त्या दोन मित्रांपैकी एकाने देवदत्तास ओळखले, पण दुसऱ्यास मात्र देवदत्त ओळखू आला नाही. काशीत पाहिलेला एवढा मोठा श्रीमंत आज एवढा दारिद्री कसा ? हा संशय व विरोध त्याच्या मनात निर्माण झाला. विरोधास कारण ठरणाऱ्या देश, काल, स्थिती, यांचा त्याग करून देवदत्तास पाहण्याचा सल्ला पहिल्या मित्राने दुसऱ्या मित्रास दिला आणि मग तोच हा देवदत्त, असे ज्ञान त्या दुसऱ्या मित्रास झाले. शास्त्रात जिला जहद-जहद् लक्षणा म्हणतात, तिचेदेखील वरील दृष्टांत (सोयं देवदत्तः) हे प्रसिद्ध उदाहरण आहे. पण आज मात्र काळाच्या ओघात हे कथासंदर्भ हरवल्यामुळे ओव्यांचे केवळ शब्दार्थ वाचून समाधान मानावे लागते.

ज्याप्रमाणे महानुभाव पंथाचे चक्रधर आपल्या तत्त्वनिरूपणासाठी एखादा समर्पक दृष्टांत सांगत. किंबहुना चक्रधरांचा दृष्टांत म्हणजे खूपदा एखादी गोष्ट असे. (उदा. आधारीचेया परीसाचा दृष्टांत [१२], कठियाचा दृष्टांत [१३], कुष्ठीयाचा दृष्टांत, [१४]) त्याचप्रमाणे संतांच्या पण निरूपणातून अशा अनेक दृष्टांतकथा येतात. त्या दृष्टांतकथांचे संदर्भ तत्कालीन श्रोत्यांच्या नित्याच्या परिचयाचे असावेत. म्हणूनच अतिशय संक्षेपाने एखाद्या ओवीत ते दृष्टांत ज्ञानेश्वर, मुकुंदराज, एकनाथ इत्यादी संतांनी कथन केले. वारकरी संप्रदायाच्या परंपरेत ज्ञानेश्वरीच्या प्रवचनातून किंवा तुकोबांच्या अभंग-संकीर्तनातून वर वर्णन केलेले दृष्टांत व त्यामागील कथासंदर्भ कथन करून निरूपण रुचकर व उद्बोधक

केले जाते. संप्रदायाच्या चाकोरीत शेकडो वर्षांपासून प्रचलित असलेल्या या आणि यासारख्या अनेक दृष्टांतकथा आज लोप पावत चालल्या आहेत. आज सार्थ ज्ञानेश्वरींची किंवा सार्थ एकनाथी भागवताची किंवा सार्थ विवेकसिंधूची संपादने पाहिल्यास त्यातील ओव्यांचे जेवढ्यास तेवढे निरूपण लिहिलेले आढळते. पण वर उल्लेखिल्याप्रमाणे काही ओव्यांत ज्या दृष्टांतकथा आहेत त्यांचे जतन वारकरी संप्रदायातील निरूपण परंपरेनेच केले आहे, असे म्हणता येईल. वानगीदाखल म्हणून मी स्वतः ऐकलेले काही कथांचे संदर्भ प्रस्तुत लेखात थोड्याशा विस्ताराने मुद्दामच उलगडून दाखविले आहेत. अशा पद्धतीचे बरेच संदर्भ संत साहित्यातील ओवी आणि अभंगातून उलगडून दाखविणे अवघड नाही.

संप्रदायाच्याद्वारे केवळ मौखिक परंपरेने साहित्य जतन करण्याचेच कार्य होत नसून संप्रदायातील विविध व्यासपीठांवरून संतसाहित्याचे यथार्थ आकलन होण्यासाठी ज्या अनेक दृष्टांत कथा, त्यातील कथनशैली, सामाजिक संदर्भ वापरले जातात त्यातून त्या साहित्यातील आशयास एक अर्थपूर्ण परिमाण प्राप्त होते. म्हणून कोणताही संप्रदाय म्हणजे केवळ अंधपरंपरा नसून परंपरेने चालत आलेले एक संचित सुरक्षित ठेवणारी कायम व्यवस्था आहे.

**संदर्भ**

१.श्री तुकाराम महाराज गाथाभाष्य- शंकरमहाराज खंदारकर पृ.१२४८ अभंग क्र.३२१६.
२.तत्रैव पृ.४३६ अभंग क्र.१०८९.
३.ज्ञानेश्वरीभावदर्शन- शंकरमहाराज खंदारकर पृ.६१०.
४.तत्रैव पृ.४६०.
५.तत्रैव पृ.६११.
६.तत्रैव पृ.६११.
७.भावार्थ एकनाथी भागवत- शंकरमहाराज खंदारकर पृ.१०१५.
८.ज्ञानेश्वरी भावदर्शन- शंकरमहाराज खंदारकर पृ.१३८९.
९.तत्रैव पृ.११२५.
१०.भावार्थ एकनाथी भागवत- शंकरमहाराज खंदारकर पृ.७६४.
११.विवेकसिंधू- डॉ.म.वि.गोखले पृ.१९९.
१२.दृष्टांतपाठ- भगवंत देशमुख,स.रा.गाडगीळ,पृ.२६.
१३.तत्रैव पृ.२५.
१४.तत्रैव पृ.४५.

(श्रीनगर कॉलनी,विदर रोड,उदगीर.४१३५१७ जि.लातूर)

भारती पांडे

# नियतीच्या चक्राचा वेध घेणारी लेखिका

पर्ल बकबद्दल आपल्याला काय माहिती आहे असं विचारलं, तर सर्वसामान्यपणे एकच उत्तर मिळतं आणि ते म्हणजे पर्ल बक ही नोबेल पारितोषिक विजेती लेखिका आहे आणि तिची 'गुड अर्थ' या नावाची कादंबरी आहे. बस, याखेरीज अधिक माहिती सामान्य मराठी वाचकाला जवळजवळ नाहीच, असं म्हटलं तर ते फारसं चुकीचं ठरणार नाही. एवढंच नाही, तर या माहितीत काही चुकीची माहितीही मिसळलेली आपल्याला दिसते. उदाहरणार्थ, 'गुड अर्थ'साठी तिला नोबेल पारितोपिक मिळालंय किंवा तिनं फक्त चिनी जीवनावरच कादंबऱ्या लिहिल्या आहेत, वगैरे.

पर्ल बकच्या जन्मशताब्दीनिमित्तानं मराठी वाचकाला तिचा थोडा विस्तृत परिचय व्हावा, म्हणून हा लेखनप्रपंच.

अब्सालोम सायडनस्ट्रिकर हा कडवा अमेरिकन मिशनरी आणि कॅरोलिन ही सुरुवातीला ध्येयवादानं भारलेली आणि नंतर 'आपलं चुकलं की काय,' या प्रश्नाच्या भोवऱ्यात सापडलेली त्याची बायको. लग्नानंतर दोघेही ताबडतोब चीनला मिशनरी कामाला वाहून घेण्यासाठी गेले. ठराविक काळानंतर कॅरोलिन अमेरिकेला जाऊन यायची. पण हळूहळू बदलती अमेरिका आपल्याला दुरावत चालली आहे, हे तिच्या लक्षात आलं आणि ते निर्वासितपणाचं दुःख कायमचं तिच्या मनात ठसठसत राहिलं.

कॅरोलिनच्या तीन मुलांपैकी पर्ल मधली. पर्लचा मोठा भाऊ तिच्याहून दहा वर्षांनी मोठा तर धाकटी बहीण सात वर्षांनी लहान. साहजिकच पर्लचं बालपण चिनी दाईच्या कथा-कहाण्या ऐकण्यात रंगून जाण्यात गेलं. शेजारचे भारतीय डॉक्टर आणि त्यांची सुशिक्षित पत्नी, जपानी शेजारीण यांच्याशी गप्पा मारण्यात आणि त्यांना त्यांच्या देशाबद्दल नाना प्रश्न विचारण्यात गेलं. तिला चिनी भाषा, अभिजात साहित्य आणि तत्त्वज्ञान शिकवणाऱ्या कुंग गुरुजींच्या सहवासात तिला पाश्चिमात्त्य देशांच्या साम्राज्यवादी विचारसरणीचं आणि त्यांनी चालवलेल्या अतिपूर्वेच्या देशांच्या पिळवणुकीचं संपूर्ण चित्र पौर्वात्त्य दृष्टिकोनातून शिकायला मिळालं. पौर्वात्त्य लोक पाश्चिमात्त्य राज्यकर्त्यांकडे कोणत्या नजरेनं पाहत होते, तेही तिला कुंग गुरुजींमुळं नीट समजत गेलं. 'आज ना उद्या सगळ्या गोऱ्या लोकांना स्वतःचा जीव वाचवण्यासाठी चीन सोडून पळून जावं लागेल'

असं भाकीत ते नेहमी वर्तवीत असत.

साहजिकच पर्ल सायडनस्ट्रिकर इंग्रजी बोलायला लागण्याआधी चिनी भाषा बोलायला लागली. लिहायवाचायला मात्र आधी इंग्रजी आणि मग चिनी. तिच्या आईकडून तिला इंग्रजी भाषेचं उत्तम शिक्षण मिळालं. कॅरोलिन मुलांकडून निबंध लिहून घेण्याबद्दल अतिशय जागरूक होती. भाषेचा शुद्ध वापर करण्याबद्दल तिचा कटाक्ष असे. पर्लनं लिहिलेले निबंध वाचून त्यावर चर्चा करणं, हाही या अभ्यासाचा एक महत्त्वाचा भाग होता. पर्लनं या काळात लिहिलेले अनेक निबंध 'शांघाय मर्क्युरी' या इंग्रजी वर्तमानपत्राच्या बालविभागात प्रसिद्ध झाले.

मनातले विचार कागदावर उतरवण्यासाठी कॅरोलिननं पर्लला सतत उत्तेजन दिलं. यामध्येच पुढच्या लेखनात स्पष्ट विचार नेमकेपणानं मांडण्याच्या पर्लच्या पद्धतीची बीजं रुजली असावीत. या लेखनवाचनाच्या अभ्यासात दोन महत्त्वाच्या गोष्टी होत्या. एक म्हणजे किंग जेम्सच्या बायबलचं रोज होणारं पठण. त्यामुळे एक प्रकारची लयबद्धता पर्लच्या लेखनात आली. आणि दुसरं म्हणजे तिच्या आईनं रोज सायंकाळी अतिशय हळवेपणानं भावुकपणानं रंगून सांगितलेल्या तिच्या लहानपणच्या– अमेरिकेतल्या गोष्टी.

घरात हे असं शिक्षण चालू असताना मिशनरी आईवडिलांमुळे पर्लचं दुसऱ्या प्रकारचंही एक शिक्षण आपोआप घडत होतं. हे मिशनरी दांपत्य मिशनच्या नियमाप्रमाणे मिशनच्या आवारात राहाण्याऐवजी ज्या गरीब लोकांमध्ये ते काम करीत असत, तिथंच राहणं योग्य समजत असे. साहजिकच पर्लची अगदी लहानपणी आजूबाजूच्या गरीब चिनी समाजाशी जवळून ओळख झाली. त्यांची सुखंदुःखं, त्यांचे प्रश्न, त्यांच्या चालीरीती, आचारविचार हे सारं तिला अगदी जवळून पाहायला मिळालं.

कुंग गुरुजींच्या मृत्यूनंतर पर्लला शांघायमधल्या मुलींच्या शाळेत पाठवण्यात आलं. या शाळेच्या मुख्याध्यापिका मिस जुवेल या सामाजिक कार्याशी बांधिलकी मानणाऱ्या होत्या. पर्ल अस्खलित चिनी बोलत असल्यामुळे ती साहजिकच मिस जुवेलबरोबर जायची. मालकांच्या क्रूर वागणुकीला कंटाळून पळून आलेल्या चिनी गुलाम मुली, गरीब, परित्यक्त गोऱ्या स्त्रिया यांची आधारगृहे, वेश्यागृहे यांसारख्या ठिकाणी जाऊन तिथल्या दुर्दैवी स्त्रियांशी बोलून त्यांच्या भूतकाळाबद्दल माहिती मिळवणं, त्यांची दुःख समजावून घेणं, त्यांना धीर देणं हे पर्लनं या वेळी केलेलं काम तिच्या नंतरच्या लेखनाला चांगलंच उपकारक ठरलं.

इथं वर्षभर राहिल्यानंतर वयाच्या सतराव्या वर्षी पर्ल पुढच्या शिक्षणासाठी अमेरिकेला गेली. रँडॉल्फ-मेकन या स्त्रियांच्या महाविद्यालयात तिला प्रवेश मिळाला. इथंही तिचं लेखन चालूच होतं. तिनं महाविद्यालयाच्या मासिकासाठी लघुकथा लिहिल्या, एका

नाटकाचं सहलेखन केलं. तिच्या पदवीच्या वर्षात तिला लेखनासंबंधीची दोन पारितोषिकंही मिळाली. यांपैकी एक उत्कृष्ट लघुकथेसाठी होतं, तर दुसरं उत्कृष्ट कवितेसाठी.

अमेरिकेत गेल्यावर पर्लला पहिल्यांदाच तिच्या वेगळ्या– चिनी बालपणाची जाणीव झाली. इतर विद्यार्थिनी तिच्याकडे कुतूहलानं पाहत असत. कोणत्याही एका जगात स्वीकार व्हायला हवा असेल, तर दुसरं जग दूर ठेवायला हवं, हे ओळखून पर्लनं जाणीवपूर्वक पाश्चात्य पद्धतीनं राहणं-बोलणं सुरू केलं. तरीही अमेरिकेत तिला 'घरच्यासारखं' कधीच वाटलं नाही, असं ती स्वतःच म्हणते.

१९१४ मध्ये पदवी मिळवल्यानंतर 'रँडॉल्फमेकन' मध्येच तिला तत्त्वज्ञान आणि मानसशास्त्र विभागामध्ये मदतनीसाची नोकरी मिळाली. पण काही दिवसांतच तिची आई गंभीर आजारी झाल्यानं १९१४ साल संपण्याआधीच पर्ल चीनमध्ये परतली.

आईची शुश्रूषा करता करताच आईचं मिशनमधलं कामही पर्लनं मनापासून सांभाळलं. चिनी समाजाशी अधिक एकरूप होण्यासाठी हा काळ तिला फार उपयोगी पडला. या कामात विद्यार्थ्यांना इंग्रजी शिकवण्याबरोबरच चिनी स्त्रियांशी त्यांच्या प्रश्नांबाबत, अडचणींबाबत चर्चा करणं, त्यांना सल्ला देणं हेही महत्त्वाचं काम होतं. आईची प्रकृती सुधारल्यानंतर मात्र पर्लचा स्वतःचा अभ्यास आणि अध्यापन पुन्हा काळजीपूर्वक सुरू झालं.

चीनमध्ये परतल्यावर तीन वर्षांनी पर्लचा विवाह जॉन लॉसिंग बक या अमेरिकन शेतीतज्ज्ञाशी झाला. जॉन बकचं कामच चिनी शेतकऱ्यांना अमेरिकन शेतीच्या पद्धती शिकवण्याचं असल्यामुळे पर्लचा साहजिक चिनी शेतकरी जीवनाशी जवळचा संबंध आला. उत्तर चीनच्या दुर्गम प्रांतात पाच वर्षं आणि नानकिंग विद्यापीठातली अध्यापनाची पाच वर्षं यामुळे पर्लला चिनी समाजाच्या वेगवेगळ्या स्तरांचं सखोल निरीक्षण करता आलं. तिचा मानवतावादी दृष्टिकोन शिक्षण काळातल्या मिशनरी कार्यामुळं आधीच विस्तारलेला होता. त्यामुळे चिनी समाजाचं एकसंध असं निरीक्षण करत असतानाही ती त्यातल्या घटकाला– व्यक्तीला कधीच नजरेआड करू शकली नाही, असं आपल्याला तिच्या लेखनातून पदोपदी जाणवतं. किंबहुना समाजात चाललेली उलथापालथ ही व्यक्तीच्या आयुष्यात उठणाऱ्या लाटांची पार्श्वभूमी म्हणूनच तिनं वापरलेली आपल्याला दिसते.

या दहा वर्षांच्या काळात चीनमध्ये एक विलक्षण बदल झपाट्यानं घडून येत होता. तो म्हणजे पाश्चिमात्य विचारसरणीचा, राहणीचा, मूल्यांचा चिनी संस्कृतीत होणारा निश्चित शिरकाव. त्यामुळे जुन्या मूल्यव्यवस्थेचा ढासळणारा डोलारा, अस्वस्थ, हरवल्यासारखी झालेली मध्यमवयस्क माणसं, नव्या वाऱ्यानं झपाटलेले तरुण आणि या साऱ्यांपासून

संपूर्णपणे वेगळा विरक्त असा श्रीमंत वर्ग आणि विद्वत्समाज. हे सारं पाहत असताना पर्ल बकसारखी संवेदनाक्षम स्त्री शांत बसणं अशक्य होतं. या काळातच तिच्या लेखनाला खरी सुरुवात झाली असं म्हटलं पाहिजे. हा काळ होता १९१७ ते १९२८ पर्यंतचा. तत्कालीन महत्त्वाच्या विषयांवरचे लेख 'फोरम', 'द नेशन' यांसारख्या नियतकालिकांतून प्रसिद्ध होऊ लागले.

याच वेळी पर्ल बकनं लघुकथाही लिहायला सुरुवात केली आणि पहिल्या कादंबरीचा संकल्प केला. या कालखंडात पर्लचं वाचनही खूप वाढलेलं दिसतं. झोला, प्राउस्ट, थोरॉ, हेमिंग्वे आणि विशेषतः ड्रेझर हा तिचा विशेष आवडीचा लेखक होता.

१९२५ पर्यंतचं पर्ल बकचं आयुष्य अतिशय दगदगीचं, धावपळीचं होतं. सतत निरनिराळ्या प्रकारचं काम करत राहणं, हा तिचा स्वभावविशेष याच वेळी तयार झाला असावा. ती विद्यापीठात शिकवत होती, घरातलं काम पार पाडीत होती, लेखनवाचन तर धडाक्यानं चालू होतंच आणि या साऱ्यांखेरीज तिची पहिली मुलगी मानसिक अपंग असल्यानं तिची एक भयानक काळजी पर्लला लागून राहिलेली होती.

१९२५ मध्ये पर्ल या मुलीला उपचारासाठी अमेरिकेत घेऊन आली. तिच्यावर काही उपचार होऊ शकत नाहीत, हे कळल्यानंतर आलेल्या खिन्नतेतून सावरण्यासाठी तिनं इंग्रजी साहित्यातली एम.ए. ची पदवी घेतली. या वेळी पैशाची अत्यंत गरज असल्यामुळे तिनं एका निबंधस्पर्धेत भाग घेतला. आंतरराष्ट्रीय महत्त्वाच्या अशा विषयावर हा निबंध लिहायचा होता. तिच्या प्राध्यापकांनी तिला यापासून परावृत्त करण्याचा खूप प्रयत्न केला. कारण बहुतेक वेळा हे बक्षीस इतिहास विभागातल्या एखाद्या विद्यार्थ्याला मिळत असे. तरीही तिनं या स्पर्धेत भाग घेतला आणि दोनशे डॉलर्सचं लॉरा मेसेंजर पारितोषिक मिळवलं. निबंधाचा विषय होता 'चीन आणि पाश्चिमात्त्य देश.'

पर्ल बकचं असं नैमित्तिक लेखन सुरू असलं, तरी तिच्या हातून याआधीच एक फार मोठं काम पार पडलेलं होतं. १९२१ साली आई वारल्यानंतर पर्लनं तिच्या आठवणी कुटुंबियांसाठी लिहून काढल्या होत्या. हे चरित्र १९३६ मध्ये प्रकाशित झालं 'द एक्झाईल' म्हणून.

१९३० मध्ये पर्ल बकची 'इस्ट विंड वेस्ट विंड' ही पहिली कादंबरी प्रकाशित झाली. ही कादंबरी तिनं स्वतःच्या दोन लघुकथा एकत्र करून तयार केलेली होती. या कादंबरीत पर्लवर असलेला चिनी लेखनाचा प्रभाव स्पष्ट जाणवतो. उदाहरणार्थ, चिनी भाषेतल्या अभिजात कलाकृतींच्या पद्धतीप्रमाणे आत्यंतिक अलंकारिक भाषा, पूर्वसूरींची वचनं उद्धृत करणं याबरोबरच बोजड भाषा आणि कृत्रिम भाषाशैली हेही या कादंबरीच्या दोषांपैकी महत्त्वाचे दोष होते. म्हणून प्रकाशकाच्या सांगण्यावरून पर्लनं ही कादंबरी पुन्हा

लिहून काढली, आणि हे दोष बऱ्याच प्रमाणात दूर केले.

या कादंबरीत पाश्चिमात्त्य देशात शिक्षण घेऊन परतलेला एक चिनी तरुण आपल्या अशिक्षित बायकोला कसं सुधारतो, याबरोबरच या चिनी मुलीचा भाऊ परदेशातून शिकून येताना आईवडिलांच्या इच्छेविरुद्ध परदेशी बायको घेऊन येतो, अशी कथा सांगितली आहे. या कादंबरीत पर्लचा चिनी मानसिकतेचा सखोल अभ्यास दिसून येतो. ही कादंबरी वाचत असताना भारतीय समाजजीवनात आजही खळबळ माजवून सोडणारी गोष्ट म्हणजे पौर्वात्त्य आणि पाश्चिमात्त्य संस्कृतीचं मिश्रण आणि त्यामुळे उठणाऱ्या जबरदस्त लाटा चटकन डोळ्यासमोर आल्याखेरीज राहत नाहीत. या कादंबरीच्या लेखनामुळे पर्लचा आत्मविश्वास वाढला हे मात्र निश्चित.

१९३१ मध्ये 'गुड अर्थ' प्रकाशित झाली आणि तिनं अमेरिकन साहित्यात नवाच मानदंड स्थापन केला. अतिशय संथ गतीनं पुढं सरकणारी ही कादंबरी एका अनोळखी, परदेशातल्या अत्यंत दरिद्री अशा शेतकऱ्याची जन्मकहाणी सांगते. ती सुद्धा अनेक वर्षांच्या कालखंडात घडणारी आणि तरीही ही कादंबरी अमेरिकन वाचकांच्या आणि नंतर जगभरच्या वाचकांच्या कमालीच्या पसंतीला उतरली. तीस भाषांत भाषांतर झालेली ही त्या काळातली एकुलती एक कादंबरी असावी.

'गुड अर्थ' बद्दल आत्तापर्यंत खूप लिहिलं-बोललं गेलं आहे. इथं उल्लेख करावासा वाटतो तो एक-दोन गोष्टींचाच.

पहिलं म्हणजे मानवतावादी दृष्टिकोन असूनसुद्धा या कादंबरीत पर्ल बकची कमालीची अलिप्त, तटस्थ वृत्ती दिसून येते. य तटस्थ प्रवृत्तीमुळे या कादंबरीला हळवं, भावुक असं जे रूप येऊ शकलं असतं, ते न येता ही कादंबरी तिच्या महत्तेला जाऊन पोचली आहे.

'गुड अर्थ' चे जे विशेष आहेत, म्हणजे शैली, वाक्यरचना, वर्णनं, व्यक्तिचित्रणं या सगळ्यांमध्ये एक विश्वात्मकता तर आहेच, पण त्याहून महत्त्वाचं अंग म्हणजे या सर्वांच्या पार्श्वभूमीवर अखंड फिरणारं नियतीचं चक्र अतिशय प्रभावीपणे रंगवलं गेलं आहे. जन्म-मृत्यू, गरिबी-श्रीमंती, नात्यांची निर्मिती आणि समाप्ती असं हे जीवनचक्र रंगवत असताना पर्ल बक कुठंही निराश मात्र झालेली नाही, असं आपल्याला आढळून येतं. 'उद्या'ची कमालीची चिवट आशा तिच्या सर्वच लेखनातून स्पष्ट जाणवत राहते. इथं तिच्या लेखनाचं हे महत्त्वाचं वैशिष्ट्य आपल्या ध्यानात येतं. 'संकटावर मात करण्याची तीव्र इच्छा असली, तरच सफल जीवन जगता येतं' अशी तिची जीवनाकडे पाहण्याची दृष्टी होती, हे तिच्या आत्मचरित्रात तिनं स्पष्ट लिहून ठेवलं. तिची पात्रं हेच तत्त्वज्ञान घेऊन जन्माला येतात आणि वाट्याला आलेलं आयुष्य हिमतीनं जगतात.



अनुक्रमणिका

'गुड अर्थ'च्या प्रकाशनानंतर आणि तिच्या झगमगत्या यशानंतर पर्ल बकनं 'द हाऊस ऑफ अर्थ' ही तीन कादंबऱ्यांची मालिका पूर्ण केली. 'गुड अर्थ'चा नायक वांग लुंग याच्या पुढच्या दोन पिढ्यांची कथा या मालिकेत सांगितली गेली आहे. या कादंबऱ्यांची नावं अशी– द गुड अर्थ, सन्स, द हाऊस डिव्हायडेड. या पुढच्या दोन कादंबऱ्या 'गुड अर्थ'ची उंची गाठू शकल्या नाहीत. त्यांचे विषय बाप-लेकांमध्ये उत्पन्न होणारी दरी, गैरसमज, तेढ असे सर्वसामान्य वाचकांच्या मनाला भिडणारे असले, तरी त्यांचा 'गुड अर्थ' इतका पगडा वाचकमनावर बसला नाही, हेही मान्य करावे लागेल.

यानंतर १९३४ मध्ये पर्ल बकची दुसरी जगप्रसिद्ध आणि वाचकप्रिय कादंबरी 'द मदर' प्रकाशित झाली. ही कादंबरी पर्लनं 'सन्स' आणि 'द हाऊस डिव्हायडेड' यांच्या मधल्या काळात लिहिली होती. ज्याप्रमाणे 'गुड अर्थ' मध्ये एका शेतकरी कुटुंबाचं चित्रण आहे, तसं या कादंबरीत एक चिरकालीन मातेचं– एका व्यक्तीचं चित्रण केलेलं आहे. एका तरुण चिनी शेतकऱ्याची बायको या कादंबरीची नायिका आहे. एका तरुण आईच्या आयुष्याचं कधी न थांबणारं जन्म-मृत्यू, सुखदुःख यांचं चक्र या कादंबरीत रंगवलेलं आहे. आपल्या मुलांना जन्म देणारी, वाढवणारी, त्यांच्याकडून अपेक्षा ठेवणारी आणि त्या पुऱ्या झाल्या नाहीत, तर साहजिकच दुःखी होणारी, आपल्या अपंग लेकराच्या दुःखानं कासावीस होणारी, आपल्या धडधाकट बलवान मुलाच्या मूर्खपणानं त्याचा पडलेला बळी पाहून निराश होणारी अशी ही आई आहे. तारुण्यात नवरा सोडून गेल्यावर मोहाच्या क्षणी घसरणारी आणि मग स्वतःवरची जबाबदारी ओळखून सावरणारी स्त्री, संसाराच्या व्यापातापामुळं निराश होऊन पळून गेलेल्या महत्त्वाकांक्षी नवऱ्यामुळे शेजारपाजाऱ्यांसमोर अब्रू जाऊ नये म्हणून नवऱ्याला शहरात नोकरी मिळाल्याची बतावणी करणारी अभिमानी गृहिणी, सून आल्यानंतर स्वतःला ओझं समजायला लागते. मोठ्या शांत सुस्वभावी मुलापेक्षा धाकट्या वांड बंडखोर देखण्या मुलावर अधिक माया करते, मोठ्या लेकाला मूल झाल्यानंतर या म्हाताऱ्या आईचा जीव पुन्हा उत्साहानं, आनंदानं भरून येतो. ही कथा जितकी घरोघर घडणारी आहे तितकीच घरोघरच्या वाचकांच्या काळजाला भिडणारीही आहे. पर्ल बकचा मानवी मनाचा अभ्यास इतका सखोल आणि त्याचा आविष्कार इतका परिणामकारक आहे की, ही साधीसुधी कहाणी एका वेगळ्याच उंचीला जाऊन पोचली आहे.

जिथं कष्टणारी शेतकरी स्त्री ही एक परिचित व्यक्ती आहे, तिथं ही कादंबरी अतिशय लोकप्रिय ठरलेली दिसते. भारत, इटली, फ्रान्स यांसारख्या देशातल्या वाचकांना ही कादंबरी खूप आवडली, पण अमेरिकेसारख्या देशात ती फारशी लोकप्रिय ठरली नाही, असं आढळून येतं.

ज्या दोन चरित्रांसाठी पर्ल बकचा नोबेल पारितोषिकासाठी विशेष विचार करण्यात आला, ती तिच्या आईवडिलांची आहेत. 'द एक्झाईल' हे तिच्या आईचं– कॅरोलिन सायडनस्ट्रिकरचं आणि 'द फायटिंग एंजल' हे वडिलांचं– अब्सालोम सायडनस्ट्रिकरचं. 'द एक्झाईल' हे खरं तर पर्लनं लिहिलेलं पहिलं पुस्तक आहे. प्रकाशित मात्र १९३६ मध्ये 'द फायटिंग एंजल'च्या बरोबर झालं.

आपल्या आईच्या आयुष्याची अतिशय स्पष्टपणे आणि तरीही अतिशय आत्मीयतेनं पर्लनं ओळख करून दिली आहे. तरुणपणातल्या आदर्शवादी कल्पनेच्या आवेगात कॅरोलिननं अब्सालोमशी लग्न केलं; कारण तिला खात्री वाटत होती की देवाचं काम करण्यासाठीच तिचा जन्म आहे. परंतु चीनमध्ये जाऊन कामाला सुरुवात केल्यानंतर तिचा यावरचा विश्वास कमी व्हायला लागला, मनात अनेक शंकाकुशंका यायला लागल्या आणि पतीपत्नीमध्ये तेढ उत्पन्न व्हायला लागली. तिनं सगळी कामं अतिशय तत्परतेनं आणि कर्तव्यदक्षतेनं पार पाडली असली, तरी मायदेश सुटल्याची खंत तिच्या मनातून कधीच गेली नाही. म्हणून पर्लनं दिलेलं 'एक्झाईल' हे नाव अतिशय समर्पक वाटतं.

'द फायटिंग एंजल' हे पर्लच्या वडिलांचं चरित्र 'एक्झाईल' हून सरस उतरलं आहे, असं म्हटलं पाहिजे. अतिशय घट्ट बांधणी आणि मुद्देसूद सुसंगत लेखन, हे या चरित्राचे विशेष आहेत. आईवरच्या प्रेमामुळे तिच्या चरित्रात जो हळवेपणा, भावुकपणा आहे तो इथं अजिबात नाही, उलट वडिलांबद्दल मनात थोडी तेढ असल्यानं कमालीचा परखडपणा आहे आणि म्हणूनच हे चरित्र अधिक सरस उतरलं आहे.

१९३४ साली चीनमधल्या डळमळत्या राजकीय परिस्थितीमुळे, साम्यवादाच्या वाढत्या प्रभावामुळे आणि जपानी आक्रमणाच्या भीतीमुळे अनेक गोरे लोक चीन सोडून गेले. पर्ल आणि जॉन बक यांचं वैवाहिक जीवन फारसं समाधानाचं नव्हतं. ती दोघं विभक्त झालेली होती. तेव्हा घटस्फोट घेऊन अमेरिकेत कायमचं राहायला जाण्याचा निर्णय पर्लनं घेतला आणि ती अमेरिकेला आली.

यानंतर तिच्या लेखनाच्या दुसऱ्या पर्वाला प्रारंभ झाला असं म्हणता येईल. आतापर्यंतचं तिचं लेखन बहुतांशी चिनी पार्श्वभूमीवरचं, चिनी विषयांसंबंधीचं होतं. अमेरिकेत आल्यावर तिची अमेरिकन पार्श्वभूमीवरच्या लेखनाला सुरुवात झाली.

यामध्ये 'धिस प्राऊड हार्ट' या कादंबरीचा विशेष उल्लेख करावा लागतो. एका अतिशय बुद्धिमान कलावंत स्त्रीच्या आयुष्यात या कलागुणामुळे कला, सर्जनशीलता, सर्जनाची गरज आणि घर, मुलंबाळं, पुरुषाची गरज असा उठलेला संघर्ष, या स्त्रीची मानसिक कुचंबणा, सुरुवातीला असलेला आत्मविश्वासाचा अभाव आणि या साऱ्यातूनही हळूहळू झालेला तिच्या सर्जनशील कलावंत व्यक्तिमत्त्वाचा विकास हे या कादंबरीचं

ढोबळ सूत्र सांगता येईल. ही कादंबरीसुद्धा निर्दोष आहे असं नाही, पण एका बुद्धिमान आणि कलावंत स्त्रीची कुतरओढ हा विषय अतिशय ताकदीनं आणि अनुभवी हातानं हाताळणं आवश्यक होतं आणि ते पर्लला इथं जमलं आहे, असं म्हणायला काहीच हरकत नाही.

नोबेल पारितोषिक समिती जेव्हा पर्ल बकचा विचार करू लागली, तेव्हा त्यांच्या नजरेसमोर प्रामुख्यानं तिची नऊ पुस्तकं होती. इस्ट विंड वेस्ट विंड, हाऊस ऑफ अर्थ मालिका, मदर, दोन्ही चरित्रं, मिशनरी आयुष्यावरची एक लघुकादंबरी आणि 'धिस प्राऊड हार्ट'.

हे पारितोषिक जाहीर झाल्यानंतर नेहमीप्रमाणेच आरोप-आक्षेपांचा धुरळा उडाला. परंतु बहुसंख्य सामान्य वाचकांना हे पारितोषिक अतिशय योग्य असंच वाटलं.

यानंतरचं पर्ल बकचं लेखन अक्षरशः अफाट आहे. इतकं प्रचंड लेखन करीत असतानाच तिचं सामाजिक कार्यही चालूच होतं. किंबहुना तिच्या स्वभावातला हा माणुसकीचा खळाळता झराच तिच्या लेखनाचं जीवन होता असं म्हटलं पाहिजे. पुढे पुढे या माणुसकीनं खूपच आग्रही रूप धारण केलं आणि मग पर्लचं लेखनही प्रचारकी थाटाचं, आक्रमक होऊ लागलेलं आपल्याला दिसतं.

सुरुवातीला मी म्हटलं की पर्ल बकबद्दल सामान्य वाचकाला फारसं माहीत नाही. पण त्यानं जेवढं वाचलेलं आहे, तेवढं मात्र त्याच्या मनात घर करून राहिलेलं आहे हेही तितकंच खरं.

भारतीय वाचकाला तिचं चिनी जीवनावरचं लेखन अधिक आकृष्ट करतं, याचं कारण म्हणजे शेतकऱ्याचं कष्टमय खडतर जीवन किंवा आईचं प्रेम अशासारखे सार्वकालिक, सार्वजनिक विषय, एवढंच नव्हे, तर चिनी आणि भारतीय संस्कृतीत, जीवनपद्धतीत जे कमालीचं साधर्म्य आहे हे आहे. कृषिप्रधान संस्कृतीतली आणि जीवनपद्धतीतली सारी सुखदुःखं अगदी आपली स्वतःची असल्यासारखी तिच्या कादंबऱ्यांमधून स्पष्ट उभी राहतात. आपण स्वतःचीच गोष्ट वाचतोय असं वाटायला लागतं. तिची सगळी काल्पनिक पात्रं आपल्याला खरीखुरी कुठेतरी भेटली आहेत याची खात्री पटायला लागते. पर्ल बकच्या स्वभावचित्रणात किंवा वातावरणनिर्मितीमध्ये जो एक सच्चेपणा आहे, तोही गेली कित्येक वर्षं जगभरच्या वाचकाला मोहवून टाकण्याचं एक महत्त्वाचं कारण आहे. म्हणूनच टीकाकारांच्या मताला न जुमानता पर्ल बकच्या साहित्यातल्या अनेक ढोबळ दोषांकडे, त्रुटींकडे दुर्लक्ष करून सामान्य वाचक तिचा सर्वांत मोठा चाहता ठरलेला आहे.

(३५० सिंध कॉलनी, औंध, पुणे-७)

डॉ. यू. म. पठाण

# मराठी व्याकरणात रमलेले अभ्यासक

मो. रा. वाळंबे आणि मराठी शुद्धलेखन हे समीकरण गेल्या चार-पाच दशकांत जसं रूढ झालं होतं, तसंच वाळंबे आणि मराठी व्याकरण हे समीकरणही रूढ झालं होतं. व्याकरण नि शुद्धलेखन यांसारख्या रूक्ष विषयांना आजन्म वाहून घेणारी माणसं सध्या महाराष्ट्रात किती आहेत, याची गणती आपण करू लागलो तर हाताची पाच बोटंही जास्त वाटावीत, अशी आजची स्थिती आहे. त्यामुळे वाळंबे यांच्या निधनाचं नि त्यामुळे निर्माण होणाऱ्या या क्षेत्रातील पोकळीचं दुःख विशेष वाटतं. मराठी भाषेच्या कुणाही अभ्यासकाला नि शिक्षकाला तसं ते निश्चितपणे वाटेल, पण मला वाटणाऱ्या दुःखाची अनेक कारणं आहेत.

मो. रा. वाळंबे हे माझे शिक्षकही होते. साताऱ्याच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्ये मी एकोणीसशे चव्वेचाळीस-पंचेचाळीस साली होतो. म्हणजे उण्यापुऱ्या चाळीस-बेचाळीस वर्षांपूर्वी मी शिकत होतो, त्या वेळेपासून गुरू-शिष्य या नात्यानं त्यांचा नि माझा संबंध आला. ते विख्यात कादंबरीकार प्रा. ना. सी. फडके यांचे 'लेखक'ही होते. त्यांचं जांभळ्या शाईतलं अत्यंत नीटस रेखीव अक्षर अजून माझ्या डोळ्यांपुढून जात नाही. गंमत अशी की शाईत कालमानानुसार बदल झाला - म्हणजे जांभळ्या शाईतून ते निळ्या शाईत आलं - तरी त्याचं वळण आयुष्यभर तसंच आखीव- रेखीव नि देखणंच राहिलं. नीटसपणा हा त्यांच्या स्वभावातच मुरलेला. साताऱ्याच्या शाळेत शिक्षक असताना नि पुढं पुण्याच्या टिळक रोडवरच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्ये असतानाही. अजूनही मी गुरुवर्य वाळंब्यांची आकृती डोळ्यांसमोर आणण्याचा प्रयत्न केला, तर ती कोट-पँटमधली, सुटाबुटातली नि टापटिपीचीच असते.

साताऱ्याच्या शाळेत असताना त्यांनी आम्हाला व्याकरणाचे नि शुद्धलेखनाचे धडे दिले, त्याचप्रमाणं आमच्या पिढीमध्ये मराठी वाङ्मयाची अभिरुचीही जोपासली. आपण प्रा. ना. सी. फडके यांचे 'लेखक' होतो, हे सांगताना त्यांना मोठा अभिमान वाटे. फडक्यांसारखं लेखन त्यांनी केलं नसलं, तरी फडक्यांच्या सहवासामुळं त्यांचं वाचन मात्र अफाट झालं होतं. अलीकडे प्रसिद्ध झालेल्या साहित्यातलं काय वाचावं, याचे निर्देश त्यांच्या अध्यापनात सहजीच येऊन जात. त्या काळातल्या पाचवी-सहावीतली - म्हणजे आजच्या आठव्या-नवव्या इयत्तेतली आम्ही मुलं. माझ्याबरोबर त्या काळात प्रा. पंडितराव शेटेही होते (याच

पंडित शेट्यांनी पुढं 'सत्यकथे'त कथालेखन नि पु. शि. रेग्यांच्या 'छंद'- मध्ये समीक्षालेखन केलं. लेखणीला बहर आला असतानाच, दुर्दैवानं एका अपघातात त्यांच्या जीवनाचा अकाली अस्त झाला.) वाळंबे त्या काळात प्रा. फडक्यांप्रमाणं गुजगोष्टी नि लघुनिबंध लिहीत असत. ते कोल्हापूरच्या 'महाद्वार' सारख्या छोट्या-मोठ्या मासिकांत प्रसिद्ध झाल्याची अपूर्वाई जशी त्यांना वाटे, त्यापेक्षाही आम्हा विद्यार्थ्यांना अधिक वाटे. आम्हा विद्यार्थ्यांना ते 'लिहितं' करीत. विविध लेखनस्पर्धांमधे भाग घ्यायला प्रवृत्त करीत. त्यांच्या काळात मला सातारच्या न्यू स्कूलमध्ये कितीतरी स्पर्धांची पारितोषिकं मिळाली. 'शिवरायांच्या जीवनातील एक अविस्मरणीय प्रसंग' या विषयापासून 'बाळ अन् बापू' (म. गांधी आणि लो. टिळक) या विषयापर्यंत.

मला अजून आठवतं– आम्ही 'साहित्य - निर्झर' नावाचं एक हस्तलिखित काढलं होतं. त्याचा संपादक मी होतो नि पंडितराव शेटे होते उपसंपादक. वाळंब्यांच्या मार्गदर्शनाखाली तब्बल दोन-तीन महिने या हस्तलिखिताची जुळणी – संपादणी चालली होती. आता हा 'निर्झर' सातारच्या शाळेच्या सहावी 'ड' च्या जुन्यापुराण्या कागदपत्रांत असेल-नसेलही. पण त्यानं आमच्याकडून लेखनाचं वळण खूपच गिरवून घेतलं. मराठी साहित्याची अभिरुची काही लोक समजतात तसं 'शुद्धलेखन एके शुद्धलेखन' किंवा 'व्याकरण एके व्याकरण' असं वाळंब्यांचं व्यक्तिमत्त्व एकारलेलं नव्हतं. ते जसे लघुनिबंध लिहीत तसेच शिकारीलाही जात. वऱ्याच जणांना हे मोठं अप्रूप वाटे. शिकारीतले बारकावे त्यांनी मोठ्या कौशल्यानं आत्मसात केले होते. लेखणी मोठी की बंदूक, असे वाद एके काळी गाजले असतीलही, पण वाळंब्यांनी त्या दोहींना उदार आश्रय दिला. त्यातून त्यांच्या कितीतरी शिकार-कथा जन्मल्या. भानू शिरधनकरांइतके नसले, तरी या शतकाच्या चौथ्या-पाचव्या दशकातले ते एक नावाजलेले शिकार-कथाकार होते, व 'किर्लोस्कर'-सारख्या मासिकातून त्यांचं हे लेखन प्रसिद्ध होत असे, हे आज कुणाला खरं देखील वाटणार नाही. शिकारीचं एवढं वेड असूनही वाळंबे पूर्णपणे शाकाहारी होते, हे त्यातलं आणखी एक आश्चर्य !

पुण्याच्या वसन्त व्याख्यानमालेच्या संयोजनात तो म. श्री. दीक्षितांप्रमाणंच समरस होत. खरं तर व्याख्यानमालेचं महिनामहिनाभर संयोजन हे मोठं जिकिरीचं नि दगदगीचं काम. पण दीक्षित– वाळंबे या युतीनं हे काम मोठ्या कौशल्यानं, व्याख्यानमालेचा स्तर ढळू न देता, वर्षानुवर्षं पार पाडलं.

सातारच्या शाळेत असताना मी फार अबोल होतो. व्यासपीठाच्या आसपासही मी फिरकत नसे. पुण्याच्या वसंत व्याख्यानमालेत मी जी व्याख्यानं दिली, त्या साऱ्यांना वाळंबे आवर्जून उपस्थित असायचे. माझं तोंडभर कौतुक करायचे. सातारचे 'ते' दिवस नि

पुण्याच्या वसंत व्याख्यानमालेचे 'हे' दिवस यातलं अंतर जसं नि जितकं मला जाणवे तसं नि तितकंच वाळंब्यांनाही जाणवे. त्यांचं अपार शिष्यप्रेम त्यांच्या जाड भिंगांच्या चष्म्यांतूनही ओसंडत असे. पुणे ते सातारा नि सातारा ते पुणे हा प्रवास आम्ही दोघंजण मनोमन केव्हा करीत असू, ते आमचं आम्हालाही कळत नसे.

योगायोग असा की, साताऱ्यानंतर अनेक वर्षांनी पुण्यात मला वाळंब्यांचा पुन्हा प्रदीर्घ सहवास लाभला. 'बालभारती' या मराठी पाठ्यपुस्तकांच्या संपादन- समितीचा मी अध्यक्ष होतो नि वाळंबे निवृत्तीनंतर या समितीचं काम पाहत होते. माझे स्नेही व ज्येष्ठ ग्रामीण कथाकार शंकरराव पाटील या समितीचे सदस्य- सचिव होते. खरं तर माझी अवस्था मोठी अवघड होती, कारण मी वाळंब्यांचा एके काळचा विद्यार्थीच होतो, पण वाळंब्यांनी हे अवघडपण त्यांच्या खेळीमेळीच्या स्वभावानं कधीच जाणवू दिलं नाही. पाठ्यपुस्तक मंडळाच्या पाचव्या, सहाव्या व सातव्या इयत्तेसाठी त्यांनी सोपी व्याकरणाची पुस्तकं लिहिली. कधी कधी पारंपरिक मतांचा ठसा त्यांच्या विचारसरणीत नि चर्चेत उमटे, पण योग्य अशा नवीन मतप्रवाहांचं आगत-स्वागत करण्याचं मनाचं मोठेपणही त्यांच्यात होतं. महामंडळाच्या शुद्धलेखन- समितीतही त्यांनी सदस्य म्हणून अनेक वर्षं काम केलं. त्यातही त्यांच्या या समन्वयशील प्रवृत्तीचा प्रत्यय समिती-सदस्यांना निश्चितपणे आला असावा. जुनं(मुंबई विद्यापीठाचं) मराठी शुद्धलेखन, महाराष्ट्र साहित्य परिषदेचं नवीन मराठी शुद्धलेखन नि अ. भा. मराठी-साहित्य महामंडळ- पुरस्कृत लेखन यांतील नियमांचे बारकावे प्रा. अरविंद मंगरूळकरांप्रमाणेच वाळंब्यांनाही ज्ञात होते. प्रा. मंगरूळकरही 'बालभारती'च्या समितीत माझ्याबरोबर होते. त्यांची नि वाळंब्यांची लेखनविषयक नियमांविषयीची नि मराठी व्याकरणाच्या वादांविषयीची जुगलबंदी तास न् तास चाले नि दोघेही पुन्हा समेवर येत. मराठी लेखन नि लेखनविषयक नियम हा खरं तर मराठीच्या अध्यापकांचा जिव्हाळ्याचा नि नित्य चिंतनाचा विषय असायला हवा, पण याविषयी बऱ्याचदा फार अरुची असल्याचा प्रत्यय येतो. वाळंब्यांनी या विषयालाच आपलं सारं आयुष्य वाहिलं होतं असं म्हटलं तर ते वावगं ठरू नये. त्यांची व्याकरणविषयक नि लेखन नियम विषयक पुस्तकं याची साक्ष देतील.

व्याकरणविषयक नि लेखनविषयक नियम हे काहीसे रूक्ष असले, तरी त्यांतली रूक्षता नि कोरडेपणा वाळंब्यांच्या व्यक्तिमत्त्वात उतरला नव्हता. वागण्याबोलण्यात ते दिलखुलास होते. उत्तर आयुष्यात, निवृत्तीनंतर त्यांच्या व्यक्तिमत्त्वात कालानुरूप परिवर्तन घडू लागलं होतं. सुटाबुटाऐवजी ते बुशशर्ट नि पँटमध्ये वावरू लागले होते. परदेशाहून परतल्यावर ते झुळझुळीत इम्पोर्टेड बुशशर्ट किंवा नॅरो बॉटमची अल्ट्रामॉडर्न पँट घालून कधी कधी 'बालभारती'तल्या मराठी समितीच्या सभांना यायचे. त्या वेळी शंकर पाटील त्यांच्याकडे

मिष्किलपणे पाहत. ते काही बोलणार तोवर वाळंबे स्वतःच हसून म्हणायचे, 'तुम्हा साऱ्यांच्या मनात काय दडलंय ते ठाऊक आहे मला,' असे म्हणून तेही दिलखुलास हसायचे. व्याकरणाच्या नियमांच्या माळरानांतही कधी कधी हिरवळ तरारून जायची ती अशी.

वाळंब्यांची नि माझी शेवटची भेट झाली ती पुण्याच्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनात. या संमेलनाचा मी अध्यक्ष होतो नि त्यातच काही ज्येष्ठांचा सत्कार होणार होता. वाळंब्यांचाही सत्कार या वेळी झाला. निवेदकानं चुकून असं म्हटलं,'आणि योगायोग असा की आजचे संमेलनाध्यक्ष डॉ. पठाण हे मो. रा. वाळंबे यांचे गुरू आहेत.' त्या वेळी मी तावडतोब दुरुस्ती केली होती नि म्हटलं होतं की 'तुम्ही बरोबर उलट बोललात. मो. रा. वाळंबे हेच माझे गुरू आहेत. त्यांचा सत्कार करण्याचा योग यावा, यापेक्षा शिष्याच्या आयुष्यातला आनंदाचा प्रसंग आणखी कोणता असू शकेल ?'

(२, आनंदनगर, टाउन हॉल, औरंगाबाद ४३१ ००१)

# विनोद-विडंबनपर काव्ये :. टीकेचा वेगळा नमुना

इ.स. १९२० ते १९४५ या कालखंडातील काव्याचा विचार करताना या कालखंडात मोठ्या प्रमाणावर लिहिल्या गेलेल्या विनोद-विडंबनपर कवितांकडे 'काव्यविषयक टीकेचा वेगळा नमुना' म्हणून पाहणे आवश्यक ठरते.

मराठी काव्यक्षेत्रात विनोदी काव्याचा प्रवाह या कालखंडात नव्याने रुजू झाला. त्या प्रवाहाची सुरुवात केशवकुमार ऊर्फ प्र. के. अत्रे यांच्या 'झेंडूची फुले' (१९२५) या संग्रहामुळे झाली. हा संग्रह त्या काळात अतिशय लोकप्रिय ठरला आणि त्याच वेळी काही प्रस्थापित साहित्यिकांच्या रोषासही पात्र झाला. या संग्रहाच्या इ. स. १९४५ पर्यंत तीन आवृत्त्या प्रसिद्ध झाल्या असून त्यांतील संग्रहित काव्याची संख्या ९ पासून ३१ पर्यंत अशी वाढत गेलेली दिसते. (संदर्भ : प्रस्तुत संग्रहाची स. गं. मालशे यांनी संपादित केलेल्या आवृत्तीची प्रस्तावना)

रविकिरण मंडळ, इतर कविमंडळे, काही प्रस्थापित लोकप्रिय कवी, अनेक कविब्रुव आणि त्या काळचे सर्वसाधारण काव्यविषयक वातावरण यांच्यातील डोळ्यांत भरणाऱ्या विसंगती वेगळ्या पद्धतीने लक्षात आणून देण्याचा अभिनव प्रकार म्हणून 'झेंडूची फुले' ला महत्त्व येते. केशवकुमारांनी आखून दिलेला हा मार्ग अनेक कवींनी आपापल्या कुवतीनुसार चोखाळला. वाङ्मयाच्या इतिहासात यापैकी मुख्यतः 'झेंडूची फुले' व 'उपहासिनी' सारख्या एखाददुसऱ्या पुस्तकाला स्थान मिळाले. परिणामी या कालखंडातील इतर अनेक विनोदी काव्यसंग्रह उपेक्षित राहिले. त्यांचाही विचार करणे वाङ्मयेतिहासदृष्ट्या व काव्यदृष्टीचा मागोवा घेताना आवश्यक ठरते.

या कालखंडात विनोद-विडंबनपर काव्यसंग्रह पुढीलप्रमाणे आहेत :

१) 'झेंडूची फुले' : संग्रा. केळकर दि. गं., सारस्वत प्रकाशक मंडळ, पुणे, १९२५ (केशवकुमार या कविनामाचा उल्लेख दुसऱ्या आवृत्तीत आहे.)

२) 'शंखध्वनि अथवा बोंबाबोंब'. मनमोहन, पुणे, १९३२.

३) 'कॉलेजचे विश्व' (विनोदी खंडकाव्य). चं. ग. दीक्षित, पुणे, १९३४.

४) 'संराक', संतुराम रामकृष्ण कर्णिक, कोल्हापूर, १९३४.

५) 'गाजराच्या पुंग्या' (अनेक कवींच्या विडंबनकवितांचा संग्रह), प्रका. आर. बी. समुद्र,

शारदामंडळ प्रकाशन, पुणे, १९३५

६) 'दर्यातील खसखस', शारदामंडळ, पुणे, श. १८५८

७) 'बांडगूळ', चं, ग. दीक्षित, पुणे, १९३५

८) 'उपहासिनी' संपा. दि. वि. देव, प्रका. य. गो. जोशी, पुणे, १९३६

९) 'आपट्याची पाने', गो. ल. आपटे, भ्रमरमंडळ, पुणे, १९३७

१०) 'विनोदिनी', वसंत वैद्य, ठाणे, श. १८६०

११) 'गालावरचे गुलाब', शं. द. भोसले, कोल्हापूर, १९३९

१२) 'चिंचा आणि बोरें', साठे शं. गो, पुणे, १९४५

१३) 'मुंग्यांचे वारूळ', बाबुलनाथ, १९४५

१४) 'बाहेरचा वारा', शं. द. भोसले, मुंबई, १९४५

१५) 'अफूच्या गोळया', मनमोहन, राहुकेतूमंडळ, पुणे.

काही विनोदी कवितांचा समावेश असलेले महत्त्वाचे काव्यसंग्रह पुढीलप्रमाणे आहेत:

१) 'बीजेची कोर', गो. गो. अधिकारी, पुणे, १९२६

२) 'पोपटपंची', ज. के. उपाध्ये, पुणे, १९२९

३) 'आकाशगंगा', बाबुलनाथ, प्रका. काळे ब्रदर्स, पुणे, १९३५

४) 'चांदरात', अनंत काणेकर, रामकृष्ण बुक डेपो, मुंबई, १९३३

५) 'प्राजक्ताची फुले', श्रीनिवास पाटणकर, प्रका. दा. पां. रानडे, पुणे, १९३७

६) 'अर्धचंद्र', पंडित सप्रे, प्रकाशमंडळ, पुणे, १९३८

७) 'स्मृतिकुंज', दत्तोपंत हर्णे, संपा. गोविंद झोकरकर, नागपूर, १९४४

याशिवाय तुरळक विनोदी कविता लिहिणारे कवी संख्येने पुष्कळ आढळतात.

**'गाजराच्या पुंग्या' : काही निरीक्षणे**

केशवकुमारांच्या खालोखाल विनोदी कवी म्हणून प्रसिद्धी मनमोहनांना होती, हे 'गाजराच्या पुंग्या'चे संपादकीय निवेदन वाचताना लक्षात येते. मनमोहन 'तेज' या दैनिकात रोज विनोदी कविता लिहीत असत. त्यांचे स्वतंत्र संग्रहही प्रसिद्ध होते. त्यात त्यांनी केशवकुमारांचे अनुकरण मोठ्या प्रमाणावर केलेले दिसते. उदाहरणार्थ, मनमोहनांच्या 'अफूच्या गोळया' यात 'झेंडूची फुले'मध्ये पहिल्या आवृत्तीत जशी प्रत्येक कवितेसाठी कवीची वेगवेगळी टोपणनावे आहेत, तसाच प्रकार गिरवला आहे.

मनमोहनांचे एक विद्यार्थी असलेले आर. बी. समुद्र यांनी संपादित केलेले 'गाजराच्या पुंग्या' हे पुस्तक अनेक विनोदी कवितांचा पहिला संपादित संग्रह ठरतो. त्यासाठी वर्तमानपत्रात जाहिरात देऊन कविता मागवल्या होत्या. त्याला प्रतिसाद मिळून आलेल्या

३२५ कवींच्या कवितांपैकी परीक्षकमंडळाने निवडलेल्या १०५ कविता यात समाविष्ट आहेत. यात बृहन्महाराष्ट्रातील अनेक कवी असून अनेक कवींचे फोटोही छापले आहेत. तसेच अनेक मान्यवरांकडून आलेल्या पत्रांचा हवाला देऊन १) केशवकुमार, २) मनमोहन, ३) चं. ग. दीक्षित अशी सर्वानुमते कवींची क्रमवारी ठरवलेली आहे. हे पुस्तक मनमोहनांना अर्पण केलेले आहे.

या पुस्तकात मनमोहन, ना. गं. लिमये, शं. द. भोसले, गो. ल. आपटे, पंडित सप्रे, वसंत वैद्य, मायदेव अशा अनेक कवींच्या कविता आहेत; पण केशवकुमारांची एकही कविता नाही. त्यामुळे की काय कोण जाणे, 'उपहासिनी' च्या प्रस्तावनेत अत्रे यांनी 'गाजराच्या पुंग्या'चा नामोल्लेखही न करता या संग्रहावर टीका केली आहे : 'नुकताच विनोदी काव्यांचा जो एक घाणेरडा संग्रह प्रसिद्ध झाला, त्याच्या संपादक-प्रकाशकांची अभिरुची पाहण्यासारखी आहे.' (प्रस्तावना, पृ. १५)

आज विचार करताना वरील सर्व काव्यांमधे त्या काळच्या कोणत्या कवींच्या कोणत्या कवितांचे विडंबन आहे, या तपशिलांपेक्षा त्यातून कोणत्या काव्यप्रवृत्ती हास्यास्पद ठरवल्या गेल्या, हे पाहणे उद्बोधक ठरते.

**विडंबने :**

या काव्यांमध्ये माधव ज्यूलियन, यशवंत यांच्या बरोबर आधीच्या पिढीतील गोविंदाग्रज, बालकवी, तांबे यांच्याही कवितांची विडंबने झालेली दिसतात. यशवंतांच्या सुप्रसिद्ध 'आई' कवितेचे विडंबन करताना हर्णे यांनी आईच्या जागी 'पत्नी'ला उभे केले आहे ('स्मृतिकुंज', पृ. ३४-३६), तर दीक्षितांनी 'स्वयंपाकीण' उभी केली आहे. ('बांडगूळ', पृ. २६-२९)

*ये ये निघून वेगें सुकलेंत शेंगदाणे*
*मी रोज वाट पाही भिजवून साबुदाणे*

हा दीक्षितांचा सूर 'आई' मधील आर्ततेच्या अतिरंजित सुराला चांगला उतारा आहे. यशवंतांच्या 'प्रेमाची दौलत' या कवितेची दोन विडंबने झालेली दिसतात. 'उपहासिनी'त गोविंद झोकरकर यांनी केलेले 'माझी दौलत' (पृ. ४४-४५) हे विडंबन समाविष्ट आहे. त्यात तिच्यासाठी झुरणारा तो, अशी बदललेली जोडी असून

*'गंगावन हे जुनं तुझ्या डोईचं' !*
*'पिंजारित बसतो, होतं हासं माझं !'*

अशी अतिशयोक्ती साधून अतिभावुक प्रेमाची खिल्ली उडविली आहे. 'प्रेमाची दौलत' याच शीर्षकाचे विडंबनगीत लिहिताना शं. द. भोसले ('गालावरचे गुलाब', पृ. १६) यांनीही असाच प्रयत्न केला आहे. साध्या कौटुंबिक भावनांचे चित्रण अतिउदात्त पातळीवर

करण्याच्या प्रयत्नांत यशवंतांची कविता कोठे फसते, हे येथे अप्रत्यक्षपणे सुचवले आहे.

माधव ज्यूलियनांची मिश्रशैली, इंग्रजी शब्दांसाठी मराठी प्रतिशब्द योजण्याचा अट्टाहास आणि त्यांचा प्रेमविषयक दृष्टिकोन यांचे त्या काळात मोठ्या प्रमाणात विडंबन झालेले दिसते. केशवकुमारांची 'श्यामले' व अनंत काणेकरांची 'बेगमेच्या विरहगीताला शिवाजीचे उत्तर' सारख्या कविता अशा विडंबनांचे प्रातिनिधिक नमुने ठरतात. ज्यूलियनांच्या 'तेथे चल राणी' मधील रोमँटिक सूर त्या काळात लोकप्रिय ठरला होता. त्या प्रकारच्या अनेक कविता इतर कवींनी लिहिलेल्या दिसतात. त्यामुळेच बहुधा राजा बढे यांनी 'देणे थकल्यावर' ('उपहासिनी' पृ. ५४) मधे वास्तवाचा छेद देऊन त्या कवितेचे अचूक विडंबन साधले आहे. 'उपहारगृही जावूं असो हिंदू-इराणी। तेथे चल राणी' असे म्हणत कवीने ज्यूलियनांची आठवण करून देत मूळ कवितेतील स्वप्नाळूपणा आणि व्यवहारातील पलायनवाद यांची मजेदार सांगड घातली आहे.

भा. रा. तांबे यांच्या 'कुस्करू नका ही सुमने' चे 'कुस्करू नका हा चिवडा' ('शंखध्वनि'- मनमोहन) हे विडंबन करताना कवीने चाल मसालेदार असे लिहून कवितेला राग, चाल देण्याच्या पद्धतीचेही अनुकरण साधले आहे. तसेच तेथेच 'डोळे हे जुल्मी गडे' या त्यांच्या कवितेचे 'डोळे हे चकणे गडे। रोखुन मज पाहू नका!' असे विडंबन करण्यापूर्वी कवीचे टोपणनाव मोतिबिंदू असे नमूद केले आहे. यात विडंबनापेक्षा खट्याळपणाच जास्त जाणवतो. अर्थात तांब्यांच्या कवितेतील लाडिक आर्जवी सूर व्यवहारी पातळीवर कसा हास्यास्पद ठरतो, हे यातून प्रत्ययाला येते.

गोविंदाग्रजांच्या 'प्रेम आणि मरण' या कवितेची अनेक विडंबने झालेली दिसतात. 'प्रेम आणि मरण' मधील प्रियकराचे आदर्शवत जीवन, उदात्त मूल्य म्हणून प्रेमाचा त्याने निष्ठेने केलेला स्वीकार आणि त्यातील जगावेगळे साफल्य या साऱ्याच गोष्टी ठसठशीतपणे जाणवाव्या अशा आहेत. काणेकरांच्या 'प्रेम आणि पतन' ('चांदरात') मध्ये या अपवादात्मक प्रेमवीराला व्यवहारात प्रत्यही येणारा अनुभव शब्दबद्ध होतो, तर कर्णिक यांच्या 'कवि आणि मरण' या कवितेत गोविंदाग्रजांच्या कवितेचा बाह्य साचा वापरून 'स्फूर्ती'चे अवास्तव स्तोम माजवणाऱ्या कवीचे हसे केले आहे. ते असे–

*धावलि उताविळ होत।*
*स्फूर्तीची जळती ज्योत। त्यांकडे। ('सरांक', पृ.११)*

'उद्ध्वस्त फलाट' या बा. श्री. पुरोहितकृत विडंबनात तुफान वेगाने धावणारी गाडी थांबावी म्हणून झुरणाऱ्या लहानशा स्टेशनच्या फलाटाची मनःस्थिती चित्रित केली आहे ('गाजराच्या पुंग्या'). बदलत्या वास्तवाची नोंद घेऊन यंत्रयुगातील वस्तूंची प्रेमकथा लिहून त्यात हसे साधले आहे.

बालकवींच्या कवितेत आढळणाऱ्या उत्प्रेक्षांची मालिका गुंफण्याच्या प्रवृत्तीचेही अनेक कवितांमध्ये विडंबन झाले आहे. केशवकुमारांच्या 'अरुण' प्रमाणेच 'गाजराच्या पुंग्या' मधील 'दूधसागरास' (कवी वामन) आणि 'विनोदिनी' मधील 'तारका' यात काव्यात्म कल्पनांची रास रचण्याचे हसे केले गेले आहे. त्यासाठी कल्पनाशक्ती स्वैर सोडून वसंत वैद्यांनी 'तारका' मध्ये लिहिले आहे–

*सती रुक्मिणी ताक घुसळिता पाकमंदिरात*
*आकाशाच्या भिंतीवरती शिंतोडे उडत ! ('विनोदिनी' पृ.६)*

मुक्तछंद ही बाब या कालखंडात वादविषय ठरली होती. अनिल व वा. ना. देशपांडे यांनी त्या कालखंडात स्वतंत्र शैलीत विपुल मुक्तछंदात्मक रचना केली होती. त्यांपैकी वा. ना. देशपांडे यांच्या मुक्तछंदातील 'नंदनवन मुकल्यावर' ची दोन विडंबने झालेली पाहायला मिळतात. 'एक काव्य-प्रकार' ('उपहासिनी', पृ. ६९-७०) ही केशवकुमारांची कविता सरकारी कचेरीतील दोन कारकुनांचे संभाषण देते, तर 'चांदरात' मधील 'पगारातला शेवटचा पैसा संपल्यावर' ही काणेकरांची कविता आधुनिक इव्ह व ॲडम यांच्या संभाषणाची वीण योजते. दोहोंमधून नाट्यकाव्य या रूपात व मुक्तछंदातील संवादाच्या पोतामध्ये कृत्रिमता कशी येऊ शकते, यावर नकळत प्रकाश पडतो.

चं. ग. दीक्षितांचे 'कॉलेजचे विश्व' हे विनोदी खंडकाव्य ज्यूलियनांच्या 'सुधारक'च्या धर्तीवर घेतलेले आहे. 'सुधारक' प्रमाणे तुतारी वृत्तात लिहिलेल्या या काव्यात ज्यूलियनांच्या शैलीचे व प्रेमविषयक दृष्टिकोनाचेही विडंबन केले गेले आहे. काही ठिकाणी ज्यूलियनांच्या वैयक्तिक जीवनाचे संदर्भ आल्यामुळे त्यातील कलात्मता उणावली आहे. कवीने त्यात महाविद्यालयीन वातावरण, त्यातील मोकळेपणा व दडपणे, प्रेम करण्याच्या नाना तऱ्हा, विद्यार्थ्यांच्या खासगी गप्पांचे विषय, त्यातील शेरेबाजी अशांतून एक कथा मांडली आहे. त्यात जाता जाता तत्कालीन कवितेवर टीकाही आहेच. उदा. " 'अन्' म्हणजे माधव ज्यूलियन" (पृ. २८)

**विनोदविषयांचा परीघ :**

या काव्यांमध्ये विनोदविषय झालेल्या गोष्टींचा परीघ लक्षात घेता त्यांपैकी मोठी जागा कवी आणि प्रेमवीर यांनी व्यापलेली दिसते. किंबहुना कवी आणि प्रेमी हे दोन वेगळे घटक न उरता 'प्रेमकवी' असेच रूप अधिकतः दृष्टीस पडते. कवींचे एकूणच जगणे– त्यांच्या लकबी, त्यांचा कवी दिसण्याचा अट्टाहास, त्यांचे काव्यगायन, त्यांची सुमार दर्जाची रचना, त्यांचे व्यवहारातील वर्तन– विनोद विषय ठरले आहे. 'झेंडूची फुलें'तील 'आम्ही कोण' आणि 'नवरसमंजिरी' या केशवकुमारांच्या कवितांप्रमाणेच ज. के. उपाध्ये यांच्या



अनुक्रमणिका

'पोपटपंची' मधील 'चहा-टळपणा', 'शाहीर', 'कविते ! करिन तुला मी ठार' या कविता; बाबुलनाथांच्या 'आकाशगंगा' मधील 'कवि आणि वस्ताद', 'कवि आणि मर्कट' या कविता. गो. ल. आपटे यांच्या 'आपट्याची पाने' मधील 'एखाद्याचं नशीब', 'अखेरची आशा' या कविता तसेच 'उपहासिनी' मधील निशिगंधांचे 'माझे काव्यगायन', वोवडे यांची 'अरे ! आला कवि' आणि चं. ग. दीक्षितांची 'मी कवयित्री' या कविता– अशी कितीतरी मोठी यादी देता येईल.

तत्कालीन काव्यसंग्रहातील कवींचे लांबलचक निवेदन हे हास्यविपय ठरले होते. त्यामुळे बाबुलनाथ यांनी 'आकाशगंगा'च्या सुरुवातीला 'जरूर तेच' आणि पंडित सप्रे यांनी शेवटी 'सुटलो बुवा' ('अर्धचंद्र') असे लिहून त्याचीही टर उडवली आहे.

कवींच्या प्रसिद्धीलोलुपतेचे खरपूस शब्दांत घडवलेले दर्शन श्रीनिवास पाटणकरांच्या 'प्राजक्ताची फुले' मध्ये वाचायला मिळते. त्यातील 'फोटोसाठी अधीर झालेल्या लेखिकेप्रत' (पृ.४७-५०) या कवितेत केशवकुमारांच्या 'कषायपेयपात्रपतितमक्षिकेप्रत' च्या शैलीचे हुवेहूब अनुकरण केले आहे.

*अयि विशाल कवित्व विभूषिते,*
*यमक-प्रास-खुशाल श्रुंगारिते,*
*हे मराठी-कविता-नभ-तारके*
*वद तुझें मुख कां दिसतें फिकें !*

अशा प्रश्नाने सुरू झालेली ही कविता

*फड फड फड लगे अंचला हालवाया*
*तडफड बहु केली जाहले कष्ट वाया*
*अपटित इवलेसे पाय, ती आंत गेली*
*अहह तडक आणी चालती पार झाली !*
*टाकुनी लांब सुस्कारा । उमाळा दाबुनी उरी*
*चित्र तें शांत चित्ताने । पाहिलें वरचेवरी ।*

अशा सुरात संपते. येथे सर्वसामान्य कविप्रवृत्ती जर हास्यास्पद ठरतातच. त्याचबरोबर त्या कालखंडात नव्याने लेखनक्षेत्रात उतरलेल्या हौशी स्त्रियांना स्त्रीदाक्षिण्या (!) पोटी मिळणारे काहीसे झुकते मापही नकळत टीकाविषय ठरते.

प्रेमकवीचा उपहास करताना 'अग एऽऽ !' या कवितेत ('विनोदिनी', पृ. १३-१४) वसंत वैद्यांनी प्रेयसीला काव्यात्म नावांनी हाका मारण्याच्या प्रयत्नात शेवटी कवीला 'कवीची शोक जन्मरास' हा अनुभव कसा येतो, याचे मिस्कीलपणे चित्रण केले आहे, तर चं. ग. दीक्षितांनी,

*पहा ! ढांस उठे, घेई खडिसाखर पत्री !*
*मला रोग न, काव्यात झुरे, मी कवयित्री ! ('उपहासिनी', पृ. ४३)*

अशा शब्दांत दुःखावर प्रेम करणाऱ्या रोमँटिक कविप्रतिमेचे हसे केले आहे.

साध्या विषयावर काव्यरचना– विशेषतः सुनीते करण्याच्या अतिरेकी प्रवृत्तीला टीकाविषय करताना अगदी फुसक्या विषयांना काव्यात जाणूनबुजून स्थान दिलेले दिसते. उदा. 'झेंडूची फुले' मधील 'रस्त्यावर पडलेले विडीचे थोटूक' या विषयावरील दोन सुनीते, 'चप्पल तिची पाहुनी' हे 'गाजराच्या पुंग्या' मधील य. ना. मोघे यांचे सुनीत, 'साध्याही विषयात' याच शीर्षकाचे 'अर्धचंद्र' मधील पंडित सप्रे यांचे सुनीत, तसेच 'गाजराच्या पुंग्या' मधील काही कवितांचे विषय शीर्षकातूनच लक्षात येतात ते असे : 'हातरुमाल-माहात्म्य', 'केरसुणी', 'मिशांतला पांढरा केस', 'पावडरची डबी', 'हरवलेल्या छत्रीस !' याच संग्रहातील ना.ग. लिमये यांच्या 'देशील मातें जरी !' या सुनीतातील पुढील ओळी वाचनीय आहेत :('गाजराच्या पुंग्या', पृ. २५)–

*नामी गज्जल वा सुनीत रचुनी गाईन तूझेवरी ।*
*'अन्' ओवाळुनि हा 'जिता जीव' तुझ्या ठेवीन पायांवरी ॥*

– – – – – – – – – – –

*सूर्याची करण्या सुरेख कढई आणीन सैंपाघरी ।*
*कांद्याची गरमागरम पण भजी, देशील मातें जरी ।*

काव्यातील अशा सांकेतिक प्रवृत्तींची विडंबने तत्कालीन गद्यांमध्येही आढळतात. 'चिमणरावाचे चऱ्हाट' मधील 'वरसंशोधन' या लेखात चिं. वि. जोशी यांनी बाबूराव धेंडसे नामक कवीची व्यक्तिरेखा रेखाटली आहे. चिमीवर दुरून प्रेम व कविता करणारा हा प्रेमवीर अडीच महिन्यांत ११ गझला, २० सुनीते व ८ पदे रचतो. त्याला खिडकीतून झुगारल्यावर तो 'गुंजारव करीत नवग्रह मंडळाच्या कार्यालयात तरंगत' गेल्याचे वर्णन येते. तसेच त्याच पुस्तकात 'यू-किडवे, आय-सी-एस' या लेखात चिमणरावाने त्याच्या पत्नीला– काऊला– लग्नाआधी पाहिले होते, त्या प्रसंगाचे वर्णन 'कोशिंबीर वाढणाऱ्या कुमारीस पाहून' या भाव-सुनीत-गज्जलात त्याने केले असल्याचा उल्लेख मार्मिकपणे येतो.

('माणूस' या व्ही. शांताराम दिग्दर्शित चित्रपटात अनंत काणेकरांनी लिहिलेले रोमँटिक प्रेमाचे हंसे करणारे त्यातील नायक-नायिकांच्या तोंडचे गीतही येथे आठवते.)

'अभिरुचि' मासिकात पुरुषराज अळूरपांडे या टोपण नावाने लिहिलेल्या 'कवींचा नवा कारखाना' ('अभिरुचि' जुलै ४४, व. २, अं. ६) या लेखातून तत्कालीन काव्यविषयक वातावरणाची कल्पना येते. पुरोगामी शाखा, भावगीत शाखा, रंगभूमी शाखा, वात्सल्य शाखा, जानपद शाखा अशा शाखा– पोटशाखा आणि त्यांच्या मालांच्या जाहिराती–











उदा.'भावगीत सहा महिने न विटण्याची गॅरंटी सोबत' — यातून तत्कालीन व्याजकाव्यात्म लेखनाची जात कळते. अशा प्रकारच्या लेखनातून कवितेबरोबरच साहित्यातील शब्दाचेही मूल्य लोप पावत आहे; ही त्यामागची लेखकाची खंत विसरता येत नाही.

या वेळच्या विनोदी काव्यातून सांस्कृतिकदृष्ट्या गाजलेले संदर्भही निसटलेले नाहीत. त्या काळात अश्लीलतेच्या प्रश्नावरून गाजलेले संस्कृतिसंरक्षक कृष्णराव मराठे यांच्यावरही काही कविता आहेत. 'नर्तकीस' ('गाजराच्या पुंग्या' पृ. १७) या कवितेत

*'चोरून पाहतो गॉगल, चष्म्यांतून तुजला*
*मी 'वाङ्मयफिल्टर' तू अश्लील भासशी मला !'*

अशा शब्दात ('कुमारी शरा' या टोपणनावाने लिहिलेली कविता) कवीने कृष्णराव मराठे यांचा उपहास केला आहे. 'मुंग्यांचे वारूळ' या बाबुलनाथांच्या संग्रहात तर 'अश्लीलमार्तंड' नामक एक कविताच आहे.

**मर्यादा :**

'झेंडूची फुले'मुळे फोफावलेल्या या विनोद-विडंबनपर काव्यांना अनेक मर्यादा होत्या. यातील सर्वच्या सर्व रचना प्रामाणिक वाङ्मयीन भूमिकेतून लिहिल्या होत्या, असे दिसत नाही. काही रचना 'गंमत' म्हणून केल्या आहेत, असे स्वतः कवीच सांगतात. उदा. 'शंखध्वनि'. तर 'अर्धचंद्र' सारख्या संग्रहातील कित्येक रचना चुटकेवजा असून त्यात काव्याचे बाह्यलक्षण पाळण्याची प्रवृत्ती कमी आढळते.

साध्या विषयावर विनोदी कविता रचण्याच्या प्रयत्नात काही कविता हास्यकारक होण्याऐवजी हास्यास्पद झाल्या आहेत. बऱ्याच ठिकाणी केशवकुमारांच्या कवितांचेच कित्ते गिरवले आहेत. कुत्सित स्वरूपाची वैयक्तिक टीका करण्याचा मोह अनेक कवींना आवरता आलेला नाही.

विडंबन हे अस्त्र म्हणून वापरताना पाळावयाच्या कलात्मक पथ्यांचे भान सर्वच कवींना नाही. त्यामुळे संपूर्ण कविता वाचनीय न ठरता एखादी कल्पना आणि दोन-चार ओळी यात विनोद संपून जातो, अशी स्थिती ओढवते. अत्र्यांनी 'विडंबन-कवींचा कारखाना' अशी 'उपहासिनी'च्या प्रस्तावनेत या मंडळींची संभावना केली आहे.

स्वतः केशवकुमार व इतरही कवी विनोदी कवितांचे 'गायन' करीत व ते खूप लोकप्रिय ठरत असे. ही वस्तुस्थिती तर आश्चर्यकारकच म्हणावी लागते. वास्तविक त्या कालखंडातील काव्यगायनाच्या प्रथेचा विनोदी काव्यांतून उपहास झालेला आहे. उदा. 'माझे काव्यगायन' (निशिगंधकृत 'उपहासिनी'त समाविष्ट), 'कविता गाऊच नका' (कवी आनंद, 'गाजराच्या पुंग्या'त समाविष्ट). त्या काळी गायक कवींना 'टाहोकवी' म्हटले जात

होते. या पार्श्वभूमीवर विनोदी कविता गाऊन दाखवण्याचा मोह या कवींनी का टाळला नाही ? विसंगतींची जाणीव संगीताच्या साथीने करण्यात आशयाला न्याय मिळणार नाही, असे यांच्या का लक्षात आले नाही– असे प्रश्न पडतात. शेवटी ही कवितादेखील काळाच्या चाकोरीत अडकून पडलेली होती, असे लक्षात येते.

मराठी काव्यामध्ये विनोदाचा प्रवाह रुजला नाही, असे चित्र दिसते. याचे कारण मराठी साहित्यसमीक्षेनेही विनोदी काव्याची फारशी गांभीर्याने दखल घेतली नाही. एकंदरीत साहित्यक्षेत्रातच विनोदी काव्याविषयी कलात्मक आस्था कमी होती. केशवकुमारांना विडंबनकाव्यामुळे आपण 'चोरांच्या आळंदी'ला पोहोचलो, असे वाटण्यामागे एक प्रकारची, सूक्ष्म अपराधीपणाची भावना आहे व ती या वाङ्मयीन सांस्कृतिक वातावरणातून आलेली आहे. (गोविंदाग्रजही आपल्या विनोदी कवितांना 'आचरटपणाचा मासला' अशी टीप देत होते.)

आपण निर्माण केलेल्या नव्या प्रकाराची साहित्यशास्त्रीय बैठक स्वतः अत्रे यांनाच मांडावी लागली. 'उपहासिनी', 'कॉलेजचे विश्व', 'बांडगूळ' यांच्या प्रस्तावनांतून त्यांनी या प्रवाहाचे वैशिष्ट्य, प्रकार, त्यातील मर्यादा यांचा ऊहापोह केलेला दिसतो. ('झेंडूची फुले'-वर माधवराव पटवर्धनांचे परीक्षण तेवढे चिकित्सक दृष्टीने लिहिलेले आढळते.)

विनोद-विडंबनपर काव्यांच्या मर्यादा मान्य करूनही त्यांचा प्रस्तुत कालखंडातील काव्यविषयक वातावरणावर वेगळ्या पद्धतीने भाष्य करण्याचा पवित्रा महत्त्वाचा ठरतो. ऐतिहासिकदृष्ट्या या काव्याला स्थान उरतेच.

**काव्य व सांस्कृतिक पर्यावरण :**

त्या काळात नादबद्ध रचना अथवा वक्तृत्वपूर्ण मजकूर यांना 'काव्य' म्हणून मिळणारी मान्यता, कवीची स्वतःविषयीची भ्रामक प्रतिमा, त्यांच्या रचनेतील व्याजकाव्यात्मता आणि अतिवैयक्तिक भावनांना मिळणारी प्रतिष्ठा– असे अनेक घटक या विनोदविडंबनपर काव्याला प्रेरक ठरले. अत्रे यांनी 'उपहासिनी'च्या प्रस्तावनेत 'कवींचे परस्पर प्रशंसासंघ' अशा शब्दांत या काव्यविषयक वातावरणाची कल्पना दिली आहे.

रोमँटिक प्रेमकविता त्या काळात हास्यास्पद ठरण्यामागे कवींच्या रचनेइतकेच बदलत्या समाजलक्षी जाणिवांचा उदय, हेही कारण आहे. सामाजिक चळवळी (मार्क्सवाद), विज्ञानदृष्टीची जाग, स्वातंत्र्यचळवळी यामुळे त्या काळात वास्तवाचे नवे भान येऊ लागले होते आणि त्यामुळे त्या वास्तवाशी तार न जुळणारी कविता साहजिकच विनोदविषय ठरली.

विडंबनांव्यतिरिक्त विनोदी कवितांमध्ये 'उद्‌ध्वस्त फलाट', 'दख्खनची राणी',

'आगबोटीचे भजन', 'चाळीतील संसार' असेही विषय दिसतात.

*तीन शिडे सहा वंब । दिसतसे जी अगडवंब ।*
*खांके उतारु सुकाण । नित्यसमुद्राचे स्नान ।*
*येग येग बोटमाई । माझे मुंबईचे आई ।*

('गाजराच्या पुंग्या' पृ.६५)

अशा वि.ह. निजसुरे यांच्या 'आगबोटीच्या भजना'तून भोवतालचे नवे विषय काव्यात आणण्याची धडपडही सूचित होते. बदलत्या जीवनाचे काव्याशी कसे नाते जोडावे, हा त्या काळातला एक पेच दिसतो. पुढे मर्ढेकरांनी हा पेच समर्थपणे सोडविला. त्यांच्या काव्यात वास्तवजीवनाचे सारे संदर्भ घेऊन गिरगावातील 'चाळ' आली. इतकेच नव्हे तर 'फलाट' आला आणि मराठी कवितेला प्रथमच यंत्रसंवेदनेचे परिमाण मिळाले. पण त्याआधी हे विषय केवळ विनोदाचे साधन म्हणूनच काव्यात येऊ शकत होते, ही वस्तुस्थिती दिसते.

या संदर्भात विनोदी व गंभीर विषयांवर कविता लिहिणाऱ्या केशवकुमार व अनंत काणेकर या दोघांनी काव्यक्षेत्रातून जी स्वेच्छानिवृत्ती स्वीकारली, त्यामागील भूमिका त्यांच्याच शब्दांत वाचणे, महत्त्वाचे ठरेल.

केशवकुमार 'गीतगंगे'च्या प्रस्तावनेत लिहितात की, 'माझ्याकडून काव्यस्वरूपाचे लेखन फारसे होईल, असे वाटत नाही. कारण 'बाह्य जगात बैलगाडीपासून विमानापर्यंत व चकमकीपासून तो विजेच्या बत्तीपर्यंत प्रगती झाली आहे, तरी काव्याच्या सृष्टीत चंद्र, चांदण्या, चातक व चकोर ही सौंदर्याची मिरासदारी सांभाळून आहेत.' ('मी कवि कसा झालो ?' 'गीतगंगा' प्रका. अधिकारी, गो. गो, पृ. २३-२४)

काणेकरांनी 'चांदरात'च्या दुसऱ्या आवृत्तीत (सप्टें, १९४० पृ. ५) सुरुवातीला लिहिले आहे : 'आजूबाजूच्या जगाकडे पाहिल्यानंतर ज्या वस्तुनिष्ठ भावना किंवा कल्पना माझ्या मनात उत्पन्न होतात, त्या गद्यातच मी चांगल्या तऱ्हेने व्यक्त करू शकत असेन किंवा त्यांपैकी ज्या काव्यात व्यक्त करण्यासारख्या असतील त्या व्यक्त करण्याचे नवीन माध्यम मला अजून सापडत नसेल.'

या दोघांच्या प्रतिक्रिया वाचताना हे जाणवते की, बदलत्या सामाजिक/सांस्कृतिक वातावरणाची नस काव्यात कशी पकडायची, या चाचपडत्या अवस्थेत ही कविमंडळी आहेत. ही कोंडी फोडायचा प्रयत्न विनोदविडंबनातून एक प्रकारे केला गेला.

या विनोदी कवितेने तत्कालीन कवितेवर, काव्यविषयक वातावरणावर जशी टीका केली तसेच बदलत्या वातावरणात काव्यविषयक संकल्पना बदलण्याची निकडही अप्रत्यक्षपणे सूचित केली. या कवितांचे हे महत्त्व ऐतिहासिकदृष्ट्या लक्षात घेणे अगत्याचे ठरते.

(६/७० ,लोकमान्यनगर, नवी पेठ, पुणे ४११ ०३०)

डॉ. दत्तात्रय पुंडे

# आठवणीतले मालशे सर

'आता मालशे सरांच्या आठवणी तेवढ्या उरल्या आहेत', हे वाक्य लिहिताना मनाला खरोखरीच क्लेश होतात. सतत ज्ञानयाग करणाऱ्या एखाद्या ऋषीने एकाएकी हिमालयाच्या अज्ञात प्रदेशात निघून जावे, असेच काहीतरी घडल्यासारखे झाले आहे. माझ्यासारख्याला हा एक धक्काच आहे. कारण अगदी अलीकडे, नक्की दिवस सांगायचा म्हणजे २३ एप्रिलला मी व माझे मित्र डॉ. अनंत देशमुख मालशे सरांना मुद्दाम म्हणून भेटायला '३ मनाली'त गेलो होतो. चांगल्या दोन-अडीच तास गप्पागोष्टी झाल्या. नेहमीप्रमाणे सरच जास्त बोलत होते. बोलता बोलता ते लिहीत असलेल्या मराठी रंगभूमीच्या इतिहासाची गोष्ट निघाली. तेव्हा सर अतिशय आनंदित स्वरात म्हणाले होते, 'दोन-तीन महिन्यांत पूर्ण होईल बघ. सगळं जवळजवळ सिद्ध झालंय. मात्र हा इतिहास १८९२ पर्यंतचाच आहे हं.' यानंतर ते रंगभूमीच्या पुढच्या इतिहासाची साधनसामग्रीदेखील आपण कशी जमवली आहे, ती कशी पारखून घेतली आहे, हे सांगत बसले. मग ते म्हणाले, "तुला तर माहितीच आहे– कारण सध्या तुझ्या तो अभ्यासाचा विषय आहे नं– की मुळात वाङ्मयेतिहास लिहिणं हेच किती जिकिरीचं आहे ते. त्यातून हा तर रंगभूमीचा इतिहास आहे. फार मोठा व्याप आहे. त्या नाटक मंडळ्या, त्यांचे कारभार, त्यांच्या स्पर्धा. अरे, हजार गोष्टींचा परिणाम आपल्या रंगभूमीवर झालेला आहे. त्या वेळी बी.ए.चे अभ्यासक्रम कोणते होते, कोणती नाटकं होती, कोण शिकवत होते, इतक्या बारीकसारीक गोष्टी पाहिल्या, तर आपण लिहू शकू खरा मराठी रंगभूमीचा इतिहास. त्यामुळे रंगभूमीचा पुढचा इतिहास लिहिणं या हयातीत मला जमेल असं वाटत नाही." त्यांच्या या नैराश्ययुक्त उद्‌गारावर मी व देशमुख दोघेही क्षणकाळ गप्प झालो. त्या क्षणिक शांततेचा भंग करीत मालशे सरच देशमुखांना म्हणाले, "तुम्ही करू शकाल हे काम. तुमच्याकडे दृष्टी आहे. करणार का? माझी सगळी साधनसामग्री, अगदी माझ्या नोटस्‌देखील देतो तुम्हाला."

त्यावर एरवीच संकोची स्वभाव असणारे डॉ. अनंत देशमुख आणखी संकोचून म्हणाले, "नाही, सर. तो रंगभूमीचा पुढचा इतिहासदेखील तुमच्याच हातून पुरा होणार आहे. तुम्हीच तो लिहिणार आहात."

"छे, रे! शरीराची साथ नाही अगदी आता. हात सारखा कापतो अन्‌ बोलणं हे असं."

(आजारपणामुळे गेली दोन-तीन वर्षे मालशे सरांच्या बोलण्यावर थोडा परिणाम झाला होता. उच्चारण पूर्वीसारखेच स्वच्छ असे, पण चटकन न होता थांबून, अडखळत होई.)

मालशे सरांना असे व्यथित स्वरांनी बोलताना मी कधीच पाहिले नव्हते. व्यथा, नैराश्य यांचा स्पर्श त्यांच्या व्यक्तिमत्त्वाला कधी झाल्याचे जाणवलेले नव्हते. उलट त्यांच्या बोलण्यावागण्यात एक कमालीचा आत्मविश्वास असे आणि त्यांच्या अभ्यासाचा नि कर्तृत्वाचा एक मंद सुगंध त्यांच्याभोवती कायम दरवळत असे. गेल्या वर्षी नोव्हेंबरमध्ये असाच त्यांना भेटायला मी गेलो होतो. त्या वेळी मी त्यांच्या प्रकृतीची उपचार म्हणून चौकशी केली, तर सर म्हणाले होते, "औषधं नीट चालू आहेत. माझे माझे ठराविक व्यायाम मी घेतच असतो. हाताला मुंग्या येतात, बोलताना अडखळतो म्हणून काय झाले? माझे डोळे अन् कान अजून चांगले शाबूत आहेत. त्यामुळे अभ्यासात काही खंड नाही. चांगला सुरळीत चालू आहे." एरवीच अडचणींचा बाऊ करणे सरांना आवडत नसे. ते कमालीच्या अडचणींतून, परीक्षा घेणाऱ्या कठीण कालावधीतून गेलेले आहेत, हे त्यांच्या जवळच्या मित्रसुहृदांना चांगलेच माहिती आहे. पण आपले दुःख, आपल्या अडचणी ते कधी कोणाला सांगत बसल्याचे जराही ऐकिवात नाही.

त्यांच्या बोलण्याचा विषय बहुतांशी 'पुस्तके' हाच असायचा. वाङ्मय, समीक्षा आणि संशोधन हेच त्यांच्या सदैव चिंतनाचे विषय असत. रंगात आले, खुषीत असले की, ते निरनिराळ्या साहित्यिकांच्या चित्रविचित्र गोष्टी सांगत. (इथेही त्यांच्यातला संशोधक जागृत असल्याचे दिसे.) इतकेच नव्हे, तर अनेकांच्या हुबेहूब नकला करीत. ते मुळात चांगले नट होते. त्यांनी एके काळी खरोखर 'एकच प्याला' या नाटकात भूमिकाही केली होती.

'एकच प्याला' वरून आठवते. मालशे सर आम्हाला एम.ए.ला 'शोकांतिका' शिकवायला होते. पहिली दोन-तीन व्याख्याने मराठी शोकांतिकेच्या आढाव्याची झाली. (शोकांतिकेचा तत्त्वविचार शिकवायला प्रा. रमेश तेंडुलकर होते) मग नेमलेल्या सहा शोकांतिकांची नावे सांगून ते म्हणाले, "आपण अगदी ऐतिहासिक क्रमानेच सर्व शोकांतिका शिकायला पाहिजेत असे नाही. तुम्हाला आवडते ती शोकांतिका अगोदर शिकूयात. बोला, कोणती अगोदर घ्यायची?" सरांच्या या प्रश्नाला कुणीच उत्तर दिले नाही. सारा वर्ग एकमेकांच्याकडे पाहत किंवा खाली माना घालून बसलेला. मग सरच म्हणाले, "आपण अगोदर 'एकच प्याला' घेऊयात, ते चांगलं." सरांनी हे वाक्य अशा काही सुरात उच्चारले की त्यातल्या नर्म विनोदाने सबंध वर्गभर हास्याची लकेर पसरली. सरांना हास्यविनोद खूप आवडे. त्यांच्याजवळ नानाविध विनोदांचा, अगदी इरसाल विनोदांचाही प्रचंड साठा होता. त्यांची विनोद सांगण्याची शैलीही मोठी प्रसन्न, खेळकर असे. प्रसंगाला अनुरूप विनोद ते पटकन सांगत. त्यामुळेच ज्या बैठकीत सर असत, तिथे विनोदाची कारंजी उडत असत.



अनुक्रमणिका

विनोदाप्रमाणेच सरांना संगीताचीही खूप आवड होती. ते संगीताचे मर्मज्ञ रसिकच होते. दुसऱ्याच्या गाण्याला ते मनपसंत, हातचे न राखता दाद देत. त्यांच्या 'आवड-निवड' या संग्रहाच्या प्रकाशनाचा समारंभ पुण्याला डॉ. हे. वि. इनामदार यांच्या घरी आयोजित केला होता. समारंभ घरगुतीच होता. निवडक तीसएक मंडळी होती. प्रकाशन समारंभ, भाषणे, हारतुरे वगैरे काही उपचार नव्हते. नुसत्या भेटीगाठी व गप्पागोष्टी चालल्या होत्या. त्या गलबल्यात मालशे सर शेजारीच बसलेल्या डॉ. विद्याधर पुंडलिकांना एकदम म्हणाले, "काय पुंडलीक, गाणार का?" पुंडलीक गातात हे जमलेल्यांपैकी फारच थोड्यांना माहिती होते. त्यामुळे आमच्यापैकी बहुतेकजण हा काही थट्टेचाच प्रकार आहे, असा विचार करतो न करतो तोच पुंडलीकही काही आढेवेढे न घेता गायला लागले, "धेई छंद. . . मकरंद. . ." मालशे-पुंडलिकांची मैत्री ही अशी अकृत्रिम होती. त्या दिवशी पुंडलिकांनी आपल्या सुरेख आवाजात चांगली तीन-चार नाट्यगीते गायली.

पुंडलिकांवर मालशे सरांचे खूप प्रेम होते. पुंडलिकांच्या अश्विन ह्या गुणसंपन्न मुलाचे निधन झाल्यावर मालशे मुद्दाम त्यांना भेटायला पुण्याला आले होते. ते पुंडलिकांकडे जाताना नेमकी त्यांची माझी गाठ झाली. मालशे सर म्हणाले, "बरं झालं, तू भेटलास ते. पुंडलीककडं जायचंय. येतोस का? कठीण प्रसंग आहे हा." आणि खरोखरच कठीण प्रसंग होता. मालशे सरांना दारात उभे पाहताच पुंडलीक धावतच आले अन् एखाद्या लहान बालकाप्रमाणे सरांच्या गळ्यात पडून हमसून हमसून रडू लागले. सरांच्याही डोळ्यांत अश्रू उभे राहिले. ते पुंडलिकांच्या पाठीवरून हळुवारपणे हात फिरवीत होते. शेवटी स्फुंदतच सर म्हणाले, "पुंडलीक, आता पुरे कर." पुंडलीकही आज्ञाधारक मुलाप्रमाणे डोळे पुसत दूर झाले. मालशे सरांमध्ये दडलेला प्रेमळ पिताच तेव्हा पाहायला मिळाला. सरांचे असे 'माणुसकीचे गहिवर' अनेकांच्या अनुभवाला आलेले आहेत.

'संशोधनाला अखेरचे पान नसते' हे सूत्र मालशे सरांना चांगले ठाऊक होते. किंबहुना तीच त्यांच्या सततच्या अभ्यासाची प्रेरणा होती. त्यांना त्यामुळेच सतत 'अद्ययावतते'चा ध्यास असे. वर एम.ए.च्या वर्गात ते 'एकच प्याला' शिकवत याचा उल्लेख आलेला आहेच. ही शोकांतिका त्यांनी जराही पारंपरिक पद्धतीने शिकवली नाही. आज मानसशास्त्रीय समीक्षेचा उदोउदो होतो आहे. पण सरांनी पंचवीस एक वर्षांपूर्वी आम्हाला 'एकच प्याला' त्याच दृष्टीने शिकविले. 'ते रामलालचं कार्ट. . .' या एका उद्गारावर त्यांनी चार-पाच व्याख्याने दिल्याचे अजून आठवते.

आपण नवीन शोधावे, दुसऱ्याला नवे सांगावे ही मालशे सरांची स्वाभाविक रीत होती. महाराष्ट्र शासनाने केशवसुतांच्या हस्तलिखिताची जी वही 'यथामूल' प्रकाशित केली आहे, ते सारे काम सरांच्याच देखरेखीखाली झाले होते. आम्हा विद्यार्थ्यांना हस्तलिखिताच्या

छपाईच्या प्लेटस् दाखवायला ते एकदा घेऊन आले होते. कवितांच्या शेजारीच थोडी आकडेमोड होती. तिच्यावर बोट ठेवीत सर म्हणाले, "पाहा पाहा. हा माणूस खरोखर कवी होता. कारण याला साध्या एकेरी बेरजाही येत नाहीत." नंतर तिथल्या तिथे सरांनी आम्हाला 'केशवसुतांच्या कवितेतील परिष्करणे' यावर एक व्याख्यानच दिले. (पुढे त्याचाच मोठा लेख प्रकाशित झाला.)

नव्याचे मनापासून स्वागत, हा सरांचा धर्मच होता. याच्या दोन गोष्टी मुद्दाम पाहण्यासारख्या आहेत. सर एस.एन.डी.टी. विमेन्स युनिव्हर्सिटीत विभाग प्रमुख म्हणून रुजू झाले आणि त्यांनी पहिली गोष्ट कुठली केली, तर बी.ए., एम.ए.चे अभ्यासक्रम सुधारले, अद्ययावत केले. आधुनिक भाषाविज्ञानाचा किंवा वर्णनात्मक भाषाविज्ञानाचा अभ्यासक्रम आखला व राबवला गेला, तो सर्वप्रथम महिला विद्यापीठात. यामागे अर्थातच मालशे सरांचेच प्रयत्न होते. त्यांनी नुसता भाषाविज्ञानाचा नवा अभ्यासक्रम स्वीकारला नाही, तर स्वतःबरोबर अनेक प्राध्यापकांना या अभ्यासक्रमाच्या बाबतीत प्रशिक्षित करण्याची गळ डेक्कन कॉलेजच्या भाषाविज्ञान विभागास घातली.

शैलीविज्ञान नवे आहे, उपयुक्त आहे, हे लक्षात येताच त्याच्या अभ्यासाच्या मागे ते लागले. मुख्य म्हणजे या बाबतीत स्वतःच्याच पुत्राकडून– डॉ. मिलिंद मालशे यांच्याकडून– धडे घेण्यात त्यांनी जराही कमीपणा मानला नाही. उलट त्यांच्या साहाय्याने त्यांनी 'शैलीविज्ञाना'ची तोंडओळख करून देणारी एक पुस्तिकाच लिहिली.

रेने-वेलेक यांच्या 'थिअरी ऑफ लिटरेचर' या ग्रंथाचे भाषांतर करून मालशे सरांनी मराठी साहित्यविचाराच्या अभ्यासक्षेत्रावर मोठे उपकारच करून ठेवले आहेत. कारण मुळात रेने-वेलेक यांचा हा ग्रंथ साहित्य-विचार ह्या अभ्यासशाखेचे एक चांगले व्यवस्थापन करणारा ग्रंथ म्हणून प्रसिद्ध आहे. मराठीत 'साहित्यविचारां'चे क्षेत्र जर सशक्त व्हायचे असेल, तर ह्या ग्रंथाचे यथामूल (हा शब्द महत्त्वाचा. कारण या ग्रंथाचे 'असे-तसे' अनुवाद मराठीत, हिंदीत व काही अन्य भारतीय भाषांत झाले आहेत.) भाषांतर होणे आवश्यक आहे, हे मालशे सरांनी मनोमन जाणले आणि काही वर्षे त्यांनी त्याच कामाला वाहून घेतले. याही कामात त्यांनी आपले सुपुत्र डॉ. मिलिंद मालशे यांचे साहाय्य घेतले होते. मालशे सरांनी आपल्या प्रज्ञेला अहंकाराचा वारा लागू दिला नव्हता, हेच खरे.

त्यांच्या 'अद्ययावतते'चे दुसरे उदाहरण खूपच बोलके आहे. कारण त्यातून त्यांची सामाजिक जाणीवही दिसते. अनिल अवचटांचे 'माणसं' हे पुस्तक आले. त्या काळात अनेकांप्रमाणे मीही त्या पुस्तकाच्या प्रेमात होतो. अशातच मालशे सरांनी ते महिला विद्यापीठाच्या अभ्यासक्रमातच नेमून घेतले. (हे पुस्तक अभ्यासाला प्रथम लावले ते एस.एन.डी.टी. युनिव्हर्सिटीने, हे मुद्दाम लक्षात घेण्यासारखे आहे. मग ते पुणे विद्यापीठ,

शिवाजी विद्यापीठ इत्यादी इतर विद्यापीठांनी लावले.) मी सरांना त्याबाबत जेव्हा विचारले, तेव्हा त्यांनी दिलेले उत्तर त्यांच्या अभ्यासाच्या बैठकीवरच प्रकाश टाकणारे आहे. ते म्हणाले, "हे बघ, संतांचे साहित्य काय, एकोणिसाव्या शतकातले साहित्य काय आणि अलीकडचे साहित्य काय, नीट पाहिले तर लक्षात येते की मराठी साहित्याने सतत सामाजिक चलनवलनाशी बांधिलकी स्वीकारलेली आहे. 'माणसं' हे पुस्तक अभ्यासक्रमात लावायलाच हवं. नाही लावलं तर उद्याचा समाज आपल्याला क्षमा करणार नाही."

साहित्य काय किंवा संशोधन काय, त्याची सामाजिक उपयुक्तता मालशे सर जाणून होते. म्हणून तर एखाद्या समाजशास्त्राच्या प्राध्यापकाने जो प्रकल्प वास्तविक घ्यायला हवा, तो 'विधवा विवाह चळवळ' हा प्रकल्प मालशे सरांनी हाती घेतला आणि अत्यंत यशस्वीतेने पार पाडला. संशोधन मंडळाकरिता त्यांनी संपादिलेल्या छोट्या छोट्या अनेक पुस्तिकाही याचीच साक्ष देतील. त्यांच्या महात्मा फुलेकृत 'शेतकऱ्याचा आसूड' या पुस्तिकेच्या संपादनामागेही हीच दृष्टी होती. किंबहुना त्यांनी कीरांबरोबर म. फुले यांच्या समग्र वाङ्मयाचे संपादन केले, तेही याच दृष्टीने.

मराठी वाङ्मयाबाबतची मालशे सरांची स्वतःची अशी आवड-निवड होती. वि. दा. सावरकर हा त्यांच्या खास आस्थेचा विषय होता. म्हणूनच सावरकरांच्या कवितेवर बोलताना अन् लिहिताना ते अगदी समरसून जात. ते नाट्य पंढरीचे निष्ठावान वारकरी होते. नाटकासंबंधाने आणि रंगभूमीसंबंधाने एखादी बारीक गोष्ट सापडते आहे, मिळते आहे म्हटल्यावर ते वाटेल ते कष्ट घ्यायला तयार होत. एकोणिसावे शतक हा तर त्यांचा आवडीचा शोधविषय होता. 'गतशतक शोधिताना' ते ग्रंथालयात तहान-भूक विसरून तास-न्-तास घालवीत. कुठेतरी एखाद्या कानाकोपऱ्यात त्यांना कोणी 'सदोबा' दिसे. मग 'हा सदोबा कोण होता ?' असा त्यांचा शोध सुरू होई. उलटसुलट सर्व प्रमाणे ते तपासत बसत. जुनी नियतकालिके, नटांच्या डायऱ्या, नाटक मंडळींच्या हिशेबाच्या वह्या ते एखाद्या ऑडिटराप्रमाणे तपासत बसत. 'सदोबा'चा शोध लागेपर्यंत त्यांच्या जीवाला मुळी चैन पडत नसे. ते खरोखरीच प्रियोळकर परंपरेतील सच्चे संशोधक होते.

हे असे सच्चे, सत्याग्रही संशोधक होते म्हणूनच संशोधन प्रांतातील घुसखोरी, किंवा अप्रामाणिकपणा त्यांना खपत नसे. ते पोटतिडकीने अशा प्रकारांचा निषेध करीत, जाहीर वादही खेळत. अशा वादांमध्ये वैयक्तिक हेवेदावे नसत, तर त्यांची अनन्य संशोधननिष्ठा असे, हे त्यांच्या विरोधकांनाही माहिती असे. संशोधन हे मालशे सरांचे पहिले प्रेम होते.

पण संशोधनापायी सरांनी कधीही आपली रसिकता टाकून दिली नव्हती. एक प्रघात म्हणून मी हे विधान करतो आहे असे नाही. सरांच्याच पद्धतीने पूर्ण पुराव्यानिशी मी त्यांच्या रसिकतेबद्दल विधान करतो आहे. 'छावा', 'किशोर' यांसारख्या बालनियतकालिकांचे गेल्या

दहा-पंधरा वर्षांतले संच काढून पहा. स.गं. मालशे या नाममुद्रेनिशी तुम्हाला भरपूर बालवाङ्मय आढळेल.

मालशे सरांनी मराठी समीक्षेत, मराठी संशोधनविचारात किती भर घातली, याचे मूल्यमापन करण्याचा मी येथे जराही प्रयत्न करू इच्छित नाही. कारण त्या गोष्टी स्वतःसिद्ध आहेत. 'मराठी संशोधन पत्रिका' किंवा 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका' यांची त्यांनी केलेली मौल्यवान व देखणी संपादने पाहिली, तरी मालशे सरांची प्रज्ञा किती उच्च दर्जाची होती, हे कळेल. त्यांच्या वाङ्मयाची सूची पाहिली तर त्यांची प्रज्ञा कशी बहुरंगी होती हे सहज कळेल.

मालशे सरांनी आपले संशोधन पुस्तकी ठेवले नाही. त्यांनी ते अभ्यासकांच्या मनःपर्यंत पोचविले. माझ्या दृष्टीने हेच त्यांचे मोठे योगदान होय.

(४/९ अर्चनानगर, गणेशनगरजवळ, पुणे ४११ ०३८)

डॉ. मंदा खांडगे

# महाराष्ट्र-शारदेच्या मंदिरातील सांजवात

जुन्या पिढीतील साहित्य-रसिकांना आनंदीबाई शिर्के हे नाव चांगलं परिचित असेल, पण आज काळाच्या पडद्याआड गेलेल्या आनंदीबाईंनी पंच्याहत्तर वर्षांपूर्वी मराठी कथावाङ्मयात आपलं स्वतःचं असं एक स्थान निर्माण केलं होतं. त्या काळात हाताच्या बोटावर मोजण्याइतक्या स्त्रिया लेखन करत होत्या. लक्ष्मीतनया, काशीताई कानिटकर, गिरिजाबाई केळकर या नावांबरोबर आनंदीबाईचं लेखनकर्तृत्व बहरत होतं. या कालखंडातील स्त्रियांच्या कथालेखनाचा थोडक्यात आढावा घेतला, तर असं दिसून येतं की, १८८५ ते १९२० पर्यंत फक्त एकच कथासंग्रह स्त्रीने लिहिलेला प्रसिद्ध झाला. तो होता लक्ष्मीतनया (लक्ष्मीबाई अभ्यंकर) यांचा, १९१५ साली 'सद्यस्थिती' या नावाने प्रसिद्ध झालेला. कमलाबाई किबे, यशोदाबाई भट, काशीबाई देवधर, हिराबाई पेडणेकर, ताराबाई तर्खड, लक्ष्मीबाई कामत, राधाबाई गोखले आदी स्त्रियांनी थोडंफार कथालेखन या सुमारास केलं ते स्फुट स्वरूपात, नियतकालिकांतून. स्त्री-शिक्षण, स्त्री-स्वातंत्र्य, स्त्रियांची सर्वांगीण सुधारणा यासाठी समाजसुधारकांनी जी फळी उघडली होती त्याचे पडसाद महाराष्ट्रात पडून स्त्रियांमध्ये अल्प प्रमाणात जागरूकता निर्माण झाल्याचा हा काळ. त्यामुळे या स्त्रियांच्या कथांतून त्या काळातील सनातनी प्रश्नांना, सामाजिक समस्यांना वाचा फोडली जाणं ते स्वाभाविक होतं. बालविवाह, विधवांची दुःखं, त्यांच्या समस्या, ज्या हरिभाऊंनी आपल्या कथा-कादंबऱ्यांतून मांडल्या, त्याचं काही प्रमाणात उदाहरण डोळ्यासमोर ठेवून या स्त्रिया लिहित्या झाल्या होत्या. म्हणजे हा कालखंड स्त्रियांना स्त्रियांच्या समस्यांची जाणीव होऊन त्या आपल्या लेखनातून मांडण्याची स्फूर्ती होण्याचा संधिकाल होता असं म्हणायला हरकत नाही. कारण या काळात स्त्री हळूहळू माजघरातून ओसरीवर आलेली होती. पुरुषांप्रमाणे काही स्त्रियाही लेखन करू लागल्या, ही त्या वेळी स्त्रियांच्या वैचारिक प्रगतीची आणि त्यांना संधी मिळताच आपलं लेखनकर्तृत्व सिद्ध करण्याची निशाणी होती.

एकोणीसशे वीसनंतर सुरुवातीच्या कथालेखिकांत गिरिजाबाई केळकरांचं नाव प्रामुख्याने घेतलं जातं, तसंच आनंदीबाई शिर्के यांचंही. सुरुवातीच्या काळात फारशा कथालेखिका नसल्याने या लेखिकांच्या लेखनाचं समाजानं चांगलं स्वागत केलं आणि उत्तेजनही दिलं. आनंदीबाईंच्या कथालेखनाचा प्रवास हा साठ वर्षांपेक्षाही जास्त प्रदीर्घ



अनुक्रमणिका

होता. त्यांचा पहिला कथासंग्रह 'कथाकुंज' १९२८ साली वयाच्या पस्तिसाव्या वर्षी प्रसिद्ध झाला आणि शेवटचा 'गुलाबजाम' हा कथासंग्रह वयाच्या नव्वदीमध्ये १९८१ साली. आनंदीबाईंना चौऱ्याण्णव वर्षांचं प्रदीर्घ आयुष्य लाभलेलं होतं.

गौरवर्णीय, डोक्यावरून पदर, खानदानी तेजानें चार जणींत उठून दिसणाऱ्या आनंदीबाई मंचर तालुक्यातल्या रांजणी गावी वाडवडिलांचं वतन असलेल्या शिंदे कुळात-खानदानी मराठा कुटुंबात जन्मलेल्या. जन्मस्थळ बडोदा. त्यामुळे बालपण सगळं गुजरातेत गेलं. बडोद्याला संस्थानी वातावरणाचे संस्कार त्यांच्यावर झालेले. गायकवाडी आमदानीत त्यांच्या वडिलांची नोकरी असल्यामुळे गुजरातेत बडोदा, अहमदाबाद, नवसारी अशा अनेक लहान-मोठ्या गावी त्यांना राहावं लागलं. श्रीमंत सयाजीराव गायकवाडांनी तिथे अनेक ठिकाणी शाळा काढल्या होत्या. मुलींना शिक्षण मिळावं, यावर त्यांचा भर होता. आणि मुलींच्या शिक्षणाकडे त्यांनी विशेष लक्षही पुरवलं होतं. आनंदीबाईंचं शिक्षण काही गुजरातीत, तर काही मराठीत झालं. तेही सहाव्या इयत्तेपर्यंत. लहानपणी त्यांच्या घरात 'मनोरंजन', 'चित्रमयजगत' येत असे. 'करमणूक' वाचून विचारांना दिशा मिळत होती. रामायण, महाभारत हे ग्रंथ तर वाचनासाठी घरात असतच. लहानपणी मैत्रिणी सागरगोटे, पत्ते, सोंगट्या खेळत त्या वयात आनंदीबाई रामायण, महाभारत परत परत वाचत. 'सरस्वतीचंद्र' वयाच्या बाराव्या-तेराव्या वर्षी वाचून झालं होतं. हाती पडेल ते वाचावं, अशी वाचनाची भूक होती. तीही अगदी बालपणापासून. परिस्थितीने त्या सुमारास शिक्षण अर्धवट सोडावं लागलं तरी तत्कालीन सामाजिक परिस्थिती व घरची परिस्थिती, आर्थिक ओढाताण, साऱ्या प्रतिकूल परिस्थितीतून वाट काढत त्या आपल्या वाचनाचं वेड जपत होत्या. संधी मिळाली तेव्हा इंग्रजीमध्येही नैपुण्य मिळवलं. गुजराती, मराठीतलं वाचन हे त्यांना त्यांच्या लेखनाचा पाया म्हणून भावी काळात निश्चितच उपयोगी पडलं. तत्कालीन समाजपरिस्थितीचं आकलन, निरीक्षण त्यांनी डोळसपणे केलं होतं. हरिभाऊंच्या 'पण लक्षात कोण घेतो?' या कादंबरीने त्या प्रभावित झाल्या होत्या. त्यामुळे हरिभाऊंच्या लेखनाचे संस्कार नकळतपणे त्यांच्यावर झाले. हरिभाऊंच्या लेखनाची स्फूर्ती घेऊन त्यांनी कथालेखनाचा 'श्रीगणेशा' केला. १९१० साली त्यांची पहिली गोष्ट 'शारदाबाईंचं संसारचित्र' आणि 'स्वच्छता' हा निबंध 'मनोरंजन' मासिकातून प्रसिद्ध झाला. हे लेखन त्यांनी गुजरातेत असताना केलेलं होतं.

आनंदीबाईंचे वडील 'गायकवाडी'तून निवृत्त झाल्यावर हे शिंदे कुटुंब मुंबईस स्थायिक होण्यासाठी आले. त्यांच्या मोठ्या बहिणीचं लग्न झालं होतं. वयाची विशी आली, तरी आनंदीबाई अविवाहित राहिल्या होत्या. त्या काळाचा विचार करता त्यांचे हे कृत्य धाडसी आणि त्यांचे विचार अत्यंत प्रगत असे होते. नर्सिंगचं शिक्षण घेऊन नोकरी करावी

आणि आपल्या वृद्ध मात्यापित्यांचा प्रपंच सांभाळून त्यांचा आर्थिक भार हलका करावा, असं त्यांना वाटत होतं. कारण गायकवाडीतल्या तुटपुंज्या पेन्शनमध्ये प्रपंचाचा गाडा ओढणं त्यांच्या वडिलांना जड जात होतं. त्यांच्या मोठ्या भावाची नोकरी धरसोडीची, त्यामुळे त्या उत्पन्नाचाही भरवसा नसे.

मुंबईत आल्यावर त्यांनी आपलं लेखन चालू ठेवलं. त्यामागे चिकाटी होती, परिश्रम होते. 'चित्रमयजगत'ला त्यांनी एक कथा पाठवली. 'चित्रमयजगत' मध्ये 'गोष्टी पाहिजेत' अशी जाहिरात येत असे. पसंत पडली तर एका गोष्टीला तीन रुपये मोबदला, असे आमिषही दाखवलेले असे. चित्रमयजगतमधली आनंदीबाईंनी पाठवलेली कथा पुढे बऱ्याच दिवसांनी छापली गेली,पण निनावी. त्यांनी 'मराठा मित्र' या मासिकाकडे एक कथा पाठविली आणि 'मोबदला पाहिजे' असे निक्षून लिहिले, 'मराठा मित्र' हे मासिक त्या वेळी गोपाळराव दाजीबा दळवी चालवीत. 'मराठा मित्र'ला दिलेली कथा वयाच्या विसाव्या वर्षी लिहिलेली 'बेगम दिलआरा' ही त्यांनी लिहिलेली [illegible] अद्भुत[illegible]कथा या कथेचं कथानक आणि वातावरण त्यांना जावरा ह्या माळवा प्रांतातील मुसलमान राजाच्या छोट्या संस्थानातून मिळालं. त्यांच्या बहिणीच्या यजमानांची जावऱ्याला बदली झाली होती. त्या वेळी आनंदीबाईंनी जावऱ्यातलं लोकजीवन तिथल्या मारवाडी स्त्रिया, त्यांच्या चालीरीती, मुसलमान बेगमा, तिथला नबाब, त्यांचं पतंग उडवणं हे सारं पाहिलं होतं. बेगमा आणि नबाब यांच्या त्या क्रीडेची अनेक चित्रं त्यांनी त्या परकऱ्या वयात मनःचक्षूंपुढे आपल्या बालबुद्धीने रंगवली होती. 'बेगम दिलआरा'त ती परिणत झाली. जावऱ्याचा नदीकाठ, रस्ते, कोठी, मशिदी, रोषणाई या साऱ्या वातावरणाचा उपयोग कथानकात त्यांनी उपयोगात आणला. या कथेत त्यांनी त्यागी, आदर्श नायिका रंगवली होती. गरीब शिक्षकावर प्रेम करणारी, त्याच्यासाठी बादशहाचे बेगमपद आणि वैभव लाथाडणारी 'बेगम दिलआरा' अनेकांच्या कौतुकाला पात्र ठरली. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांनीही या कथेचं कौतुक केलं. 'मराठामित्र'च्या संपादकांना त्यांनी पत्र टाकून विचारलं की, 'ही गोष्ट कोणी लिहिली? पुरुषाने लिहून स्त्रीच्या नावाने छापली नाही ना?' ही कथा भाषासौंदर्याने नटलेली होती, पण व्याकरणाच्या आणि शुद्धलेखनाच्या चुका असल्यामुळे 'मराठामित्र'चे उपसंपादक असलेल्या शि. स. शिर्के यांनी 'कुमारी आनंदी' या टोपण नावाने कथा पाठविलेल्या या लेखिकेला कु. अनसूया शिंदे यांना एक चिठ्ठी पाठवली. 'तुमच्या या गोष्टीत शुश्रूषा हा शब्द वारंवार आला आहे. तो अशुद्ध (सुश्रूषा) लिहिला आहे. त्यामुळे 'सुश्रूषा' या एका शब्दाचीच शुश्रूषा करण्यात माझा फार वेळ गेला आहे.'

ही चिठ्ठी लिहिणारे शि. स. ऊर्फ शिवरामपंत शिर्के त्या वेळी 'काव्यानंद' या टोपणनावाने कविता लिहीत होते. लेखिकेला त्यांनी जी चिठ्ठी पाठवली त्यातूनच त्यांचा पुढे



अनुक्रमणिका

स्नेह वाढला. ही चिठ्ठी एखाद्या कथेत कथानक शोभावं अशी त्यांच्या भावी आयुष्याची, सहजीवनाची नांदी ठरली. कल्पित कथेतील प्रणयरम्य कथानकापेक्षाही अत्यंत रोमहर्षक. त्या काळातली ही मराठा तरुणी समाजाच्या चार पावलं पुढेच होती. अनसूया पुढे आनंदीबाई शिर्के झाली, पण तिची स्वतःची अशी लग्नासंबंधीची ठाम मतं होती. हुंडा अजिबात न घेणाऱ्या, लग्नात कपर्दिकही न मागणाऱ्या तरुणाशीच मी लग्न करीन. सुरुवातीला त्यांच्या लग्नाला घरातून विरोध झाला. पण तोही लवकरच मावळला. काव्यात्म वृत्तीच्या, मनाने हळव्या असलेल्या आपल्या मुलाचं लग्न मनाविरुद्ध केलं तर जन्मभर पस्तावावं लागेल, हे शिर्क्यांच्या मातेला ठाऊक होतं. पण आपल्या पतीचं मन कसं वळवायचं ? कोकणस्थ मराठ्याच्या घरात, इतिहासप्रसिद्ध शिर्क्यांच्या श्रेष्ठ कुलात देशस्थ मराठ्याची मुलगी लग्न होऊन येणार, या वृत्तामुळे समग्र मराठा समाजात त्या वेळी प्रचंड वादळ माजलं., अनेक धमक्यांना तोंड द्यावं लागलं. पण शिर्के यांच्या आईनं आपल्या पतीचं मन वळवण्यात यश मिळवलं. रूपानं उजवी असलेली अनसूया (अनसूया हे त्यांचं माहेरचं नाव) त्यांच्या पसंतीला उतरलेली होती. कथालेखनासाठी 'आनंदी' टोपण नाव घेतलेल्या अनसूयेला समाजाची बंधनं झुगारून शिर्क्यांनी आपल्या हृदयात विराजमान केलं. कु. अनसूया शिंदे सौ. आनंदीबाई शिर्के झाल्या. शिर्क्यांनी आनंदीबाईंच्या लेखनाला सदैव प्रोत्साहन दिलं. वाङ्मयप्रेमी पती लाभला हे आनंदीबाईंचं भाग्यच.

अंतःस्फूर्तीनं गोष्ट लिहून ती टोपण नावाने प्रसिद्धीला पाठवणाऱ्या आनंदीबाईंच्या लेखनाचा प्रपंच पुढे जोमाने विस्तारला. कथाकुंज (१९२८), कुंजविकास (१९३३), भावनांचा खेळ (१९४३), जुईच्या कळ्या (१९३९), तृणपुष्पे (१९५८), साखरपुडा (१९६४), आणि गुलाबजाम (१९७१) या संग्रहांतून आनंदीबाईंचं कथाविश्व साकारलं आहे. 'करमणूक'च्या कालखंडापासून आपल्या कथालेखनाला सुरुवात केलेल्या आनंदीबाई पुढे सहा दशकं सातत्याने कथालेखन करीत राहिल्या. स्त्रीची दुःखं, तिच्या समस्या, अनीतीबद्दलच्या कल्पना, त्यागी वृत्ती, यातून आपलं कथाविश्व साकार करताना नीतिमूल्यांची एक जाणीव त्यांनी सदैव जपली होती. त्या काळातल्या लेखिकांप्रमाणेच त्यांनी तत्कालीन प्रश्न कथेत मांडताना बोधवादी कथा लिहिल्याची टीकाही त्यांच्या लेखनावर झाली. पण त्याकडे लक्ष न देता त्यांनी स्त्रियांनी हळदीकुंकू करावं का, वटसावित्रीचं व्रत करावं का, असे पुरोगामी प्रश्नही कथेतून मांडले. प्रेमकथा लिहिण्याचं धाडसही त्यांनी त्या काळात केलं, पण या प्रेमकथाही मर्यादा ओलांडून वर्णिल्या नाहीत. श्रद्धा, प्रेम, निष्ठा, समंजसपणा यांची संसारात जोड हवी, हे सूत्र कथेत गुंफताना त्यांनी आजूबाजूच्या वास्तव जगाचं भान ठेवून आपलं कथाविश्व साकारलं आहे.

१९०९ ते १६ या कालखंडात लिहिलेल्या कथा आनंदीबाईंच्या 'कथाकुंज' या



अनुक्रमणिका

पहिल्या कथासंग्रहात प्रसिद्ध झाल्या. सुरुवातीच्या कथा या अगदी नवशिक्या लेखिकेने लिहाव्यात, अशाच आहेत. त्यांतल्या चार भाषांतरित होत्या. कै. तात्यासाहेब कोल्हटकरांनी या कथासंग्रहाला प्रस्तावना लिहिली होती. त्या वेळी लेखिकांचे फारसे लेखन होत नव्हते, त्यामुळे या कथासंग्रहाच्या हजार प्रती सहज खपल्या होत्या. आनंदीबाईंच्या कथानकांत कल्पनारम्यता असली, तरी अनुभवसमृद्धता आणि कौशल्यपूर्ण मांडणी हे त्यांच्या लेखनाचं खास वैशिष्ट्य. 'कथाकुंज', 'कुंजविकास', 'भावनांचे खेळ' या कथासंग्रहांतील कथांचे स्वरूप फारसे बदललेले दिसत नाही. हरिभाऊंच्या कथालेखनाची स्फूर्ती घेऊन कथा लिहिणाऱ्या आनंदीबाई या कथांतून काही वेळा अद्‌भुत रम्यतेतून वावरतात, अशी टीकाही त्या वेळी झाली. त्यांच्या कथासृष्टीतील बहुतेक सर्वच व्यक्ती ह्या सत्प्रवृत्त, त्यागी व आदर्श आहेत. तसेच कथांतील योगायोग यावरही टीका झाली. पण कल्पनारम्यता आणि अतिशयोक्तीचे गालबोट लागले असले, तरी भोवतालच्या समाजाचे सूक्ष्म निरीक्षण, अनुभवांची मांडणी कलात्मकपणे करणे यात त्यांची हातोटी आहे. त्यांच्या साध्या सरळ निवेदनात जिवंतपणा आहे. तंत्रदृष्ट्या त्यांच्या लेखनात कोणतेच प्रयोग नाहीत, पण बदलत्या समाजस्थितीचं भान ठेवून त्यांनी निश्चितच लेखन केलेलं आहे.

'कुंजविकास'मधील 'तिने आत्महत्या का केली' या कथेत आपल्या आजारात आपण आपल्या मुलाकडे दुर्लक्ष केलं आणि म्हणून तो मरण पावला, याची तीव्र जाणीव होऊन एका मातेने आत्महत्या केली असं दाखवलं आहे. आभासात्मक उत्कट उदाहरणाचं अत्यंत संयमित चित्रण करताना आनंदीबाईंच्या लेखनकौशल्याची हातोटी दिसून येते. 'तृणपुष्पे', 'जुईच्या कळ्या' या त्यांच्या कथासंग्रहातील 'भावनांचा खेळ', 'सुशीलेचा विचार', 'स्त्री' या कथांत स्त्रीच्या भावनांचे सूक्ष्म चित्रण आढळते, तसेच लेखिकेचे कथाविश्व व्यापक झाल्याची जाणीव होते. 'अलौकिक आत्मदहन' ह्या कथेचं इंग्रजीत भाषांतर त्या वेळी झालं, तर 'दैवाचा खेळ', 'हेमाची निवड', आणि 'वादळी पातळ' या कथांची गुजरातीत भाषांतरे झाली.

आनंदीबाईंच्या पहिल्या दोन कथासंग्रहांतील (कथाकुंज, कुंजविकास) कथा आज वाचायला लागलो, तर त्यांतील रहस्यमयता, कल्पनाचमत्कृती, योगायोग या घटनांनी त्या फारशा भावत नाहीत, पण लेखिकेबरोबर पुढील काळात कथेचा विकास होत गेला. अनुभवांच्या मांडणीत समर्थता आली. 'तृणपुष्पे' आणि 'साखरपुडा' या कथासंग्रहांत काळानुसार बदललेली स्त्री, तिच्या नव्या समस्या याचा मागोवा आनंदीबाईंनी घेतलेला दिसतो. पहिल्या कथासंग्रहातील सोशिक, अपमानित, असहाय स्त्री जाऊन तिच्याऐवजी स्वतःच्या पायांवर हिमतीने उभी राहणारी स्त्री, अर्थार्जनाने स्वतंत्र बनलेली स्त्री, स्वतःचे ध्येय साध्य करणारी स्त्री त्यांनी साकार केली आहे. त्यांच्या कथेचा हा विकास परिवर्तनशील











समाजाचा द्योतक आहे. 'करमणूक' कालखंडापासून कथा लिहिणाऱ्या आनंदीबाई मराठी कथेच्या विकासाची सर्व वळणं पाहत होत्या. तंत्रातील, आशयातील बदल, हे सारं पाहत पाहत त्या आपल्या कथा आशय आणि अभिव्यक्तीने समृद्ध करीत राहिल्या, म्हणूनच आजही त्यांच्या कथेचं स्मरण होतं.

१९६५ साली आनंदीबाईंनी पन्नालाल पटेल यांच्या 'मळेला जीव' या गुजराती कादंबरीचा अनुवाद साहित्य अकादमीकरिता मराठीत केला. 'जीवी' हे त्यांचे मराठीतील भाषांतर. हे भाषांतर अत्यंत सरस झाले आहे. 'महाराजांच्या संगति' ह्या नावाने गुजरातीतील 'महाराजनी साथे' या पुस्तकाचं भाषांतरही त्यांनी केलं.

'वाघाची मावशी', 'कुरूप राजकन्या' ही त्यांची बालांसाठी लिहिलेली पुस्तके.

कादंबरीलेखनाचा प्रयत्नही त्यांनी १९६८ मध्ये केला, पण कादंबरीपेक्षा आनंदीबाईंनी कथाच सरस लिहिल्या. 'रूपाली' ह्या कादंबरीत त्यांनी साठ-सत्तर वर्षांपूर्वी मराठा समाजाची आर्थिक, शैक्षणिक, सामाजिक आणि वैचारिक परिस्थिती कशी होती, उच्च-नीचतेच्या भावनेने त्यांच्यात बोकाळलेली जातीयता, त्यापोटी होणारे हेवेदावे आणि त्यांचे भलेबुरे परिणाम त्यांनी लहानपणी पाहिले. त्याचं चित्रण या कादंबरीत केलं आहे.

आपला प्रपंच सांभाळत त्या काळात आनंदीबाईंनी विपुल असं कथालेखन केलं. मराठी कथेच्या बाल्यावस्थेत ज्या लेखिकांचं नाव आदरानं घेतलं जातं, त्यांत आदराचं स्थान मिळवलं. सातत्यानं त्या लिहीत राहिल्या आणि आयुष्याच्या उतरणीला त्यांनी आपल्या जीवनाचं त्यातील भल्याबुऱ्या घटना-प्रसंगांसह सिंहावलोकन केलं. आपल्या कृतार्थ जीवनाचं ते चिंतन होतं.

आणि १९७२ च्या सुमारास आनंदीबाईंचं 'सांजवात' हे आत्मचरित्र प्रसिद्ध झालं आणि त्यांचं नाव परत एकदा मराठी रसिकवर्गात उजळून निघालं. 'आपल्या जीवनात घडलेल्या घटना मुलांना उलगडून सांगाव्यात म्हणून माझ्या आयुष्यात जे जे घडलं ते मी लिहून काढलं. यात माझी योग्यता, विद्वत्ता वा कसब-कौशल्य असं काही नाही. कसब असेलच तर ते स्मरणशक्तीचं आहे. तिनं गतजीवनातले सारे प्रसंग जसे घडले तसे आपल्या संपुटात सांभाळून ठेवले आणि मी लिहीत गेले तसे ते उलगडून पुढे धरले.' आत्मचरित्र लिहितानाची आपली भूमिका त्यांनी मनमोकळेपणानं सांगितली आहे. या आत्मचरित्रातून आपला जीवनपट उलगडताना सर्व मानसिक व्यथा विसरून त्या गतकाळातील जीवनानुभवात एकरूप होऊन रंगून जाऊन परत एकदा पुनःप्रत्ययाच्या अनुभूतीनं आपला भूतकाळ जिवंत करतात. आपला स्मृतिकोश गोचर करतात. त्या 'सांजवात'मध्ये लिहितात, 'संध्याकाळी देवापुढे सांजवात लावून बसते, तेव्हा साहजिकच गतजीवनाचं सिंहावलोकन होतं.' सिंहावलोकन करीत असताना आनंदीबाईंचं मन अंतर्मुख

होतं. अन् आयुष्यात कळत-नकळत घडलेल्या चुका, प्रमाद सारं आठवतं. सुखदुःखाचे प्रसंग आठवून मन सुखावतं-दुखावतं. डोळ्यावाटे झरतं. 'सांजवात' वाचताना आपल्याला सदैव आठवण होते लक्ष्मीबाई टिळकांच्या 'स्मृतिचित्रां'ची. स्मृतिचित्रांतील भाषेत जी सहजता आहे, तशीच सहजता आनंदीबाईंच्या शैलीत आढळते. आयुष्यात जे घडलं, त्याच्यात कुठलाही आडपडदा न ठेवता, सुख-दुःखाचे प्रसंग, मान-अपमान या साऱ्याच गोष्टी या दोघी जणी आपल्या चरित्रातून अगदी सहजपणे चित्रित करतात. म्हणूनच अकृत्रिम भाषाशैलीने आणि अंगभूत सौंदर्याने मराठी साहित्यातील कोरीव लेणी म्हणून स्मृतिचित्रांबरोबर आनंदीबाईंच्या 'सांजवात'चं नाव घ्यावंसं वाटतं. आपल्या गतजीवनाकडे तटस्थपणे पाहत अत्यंत सहजपणे आणि तसंच अत्यंत प्रांजळपणे आनंदीबाईंनी आपला अवघा जीवनपट उलगडला आहे. सर्वसामान्य स्त्रीच्या जीवनात जे सुखदुःखाचे प्रसंग येतात. तसेच आनंदीबाईंच्या जीवनात आले, पण त्यांच्या जीवनात घडलेली स्थित्यंतरं, संघर्ष, समस्या या साऱ्यांना त्यांनी अत्यंत धीरोदात्तपणे तोंड देऊन त्यातून त्या पार पडल्या आहेत. कोलमडून पडू की काय असं वाटलं त्या वेळी त्यांनी स्वतःला सावरलं आहे. कडू-गोड आठवणी जपत आपल्या पतीला, त्याच्या हळव्या मनाला सांभाळत, आल्या प्रसंगाला तोंड दिलं आहे. जीवनात जे वाट्याला आलं ते आनंदानं आपलं म्हणून स्वीकारलं आहे. पतीच्या सहवासातील आठवणी सांगता सांगता त्या त्यांच्या स्वभावाचा कंगोरा न् कंगोरा रंगवतात. पण पन्नास वर्षांचा सहवास लाभलेला जीवनसाथी सोडून गेल्यावर विलक्षण व्यथित होतात. कारण सावलीप्रमाणे साथ करताना त्यांचं अवघं जीवनच परस्परांच्या प्रीती-विश्वासानं व्यापलेलं होतं. सहजीवनातील हे वियोगाचं दुःखही त्या पचवतात. करारी, निग्रही अशा आनंदीबाई आपल्या लाडक्या, वयात आलेल्या मुलाचा– शरदचा मृत्यू डोळ्यांदेखत पाहतात. त्या लिहितात, 'लोकांच्या घरी कृष्णजन्म झाला आणि आमचा कृष्ण देवाघरी गेला.' त्यांच्या अंतरीचे हे दुःखाचे कढ मोठ्या विलक्षण ताकदीने त्यांनी या एकाच वाक्यात मोकळे केले आहेत.

आपल्या साऱ्याच गतजीवनाकडे तटस्थपणे पाहत पाहतच आनंदीबाई जीवनातील एकेक पट उलगडतात. त्यांच्या विवाहानं तत्कालीन मराठा समाजात जी खळबळ माजली आणि लोकांनी त्यांना जो त्रास दिला त्याची हकिगत वाचली की, वाटतं, केवढं दिव्य या स्त्रीला सहन करावं लागलं! सासरच्या जवळच्याच नातेवाईकांनी किटाळ आणलं. पण त्यांचे पती त्यांच्या पाठीशी खंबीरपणे उभे होते. कोर्ट-कचेऱ्या, पैशाचा चुराडा, मानसिकताण, सारं सारं सहन करत त्यातूनही जीवननौका स्थिर ठेवण्यासाठी ते दोघंही प्रयत्नशील होते. शिर्के यांना असाध्य रोग झाल्यावरही आनंदीबाईंनी अत्यंत धीरानं वागून त्यांचं पथ्यपाणी सांभाळून आल्या संकटाला तोंड देऊन त्यावर मात केली. पैशाची

जुळवणी तर सदैव करावी लागे. पण कधीही या दोघांनी धीर सोडला नाही. जळगावला शिर्क्यांची बदली झाल्यावर त्यांची तब्येतही सुधारली आणि जळगावात या कुटुंबाचा जमही चांगला बसला.

कथालेखिका म्हणूनही त्या काळात आनंदीबाईंना नावाजलं जात होतं. पण 'सांजवात'-मध्ये आपल्या लेखनाविषयी त्या फारसं लिहीत नाहीत. कदाचित हा त्यांचा स्वभाव असावा. त्या काळात 'स्त्री' मधून त्यांच्या कथा सुरुवातीला आल्या. शंकरभाऊ किर्लोस्कर- 'स्त्री' चे संपादक त्यांच्याशी अत्यंत प्रेमादराने वागत. अडचणीच्या वेळी शंकरभाऊंनी केलेली आर्थिक मदत, आनंदीबाईंनी अत्यंत नम्रपणे परत केली होती. १९३६ साली जळगावला झालेल्या साहित्य संमेलनाच्या स्वागताध्यक्षपदाचा मान आनंदीबाईंना मिळाला. याआधी स्त्री स्वागताध्यक्ष कधीच झाली नव्हती. माधवराव पटवर्धन अध्यक्ष होते. या बावीसाव्या साहित्य संम्मेलनाच्या निमित्ताने माधवराव पटवर्धन, आचार्य अत्रे, मामा वरेरकर या थोर साहित्यिकांची ऊठबस त्यांच्या घरी झाली. १९३६ साली आनंदीबाई ऑनररी मॅजिस्ट्रेट झाल्या. जळगावातील महिला मंडळाच्या चिटणीस आणि नंतर त्या अध्यक्षा झाल्या होत्या. जळगावच्या सामाजिक जीवनात त्यांचा सक्रिय सहभाग होता. प्रपंच सांभाळून लेखन करीत. सामाजिक बांधिलकीचं भान ठेवणाऱ्या आनंदीबाईंनी आपल्या अंगभूत गुणांनी आणि कर्तृत्वानं आपलं असं एक स्थान सिद्ध करून दाखवलं. पुण्याला अखिल भारतीय मराठा परिषद भरली. आनंदीबाई त्याच्या अध्यक्षा झाल्या. १९३८ सालची ही गोष्ट. मराठा समाजाच्या दृष्टीने ही गोष्ट अप्रूप होती. 'सांजवात' वाचत असताना आनंदीबाईंच्या कर्तृत्वाचा हा आलेख आपल्या डोळ्यांसमोरून सरकत राहतो.

'सांजवात' मध्ये आनंदीबाईंचे आई-वडील, बहीण, भाऊ, आजी-आजोबा, सासू-सासरे यांची व्यक्तिचित्रे आनंदीबाईंच्या सहजस्पर्शी लेखणीनं अत्यंत नेटकेपणानं साकार झाली आहेत. आपल्या पतीच्या स्वभावाची विविध रूपं त्यांनी अत्यंत प्रांजळपणे, हातचं न राखता रेखाटली आहेत. घरच्या सास्वासुनांवर दरारा ठेवणारे आजोबा, शिर्क्यांनी बडोद्याला जोडलेले मित्र- वि. द. घाटे, तिवारी, सोनाळकर आदां, आईप्रमाणे मानलेल्या चिमाबाई भालेकर, जुन्या पिढीतल्या आजी या साऱ्यांची व्यक्तिचित्रं नेटकी आहेत. आजीचं स्वभावचित्र त्या इतकं सुंदर रंगवतात की, आपल्या मनात घर करून राहतं. आजी वारल्या तेव्हा आनंदीबाईंना कुतुहल होतं की कपाटाचं दार उघडून या आजी अधूनमधून कशाचं दर्शन घेतात व पाया पडतात, म्हणून त्यांनी आजी गेल्यावर ते शिसवी कपाट उघडलं, तर आत तांबडं पागोटं, रेशीमकाठी उपरणं, तांबड्या रेशमी पुठ्ठ्याची गीता व तांबड्या ब्राह्मणी जोड्यांचा एक जोड आणि एक काठी एवढ्या जिनसा होत्या. या एवढ्या वर्णनातून आपण जाणून घेतो. मन अंतर्मुख होतं. किती हृदयंगमता आहे या वर्णनात !

बडोद्याच्या फत्तेसिंह युवराजांचं लग्न, नवसारीचा पारसी समाज , त्यांच्या चालीरीती, त्यांची भाषा-वस्त्रप्रावरणं, गुजरातेतील मैत्रिणी, गुजराती समाज, त्या जिथे जिथे वडिलांच्या बदलीच्या निमित्ताने राहिल्या तिथला समाज, ते गाव, सारं काही आपल्या अर्थवाही भाषाशैलीतून वर्णतात. म्हणूनच त्यांचं हे आत्मचरित्र बहुपेडी आहे. मध्यमवर्गीय मराठा स्त्रीने त्या काळात एका संसारी स्त्रीने, कथालेखिका म्हणून मिळवलेला नावलौकिक, जळगावच्या समाजजीवनात निर्माण केलेलं आपलं स्थान हे पाहत असताना त्यांचं ठसठशीत व्यक्तिमत्त्व लक्षात राहतं, तर त्या काळात समाजाचा विचार न करता त्यांनी केलेलं इच्छित पुरुषाशी लग्न. सात भावंडांत लाडक्या असलेल्या आनंदीबाईंच्या व्यक्तिमत्त्वाच्या ह्या पैलूंबरोबर त्यांचं कथासृष्टीतील अढळ स्थानही महत्त्वाचं, हे विसरता कामा नये. म्हणूनच हे व्यक्तिमत्त्व, बहुपेडी असं व्यक्तिमत्त्व काळाच्या पडद्याआड गेलं असलं, तरी 'सांजवात'च्या रूपानं त्यांची साहित्यिक प्रतिभा आधुनिक मराठी सारस्वतात मंदपणानं कायम तेवत राहील.

(२४ ऋणानुबंध, डी.पी. रस्ता, औंध, पुणे ४११ ००७)

द. श्री. बापट

# एका जगप्रसिद्ध चरित्राची द्विशताब्दी

जेम्स बॉस्वेलने १७९१ साली प्रसिद्ध केलेले डॉ. सॅम्युअल जॉन्सनचे चरित्र इंग्रजी भाषेतील एक उत्कृष्ट चरित्र मानले जाते. याआधी चरित्रग्रंथ प्रसिद्ध झाले नव्हते असे नाही, पण चरित्रनायकाचे सारे व्यक्तिमत्त्व जिवंत करणारे, त्याचे सारे गुण-दोष, आशा-आकांक्षा, व्यक्तिगत हेवेदावे, मत्सर, आवडीनिवडी व्युत्पन्नमतित्व, संभाषणचातुर्य, मित्रपरिवार, सभोवतालची राजकीय व सामाजिक परिस्थिती ज्यातून व्यक्त होते असे हे चरित्र आहे.

या चरित्रग्रंथाचा लेखक जेम्स बॉस्वेल हा स्कॉटलंडमधील ऑचिन्लेक या लहान जहागिरीचे वारसदार आणि स्कॉटलंडच्या सेशन्स कोर्टाचे न्यायाधीश लॉर्ड ऑचिन्लेक [१] यांचा ज्येष्ठपुत्र. एडिंबरा शहरी त्याचे शालेय आणि विद्यालयीन शिक्षण झाले. लॅटिन आणि इंग्रजी भाषा, थोडेफार गणित एवढेच त्याकाळचे शालेय शिक्षण होते. वयाच्या तेराव्या वर्षी त्याने एडिंबरा विद्यापीठात प्रवेश केला आणि भाषा व कायदा या विषयांचा सहा वर्षे अभ्यास केला. ऐन तारुण्यात सैन्यात प्रवेश करावा, असे त्याच्या मनात होते. [२] पण घरच्या वडीलधाऱ्यांना हे पसंत नव्हते. एडिंबरामध्ये नाटकमंडळ्यांत त्याचा राबता सुरू झाला. नाटक व्यवसाय तेव्हा चंगीभंगी मानला जाई. रोमन कॅथॉलिक धर्ममताकडे तो झुकला होता. लॉर्ड ऑचिनलेक यांना मुलाचे हे स्वच्छंद वर्तन रुचले नाही.

एडिंबरामधून जेम्सची पाठवणी ग्लास्गो विद्यापीठात करण्यात आली. प्रख्यात तत्त्वज्ञानी व अर्थशास्त्री ॲडॅम स्मिथ [३] तेव्हा (१७६०) ग्लास्गो विद्यापीठात प्राध्यापक होते. एकोणीस वर्षांचा बॉस्वेल या ख्यातनाम विचारवंताच्या सान्निध्यात आला. ॲडॅम स्मिथ यांना हा विद्यार्थी चौकस आणि सालस वाटला. रोमन कॅथॉलिक धर्मपंथ स्वीकारून धर्मोपदेशक बनण्याचा मानस मुलाने व्यक्त करताच लॉर्ड आचिन्लेक चांगलेच खवळले. कॅथॉलिक धर्मानुयायाला त्या काळी इंग्लंडमध्ये रूढ कायद्याप्रमाणे कोणतेही अधिकारपद स्वीकारता येत नसे, वकिली पेशात शिरता येत नसे, आणि मुख्य म्हणजे मालमत्तेत वारसा हक्क सांगता येत नसे. ही आध्यात्मिक चैन त्यांना परवडणारी नव्हती. एडिंबराला

१. ही न्यायाधीशपदामुळे प्राप्त झालेली पदवी. वंशपरंपरागत नव्हे.

२. सैन्यातील अधिकारपदे पैसे मोजून विकत घ्यावी लागत.

३. Wealth of Nations आणि Theory of Moral Sentiments या ग्रंथांचे लेखक.

वडलांच्या घरी परतण्याऐवजी बॉस्वेल लंडनला पळून गेला. शेवटी बापलेकांत तडजोड होऊन कायद्याचा अभ्यास पुरा करण्यासाठी बॉस्वेल घरी परतला. १७६२ साली त्याच्या पदरी कायद्याची पदवी पडली.

मुळात बॉस्वेल हा काही प्रतिभावंत लेखक नव्हता. पण वाङ्मयासंबंधी त्याच्या मनात मोठे आकर्षण होते. समाजातील प्रतिष्ठितांत आपली ऊठबस असावी, प्रतिभावंतांच्या भोवती वावरावे, त्यांच्या विद्वद्‌गोष्टीत भाग घ्यावा, अशी आंतरिक ऊर्मी त्याला असे. लंडनमध्ये त्याने एक वर्ष वास्तव्य केले. त्या काळात नाटककार, कवी ऑलिव्हर गोल्डस्मिथ, पार्लमेंटचा सदस्य जॉन विल्किस, चार्लस् चर्चिल इत्यादी नामवंतांशी त्याचा स्नेह जडला. डॉ. जॉन्सनचा परिचय घडला तो १७६३ साली डेव्हिस या पुस्तकविक्रेत्याच्या घरी. कायद्याच्या पुढील शिक्षणासाठी बॉस्वेल हॉलंडमध्ये [४] इटरेक्ट विद्यापीठात शिक्षणासाठी दाखल झाला. युरोपमधील वास्तव्यात रूसो आणि व्होल्टेर या महाभागांशी त्याचा संबंध आला.

इटरेक्टला कायद्याचे शिक्षण पुरे झाल्यावर बॉस्वेल युरोपमध्ये प्रशिया, स्वित्सर्लंड, इटली, कॉर्सिका [५] असा प्रवास करीत १७६५ मध्ये मायदेशी परतला. एडिंबराला वकिली करीत असता लंडनला त्याचे जाणे-येणे घडे. जॉन्सनच्या साहित्य मंडळाचा (Literary Club) तो एक सदस्य होता. डॉ. जॉन्सनशी बॉस्वेलचा पत्रव्यवहार मोठा होता. जॉन्सनला मुळात पत्रव्यवहाराची भारी हौस.

स्कॉटलंड आणि स्कॉच माणसे हा जॉन्सन आणि त्याच्या मित्रमंडळींचा एक चेष्टेचा विषय असे. पण बॉस्वेलच्या निमंत्रणावरून जॉन्सन स्कॉटलंडमध्ये आणि विशेषतः स्कॉटलंडच्या पश्चिम किनाऱ्याजवळील हेब्रिडिज् बेटात प्रवासासाठी गेला. तेव्हाचा स्कॉटलंडमधील प्रवास तसा खडतर होता. या प्रवासावर पुढे Tour to the Hebredes हा ग्रंथही प्रसिद्ध झाला.

जॉन्सनच्या मृत्यूनंतर त्याचा सारा पत्रव्यवहार अभ्यासून, स्वतः मोठ्या परिश्रमपूर्वक दीर्घकाळ ठेवलेल्या टिपणांच्या आधाराने [६] संबंधितांच्याकडून माहिती गोळा करून,

४. स्कॉटलंडमध्ये लागू असलेला कायदा हा इंग्रजी कायद्यापेक्षा डच कायद्याच्या वळणाचा होता. कायद्याच्या शिक्षणासाठी हॉलंडमध्ये जाण्याचा रिवाज होता.

५. या लहान बेटाच्या इतिहासावर बॉस्वेलने पुढे एक ग्रंथ लिहिला.

६. आता झालेल्या संशोधनानुसार बॉस्वेलने आयुष्यभर केलेला पत्रव्यवहार, नोंदी, टिपणे, Journals हा एक साहित्यिक ठेवा आहे. अमेरिकेत येल विद्यापीठात १९५१ सालापासून बॉस्वेलच्या कागदपत्रांवर संशोधन झाले. बॉस्वेलच्या कागदपत्रांचे काही खंड आता प्रसिद्ध झाले आहेत.

स्वतःची आर्थिक स्थिती विशेष चांगली नसता, कौटुंबिक आपत्तींचे घाव सोसून, सहा वर्षांच्या परिश्रमाने बॉस्वेलने हा चरित्रग्रंथ सिद्ध केला.

*परिचरितव्याः सन्तः यद्यपि न कथयन्ति सदुपदेशम्*
*यास्तेषाम् स्वैरकथाः ताः एव भवन्ति शास्त्राणि*

या भर्तृहरीच्या वचनाला अनुसरून जणू बॉस्वेल या महापंडितावरोबर आणि त्याच्या समकालीनांवरोबर वावरला. ऑक्सफर्ड विद्यापीठाने प्रसिद्ध केलेल्या Dictionary of Quotations मध्ये डॉ. जॉन्सनच्या तीनशे छत्तीस उक्ती नोंदविलेल्या आहेत. त्यांतील २२७ नोंदी बॉस्वेलने या चरित्रग्रंथामध्ये संभाषणचतुर जॉन्सनच्या विविध व्यक्तींशी, विविध विषयांवर झालेल्या उपहास, उपरोध, शाब्दिक कोट्या यांनी भरलेल्या संवादांची जी नोंद केली आहे, त्यांतून घेतलेल्या आहेत.

जॉन्सनच्या साहित्य मंडळाचे संस्थापक सदस्य प्रख्यात चित्रकार सर जोशुआ रेनॉल्ड यांना हा ग्रंथ अर्पण करण्यात आला आहे.– 'डॉ. जॉन्सन यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या साऱ्या रंगछटा, अगदी क्वचित असलेल्या बारीकसारीक डागांसह तुमच्या परिचयाच्या आहेत. या चरित्रात मी सत्याचा अपलाप कोठेही केलेला नाही, तरीही उघडेनागडे सत्य लोकांना रुचत नाही, हे मी ध्यानी घेतले आहे' असे नम्र विधान या अर्पणपत्रिकेत आहे.

बॉस्वेलची जॉन्सनशी प्रत्यक्ष भेट १७६३ साली झाली तेव्हा बॉस्वेल २२ वर्षांचा धडपडणारा कायद्याचा विद्यार्थी होता, तर जॉन्सन पन्नाशी ओलांडलेला लब्धप्रतिष्ठित साहित्यपंडित होता. जॉन्सनच्या मृत्यूपर्यंत म्हणजे १७८४ सालापर्यंत सतत २१ वर्षे पत्रव्यवहार, प्रत्यक्ष भेटगाठ, एकत्र जेवणेखाणे, एकत्र प्रवास, साहित्य मंडळातील वाङ्मयीन आणि इतर विषयांवरील संभाषणे, चर्चा यामुळे बॉस्वेलला हा 'महापुरुषसंश्रय' घडला. १७६३ पूर्वीची जॉन्सनच्या पूर्वायुष्याची माहिती संबंधित व्यक्तींकडून त्याला करून घ्यावी लागली. साहजिकच १७०९ ते १७६३ या कालखंडातील जॉन्सनच्या जीवनाचा वृत्तान्त या चरित्रग्रंथात फारसा विस्ताराने येत नाही.

स्टॅफोर्डशायर परगण्यातील लिचफील्ड गावी १७०९ साली सॅम्युअल जॉन्सनचा जन्म झाला. जॉन्सनचे वडील मायकेल जॉन्सन यांचा फिरत्या पुस्तक-विक्रेत्याचा व्यवसाय होता. बाप्तिस्मा विधीच्या वेळी त्यांचा उल्लेख सद्गृहस्थ (Gentelman) [७] म्हणून करण्यात आला आहे. बॉस्वेलच्या मते काही मालमत्ता असो-नसो, कोणताही आलतू फालतू माणूस स्वतःला जंटलमन म्हणवून घेई, तशातला हा प्रकार होता. मायकेल जॉन्सन शेजारच्या अनेक गावांतून बाजाराच्या दिवशी आपले पुस्तकाचे दुकान थाटे.

---

७ चांगली मालमत्ता असल्यामुळे ज्याला काही कामधंदा करण्याची जरूर नसते त्याला gentleman मानण्यात येई.

बर्मिंगहॅमसारख्या शहरातही तेव्हा पुस्तकाचे दुकान नव्हते.

लहानपणी जॉन्सनला स्क्रॉफ्यूला या क्षयसदृश रोगाची बाधा झाली. या दुखण्यामुळे त्याची दृष्टी अधू झाली. एक डोळा तर कामातून गेल्यासारखाच होता. चेहरा थोडासा विद्रूप, ओखीर वाखीर झाला. या रोगावर राजाचा स्पर्श हा त्या काळी अगदी अक्सीर इलाज मानला जाई. अॅन राणीचा स्पर्श आपल्या मुलाला व्हावा म्हणून जॉन्सनची आई त्याला लंडनला घेऊन गेली होती. जॉन्सनच्या अधू दृष्टीबद्दल बॉस्वेल लिहितो, 'अधू दृष्टीचा जॉन्सन तसा मोठा मर्मग्राही होता. अगदी बारीकसारीक गोष्टही त्याच्या नजरेतून सुटत नसे. एखादे मोडकेतोडके वाद्य तज्ज्ञ वादकाने सुरेख वाजवण्यासारखा हा प्रकार होता (an able performance upon bad instrument).

जॉन्सनचे प्राथमिक शिक्षण इंग्रजी व लॅटिन भाषांच्या अभ्यासाचे होते. ते लिचफील्ड गावी झाले. लॅटिन शिकविणारे हंटर हेडमास्तर फार मारकुटे होते. जॉन्सनच्या आठवणीप्रमाणे कामचुकार मुलांना ते झोडपून काढत, पण एखाद्याला विषय समजला नाही तरीही झोडपूनच काढत. प्रत्येक प्रश्नाचे उत्तर जर विद्यार्थ्याला माहीत असेल, तर शिक्षकाची जरूरच काय, असा प्रश्न जॉन्सन विचारतो.

जॉन्सनची गणना एकपाठी व्यक्तींत केली पाहिजे. अगदी लहानपणापासून त्याच्या तीव्र स्मरणशक्तीचा प्रत्यय येई. या मारकुट्या हेडमास्तरांबद्दल जॉन्सन मोठ्या आदराने बोले. लॅटिन भाषेच्या आपल्या उत्कृष्ट ज्ञानाचे श्रेय हंटर मास्तरांच्या छडीच्या प्रयोगाला द्यावे लागेल, असे तो म्हणे. शेक्सपियरच्या नाटकांतील [८] Sword, I will hallow thee for this thy deed या वाक्यात थोडा बदल करून तो म्हणे Rod, I will honour thee for this thy duty. शाळेमध्ये जॉन्सन इतरांपेक्षा भारी वरच्या दर्जाचा होता. अभ्यासात चुकला म्हणून त्याला शिक्षा जवळजवळ कधी झालीच नाही. वर्ग चालू असता इतर मुलांशी बोलून व्यत्यय आणल्याबद्दल मात्र त्याला अनेकदा शिक्षा होई. शाळेतील आपल्या या काळाबद्दल तो अभिमानाने सांगत असे. हुशार मुलाचे वर्णन करताना जॉन्सनसारखा हुशार असे म्हणण्याचा प्रघात होता. तो भारी चौकस बुद्धीचा होता. कोणतीही गोष्ट केवळ एकदा वाचली अगर ऐकली की त्याला मुखोद्‌गत होत असे. हेक्टर नावाच्या त्याच्या सहाध्यायीची आठवण बॉस्वेल नमूद करतो. 'एका कवितेची अठरा कडवी मी एकदा मोठ्याने वाचली. जॉन्सनने ती सारी पुन्हा म्हणून तर दाखविलीच, पण वाचताना झालेली एक विशेषणाची चूक त्याने दुरुस्त केली होती.'

पंधराव्या वर्षी त्याची शाळा अधिक शिक्षणासाठी बदलावी लागली. स्टूरब्रिजच्या

---

८. Henry VI Part 2 act IV

ग्रामर स्कूलमध्ये त्याला प्रवेश मिळाला. तेथील प्रमुख शिक्षक वेंटवर्थ आणि जॉन्सन यांचे काही विशेष जमले नाही. पुढे दोन वर्षे घरी राहून त्याने उदंड वाचन केले. पुस्तकांचा घरचा धंदा होता. झपाटल्यासारखे त्याने काही लॅटिन आणि ग्रीक ग्रंथांचे वाचन केले. "महाविद्यालयात प्राध्यापक सांगतील तेच ग्रंथ विद्यार्थी वाचतात. माझे वाचन चौफेर होते. ऑक्सफर्ड विद्यापीठात पेम्ब्रोक कॉलेजमध्ये १७ व्या वर्षी मी प्रवेश केला, तेव्हा माझ्याइतकी तयारी कोणाचीच नव्हती," असे जॉन्सन बॉस्वेलला सांगतो. जॉन्सनच्या वडिलांनी जरी मोठ्या उमेदीने मुलाला ऑक्सफर्डला पाठविले होते, तरी त्यांची स्थिती तशी बेताची होती. तशात पुस्तकविक्रीच्या धंद्याचे दिवाळे निघाले. या ओढाताणीच्या परिस्थितीत त्याने ग्रीक अभिजात साहित्य आणि ख्रिस्ती धार्मिक तत्त्वज्ञान यांचा तीन वर्षे अभ्यास केला. लॅटिन भाषेवर त्याचे प्रभुत्व असामान्य होते. ऑक्सफर्डच्या पहिल्या वर्षी त्याने त्या काळातील श्रेष्ठ कवी पोप यांच्या मसीहा (प्रेषित) नामक काव्याचे लॅटिन भाषान्तर केले, ते फार गाजले.

आर्थिक ओढाताणीने जॉन्सन अखेर मेटाकुटीला आला. मित्रमंडळींकडे याचना करणे, त्याच्या स्वाभिमानी स्वभावात बसत नव्हते. नाइलाजाने पदवीचा नाद सोडून त्याला ऑक्सफर्ड विद्यापीठाला रामराम ठोकावा लागला. तशात त्याचे वडीलही वारले आणि सारी जबाबदारी अंगावर येऊन पडली. शाळेतील एडमंड हेक्टर या मित्राकडे तो बर्मिंगहॅमला सहा महिने राहिला. त्या काळात लोबो नावाच्या कोणा पोर्तुगीज मिशनऱ्याने अबिसीनियाच्या प्रवासावर लिहिलेल्या पुस्तकाचे त्याने भाषान्तर केले (फ्रेंचमधून इंग्रजी). बर्मिंगहॅमच्या एका प्रकाशकाने ते प्रसिद्ध केले. त्याबद्दल त्याला पाच गिनी मोबदला मिळाला. जॉन्सनची ही पहिली ग्रंथरचना.

चरितार्थाचे साधन म्हणून त्याने लिचपील्डजवळ एरिचाल गावी ग्रीक आणि लॅटिन भाषा शिकविण्यासाठी एक निवासी शाळा काढली. ही शाळा जेमतेम दीड वर्षे चालली. लिचफील्ड गावचे निवृत्त सेनाधिकारी कॅप्टन गॅरिक यांची दोन मुले डेव्हिड आणि जॉर्ज आणि कोणी एक श्री. ओफली नावाचे सुखवस्तू गृहस्थ असे तीन विद्यार्थी दाखल झाले. जॉन्सनची ही अॅकॅडमी त्याच्या निवासस्थानीच होती. विद्यार्थ्यांवर जॉन्सनचा विशेष प्रभाव पडला नाही. त्याचे थोडे बेंगरूळ वाटणारे रूप, विचित्र हावभाव, बोलण्याची ठाशीव पद्धती यांची विद्यार्थ्यांना गंमत वाटे. तशात जॉन्सनने आपल्याहून वयाने कितीतरी मोठ्या एलिझाबेथ पोर्टर या बेचाळीस वर्षांच्या विधवेशी लग्न केले होते. आडव्या-तिडव्या वाढलेल्या, रंगरंगोटी करणाऱ्या, भडक कपडे वापरणाऱ्या या आपल्या पत्नीला जॉन्सन टेटी या लाडिक नावाने हाक मारी, तिच्याशी प्रेमाचे चाळे करी. विद्यार्थी हे सारे चोरून पाहत आणि त्यांना नित्य चेष्टेचा विषय मिळे. डेव्हिड गॅरिक हा पुढे इंग्रजी रंगभूमीचा नटसम्राट

बनला. जॉन्सनच्या विद्वत्तेबद्दल त्याला फार आदर वाटे. त्याच्या चालण्याबोलण्याची तो मोठी विनोदी नक्कल करीत असे.

अखेर नशीब अजमावण्यासाठी १७३७ मध्ये जॉन्सनने लंडनचा रस्ता धरला. डेव्हिड गॅरिकही याच वर्षी लंडनला कायद्याचा अभ्यास करावा म्हणून आला. इरीन नावाचे एक नाटक जॉन्सनने लिहिले होते. हे नाटक एखाद्या नाटक मंडळीने विकत घ्यावे म्हणून केलेल्या खटपटीला यश आले नाही. जॉन्सनची विद्वज्जड भाषा निर्मात्यांना पसंत पडेना.

श्री. एडवर्ड केव्ह हे Gentleman's Magazine नावाचे एक मासिकपत्र चालवीत असत. लॅटिन भाषेवरील प्रभुत्वामुळे असेल, फ्रेंच आणि इटालियन या दोन भाषांचे त्या भाषांतील साहित्याचे इंग्रजी भाषान्तर करण्याइतपत ज्ञान जॉन्सनला होते. असे भाषान्तर करणे, इतर लेखकांचे लेख काटछाट, बदल करून संपादित करणे असे सहसंपादकाचे काम जॉन्सनला मिळाले. पार्लमेंटमधील चर्चा तेव्हा वृत्तपत्रे उघडपणे छापू शकत नसत. 'जंटलमन्स मॅगेझिन'मध्ये सीनेट ऑफ लिलिपुटस् या नावाचे एक वरवर कल्पित भासणारे सदर चालविले जाई. सदस्यांची नावे कधी आद्याक्षरे, कधी टोपण नावे इत्यादी वापरून टाळली जात. पण चाणाक्ष वाचकांना ही पार्लमेंटमधील चर्चा आहे, हे सहज समजे. हे सदर लिहिण्याचे काम पुढे जॉन्सनवर सोपविण्यात आले. आयुष्यातील उमेदीची काही वर्षे जॉन्सनला अशा रीतीने केवळ पोटार्थी लेखक म्हणून घालवावी लागली. बॉस्वेलच्या शब्दांत 'for gain, not glory.'

त्याच्या काव्यप्रतिभेची चमक जुवेनालच्या Third Satire [९] या लॅटिन काव्याचे अनुकरण करून त्याने लिहिलेल्या 'लंडन' नावाच्या या काळातील काव्यात दिसून येते. १७३८ साली हे काव्य प्रसिद्ध झाले. त्यावर कवीचे नाव नव्हते. इंग्लंडमधील त्या काळचे श्रेष्ठ कवी पोप[१०] आणि इतर साहित्यिकांनी या काव्याची मोठी वाखाणणी केली.

ओढाताणीच्या परिस्थितीतून सावरण्यासाठी पुन्हा शिक्षकपेशा स्वीकारावा, निदान नियमित मासिकप्राप्ती तरी होईल, असा विचार त्याच्या मनात आला, पण या पेशाला पदवीची जरूर होती. डब्लिन आणि ऑक्सफर्ड विद्यापीठांनी जरी पुढे जॉन्सनला सन्माननीय डॉक्टर ऑफ लॉ'ची पदवी दिली, तरी या काळात त्याला मास्टरचा डिप्लोमा मिळावा म्हणून त्याच्या मित्रांना डब्लिन विद्यापीठाकडे रखबदली करावी लागली.

---

९. रोमच्या नागरी जीवनाचे उपरोधपूर्वक वर्णन या काव्यात आहे.

१०. अलेक्झँडर पोप. स्विफ्टने या कवीचे वर्णन paper sparing pope कागद वाचवणारा म्हणून केले आहे. पाठकोऱ्या कागदावर, पाकिटांवर, पत्रांच्या मार्जिनात, फार काय दोन ओळींच्या मधील कोऱ्या जागीही हा कविता लिहीत असे. ब्रिटिश म्युझियममध्ये याचे होमर या काव्याचे हस्तलिखित आहे ते अशा स्वरूपात.

इंग्लंडमध्ये तेव्हा गादीवर असलेले हॅनोव्हर राजघराणे फारसे लोकप्रिय नव्हते. राजा दुसरा जॉर्ज आणि पंतप्रधान रॉबर्ट वॉलपोल यांच्याबद्दल जॉन्सनच्या मनात विशेष आदर नव्हता. १७४० च्या सुमारास जॉन्सनच्या लिखाणात त्यांच्याबद्दल उपरोधिक उल्लेख येतात ते यामुळे.

चरित्रग्रंथाबद्दल जॉन्सनची मते आग्रही होती. चरित्रनायकाचे गुणदोष, यशापयश चरित्रात जसे आहे तसे दिसले पाहिजेत,[११] असा त्याचा कटाक्ष असे. रिचर्ड सॅव्हेज हा जॉन्सनचा अवलिया कविमित्र. प्रतिभावान खरा पण चंगीभंगी, व्यसनाधीन आणि भणंग होता. जॉन्सनने काही वर्षे आपल्या या विपन्नावस्थेतील मित्राबरोबर घालविलेली होती. कधी काळी सॅव्हेजची ऊठबस राजकारणी मंडळींत होती. सांगण्यासारखे अनेक किस्से त्याच्याजवळ असत. १७४४ मध्ये जॉन्सनने आपल्या या मित्राचे चरित्र प्रसिद्ध केले ते वरील ब्रीदाला जागून. सॅव्हेजचा जन्म विवाहबाह्य संबंधापासून झाला होता. काँटेस ऑफ मॅसलफील्ड हा त्याच्या आईचा उल्लेख बॉस्वेलला खटकतो. सॅव्हेज मात्र आपल्या कवितेत विवाहबाह्य संबंधातील मुलाचा उल्लेख Stauped in natures mint with extacy 'परमोच्च सुखाच्या क्षणी निसर्गाच्या टांकसाळीत घडलेले कलदार नाणे', असा करतो. औरस पुत्र बोलून चालून Tenth transmitter of a foolish face' त्याच त्या खुळचट चेहऱ्याची दहावी आवृत्ती काढणारा.

शेक्सपिअरच्या नाटकांची सटीक आवृत्ती काढण्याचा त्याचा मानस होता. १७४५ मध्ये त्याने मॅकबेथ नाटकावर एक दीर्घ निबंध प्रसिद्ध केला.

१७४७ साली जेम्स डोडस्ली या प्रकाशकाच्या विनंतीवरून 'इंग्रजी भाषेचा शब्दकोश' या अत्यंत गाजलेल्या शब्दकोशाच्या प्रकाशनाचा संकल्प जाहीर करण्यात आला. डोडस्ली आणि इतर सहा प्रकाशकांनी मिळून दोन खंडांतील हा कोश प्रसिद्ध करण्याचे योजून कोशरचनेचे सारे काम एकहाती सॅम्युअल जॉन्सनवर सोपविले. या कामाबद्दल १५७५ पौंड एवढा मोबदला ठरला. अर्ल ऑफ चेस्टरफील्ड– फिलिप डॉर्मर हे त्या वेळी राजकारणात मोठे प्रस्थ होते. सरकार दरबारी मोठ्या अधिकार पदावर होते. त्यांचा आश्रय मिळाल्यास पहावे म्हणून हा संकल्प त्यांना उद्देशून प्रसिद्ध करण्यात आला. आत्ताच्या राजकारण्यांप्रमाणेच त्या मुरब्बी राजकारण्याला असल्या वाङ्मयीन प्रकल्पात लक्ष घालण्याइतकी फुरसत नव्हती.

तीन वर्षांत हे कोशकार्य पुरे करण्याचा जॉन्सनचा मानस होता. डॉ. ॲडॅम्स या त्याच्या स्नेह्याची आठवण बॉस्वेलने नमूद केली आहे. फ्रेंच ॲकॅडमीला असा शब्दकोश

11. If we owe regard to the memory of the dead there is yet more respect to be paid to knowledge, to virtue and to truth.

बनविण्यास ४० वर्षे लागली आणि ४० विद्वान त्यासाठी खपत होते, तेव्हा हे काम तुम्ही ३ वर्षांत कसे संपवणार, असा प्रश्न अ‍ॅडॅम्सने विचारल्यावर जॉन्सनने गमतीने गणित मांडले. ४० x ४० = १६०० आणि ३ x १ = ३. एक इंग्रज ५०० फ्रेंचांना भारी ठरतो तो असा.

उपलब्ध कोशांतून शब्द निवडून, त्यांत अधिक शब्दांची भर घालून प्रत्येक शब्दाची उत्पत्ती, अर्थच्छटा आणि शब्दाचा मूळ साहित्यकृतीतून उद्धृत केलेला उपयोग, असे या कोशाचे स्वरूप होते. इंग्रजी भाषेचा इतिहास आणि व्याकरण यांचा ग्रंथारंभी ऊहापोह होता. या प्रचंड कामासाठी जॉन्सनने नेमलेल्या सहा सहायकांत पाच स्कॉटलंडमधील होते, हे बॉस्वेल अभिमानाने नमूद करतो.

हे कोशकार्य चालू असता जॉन्सनचे इतर लेखनही चालू होते. प्रिसेप्टर हा तत्त्वज्ञानविषयक ग्रंथ आणि Vanity of Human Wishes हे काव्य या कालखंडातले.

नटश्रेष्ठ डेव्हिड गॅरिक हा जॉन्सनचा विद्यार्थी आता नाट्यक्षेत्रात मोठी मान्यता पावला होता. त्याच्या खटपटीने जॉन्सनचे 'इरीन' हे नाटक अखेर रंगभूमीवर आले. बळेवळे त्याचे नऊ प्रयोग करण्यात आले.[१२] नाटक प्रेक्षकांना रुचले नाही. साफ पडले. जॉन्सनला मात्र आपल्या पहिल्यावहिल्या नाटकाच्या प्रयोगाचे भारी अप्रूप वाटले. त्यानिमित्त नवे डौलदार कपडे त्याने खास शिवून घेतले आणि पहिल्या प्रयोगाच्या दिवशी तो ते घालून मिरवला. त्याची सारी पात्रे एकजात विद्वज्जड भाषेत बोलली. स्त्रीपात्रांना भावभावना व्यक्त करण्यास वावच नव्हता. गॅरिकच्या मते शोकनाट्याचे तंत्र जॉन्सनला जमलेच नाही. एडमंड बर्क जॉन्सनच्या स्त्रीपात्रांचा 'स्त्रीवेषातील जॉन्सन' (Johnsons in pettycoats) म्हणून उल्लेख करतो. आपल्या नाटकाचे हे अपयश जॉन्सनने मोकळेपणाने मान्य केले.

१७४९ साली रॅम्बलर नावाचे द्विसाप्ताहिक त्याने सुरू केले. तत्त्वज्ञानविषयक, धार्मिक आणि साहित्यिक विषयांवरील आपले विचार निबंधरूपाने तो प्रसिद्ध करू लागला. अशा गंभीर स्वरूपांच्या पत्रिकेचे 'Rambler'(भटक्या) हे नाव बॉस्वेलला खटकले. इटालियन भाषेत त्याचे झालेले 'Il Vagabondo' हे नाव त्याला फार हास्यास्पद वाटले. शब्दकोशाच्या कामाचा लकडा मागे असतानाही दर आठवड्याला 'रॅम्बलर' दोनदा जवळजवळ एकहाती लिहिले जाई. घाईगर्दीने केलेल्या या लिखाणावर पुन्हा हात फिरविण्याची संधीही मिळत नसे. पण जॉन्सनचे विविध विषयांचे ज्ञान सखोल होते आणि भाषेवरील प्रभुत्व वादातीत होते. पहिल्या काही अंकांत लेखकाचे नाव गुलदस्तात होते. पण हे जॉन्सनचे लिखाण आहे, हे त्याच्या मित्रांना लगेच उमगले. 'ऑक्सफर्ड अँड केंब्रिज मंथली मिसेलिनी' हे प्रतिष्ठित मासिक या लिखाणाने इतके भारावून गेले की, 'रोमन सम्राट

---

१२. नाटकाच्या तीन प्रयोगांचा नफा लेखकाला देण्याची तेव्हा प्रथा होती.

ऑगस्टस याच्या कारकीर्दीत जर प्रस्तुत लेखक असता, तर त्याच्या गुणांची केवढी कदर झाली असती. राजेसाहेब दुसरे जॉर्ज यांच्या कारकीर्दीत इंग्लंडमध्ये या लेखकाची उपेक्षा होऊ नये,' अशी या मासिकाने भलावण केली. पण ती वाया गेली. कारण बॉस्वेलच्या मते कोठे ऑगस्टस आणि कोठे दुसरे जॉर्ज ! विद्वत्तेचे आणि प्रतिभेचे त्यांना वावडे होते.

जॉन्सनच्या शैलीची बॉस्वेल ॲडिसन या निबंधकाराच्या शैलीशी तुलना करतो. जॉन्सनची भाषा अधिक लॅटिनमय, प्रौढ, वाक्ये पल्लेदार, काहीशी लयबद्ध रांगडी, तर ॲडिसन प्रसन्न खेळकर, लहान, मुलायम वाक्यांत आपला आशय व्यक्त करतो. एखाद्या मित्राने केलेल्या गुजगोष्टी म्हणजे ॲडिसनचा निबंध, तर व्यासपीठावरून एखाद्या तत्त्ववेत्त्याने केलेले प्रवचन म्हणजे जॉन्सनचे लेखन. बॉस्वेल गमतीने लिहितो, 'सॉक्रेटीस गहन तात्त्विक विचार अगदी घरगुती दाखल्यांनी सुलभ करून मांडतो, तर जॉन्सन साधा विचार तत्त्वज्ञानासारखा गहन करून सोडतो."

१७५२ साली जॉन्सनची पत्नी एलिझाबेथ (टेटी) मरण पावली. प्रेम आंधळे असते, हेच खरे. गॅरिकच्या आठवणीनुसार 'त्याची पत्नी वास्तविक ओबडधोबड, सुटलेल्या अंगाची, उधळी होती. स्वभावाने तापट, स्वच्छतेचे स्तोम इतके पराकोटीचे की जॉन्सनलासुद्धा तिने कचरा म्हणून घराबाहेर लोटून दिले असते.' पण जॉन्सनला ती भारी आकर्षक वाटे. तिच्या बुद्धिमत्तेबद्दल त्याला किंचितही शंका नव्हती. त्याच्या लेखनाची तिने एकदा स्तुती केली, तेव्हा त्याला धन्य धन्य वाटले. या पत्नीचा विसर त्याला जन्मभर पडला नाही.

'रॅम्बलर'मधील जॉन्सनचे लेख वाचून ऑक्सफर्ड विद्यापीठात त्या वेळी शिकत असलेले दोन विद्यार्थी बेनेट लँग्टन आणि टोफम ब्यूक्लर्क जॉन्सनला भेटण्यासाठी लंडनला आले. दोघेही मोठ्या मातब्बर, सुखवस्तू कुटुंबांतील होते. जॉन्सनच्या मनात खानदानी कुटुंबांबद्दल फार प्रेमादर नांदत असे. लँग्टन अतिशय सुस्वभावी, सद्प्रवृत्त. याच्या उलट ब्यूक्लर्क भारी आकर्षक व्यक्तिमत्त्वाचा, आदब सांभाळणारा, बोलण्यात चतुर आणि आचारात स्वच्छंदी. जॉन्सनचे दोघांशीही अखंड मैत्रीचे संबंध जुळले.

१७५४ साली शब्दकोशांचे काम संपत आले. लॉर्ड चेस्टरफील्ड आता मात्र एखाद्या कावेबाज राजकारणी पुरुषासारखे वागले. ज्या शब्दकोशाच्या कामाकडे आजवर त्यांनी ढुंकूनही पाहिले नव्हते, त्याचे महत्त्व त्यांना एकदम पटले. 'दि वर्ल्ड' या मासिकपत्रिकेत या कोशाची प्रशस्ती करणारे दोन लेख त्यांनी लिहिले. लेख तसे सुरेख होते. जॉन्सनच्या आगामी शब्दकोशाबद्दल लिहिताना, 'इंग्लंडच्या जागतिक व्यापारामुळे साऱ्या जगाशी संबंध आल्यामुळे इंग्रजी भाषेने दुसऱ्या अनेक भाषांकडून शब्दसंपत्ती उसनी घेतली आहे. पण या अनावश्यक दागिन्यांच्या ओझ्याखाली आमची भाषासुंदरी गुदमरून जाऊ नये.

काय योग्य आणि काय अयोग्य हे निवडण्याची वेळ आता आली आहे. भाषेच्या प्रान्तात सध्या अनागोंदी माजली आहे. तिची घडी नीट बसविली पाहिजे. राजकीय बेबंदशाही माजली की जुन्या काळी रोमन लोक एका व्यक्तीची हुकूमशहा म्हणून निवड करीत आणि त्याच्या आज्ञा सारे शिरसावंद्य मानीत. जॉन्सन यांना भाषेच्या प्रान्तात हुकूमशहा म्हणून निवडून मी माझे सारे भाषाविषयक अधिकार त्यांना बहाल करणार आहे. ब्रिटिश नागरिक म्हणून स्वातंत्र्याची महती मी नाकारीत नाही. पण जॉन्सनच्या या हुकूमशाहीपुढे मी आनंदाने मान तुकवीन. जुने रोमन लोक अशा प्रसंगी असेच वागले असते. मी पडलो आधुनिक रोमन, म्हणून जॉन्सन यांना मी अगदी 'पोप' इतका मान देतो, ही आणि अशा प्रकारची भलावण या लेखात होती. वास्तविक जॉन्सनला स्तुती फार प्रिय होती. थोरामोठ्यांनी स्तुती केली म्हणजे त्याला अस्मान ठेंगणे होई. नसते श्रेय उपटू पाहण्याच्या या ढोंगीपणाची मात्र त्याला चीड आली. जॉन्सनने यानिमित्त लॉर्ड चेस्टरफील्ड यांना लिहिलेले पत्र प्रख्यात आहे:

'महाशय, वर्ल्ड मासिकाच्या प्रकाशकाकडून आपण माझ्या शब्दकोशाच्या पुरस्कारादाखल लिहिलेल्या लेखांची माहिती समजली. थोरामोठ्यांकडून अशा अनुग्रहाची मला सवय नाही. त्यामुळे आपल्या लेखांची कशी दखल घ्यावी हेच मला समजत नाही.

सात वर्षांपूर्वी तुमच्या कृपाकटाक्षासाठी मी तुमच्या दिवाणखान्यावाहेर ताटकळत उभा होतो. पण तुमचे दरवाजे मला बंद होते. गेली सात वर्षे हाडाची काडे करून हे कोशकार्य आता तडीला नेले आहे. या काळात मला ना कोणी साहाय्य केले, ना कोणी एका शब्दाने उत्तेजन दिले, की ना कोणी साधे स्मित हास्य करून माझी दखल घेतली. आश्रयदाते हे असे असतात, हे मला माहीत नव्हते.

एखादा जीवाच्या आकान्ताने खोल पाण्यातून वाचण्यासाठी धडपडत असता आश्रयदाता डोळ्यावर कातडे ओढून काठावर उभा राहतो आणि तो बुडणारा मोठ्या मुष्किलीने काठावर आल्यावर मदतीसाठी धावून जातो, हा मोठा अजब प्रकार आहे. महाशय, आपले लेख लिहिण्यास फार उशीर झाला आहे. माझ्या कर्तबगारीने मी जे साधले आहे, ते केवळ आश्रयदात्यांच्या सदिच्छेमुळे होय, असले असत्य विधान मी करणार नाही.'

१७५५ साली शब्दकोश अखेर प्रकाशित झाला.[१३] त्याच्या आधी थोडेच दिवस ऑक्सफर्ड विद्यापीठाने जॉन्सनला एम.ए. चे प्रशस्तिपत्रक बहाल केले होते. शब्दकोशाचा कर्ता जॉन्सन अशा रीतीने पदवीधर झाला. तीन वर्षांत पुरे होणारे हे कार्य नव्हतेच. जॉन्सनला तब्बल सात वर्षे परिश्रम करावे लागले.

---

१३. १५ एप्रिल १७५५. किंमत दोन्ही भागांची मिळून ४ पौंड १० शि. मुद्रक स्ट्रॅहॅन, प्रकाशक डोडस्ली आणि इतर पाच.

प्रत्येक शब्दाला प्रतिशब्द पुरवणे हे तसे सोपे काम नव्हते. विशेषतः सोप्या शब्दाला अधिक सोपा शब्द आणायचा कोठून? तांत्रिक शब्दांच्या व्याख्या करण्याचे जॉन्सनचे कौशल्य वादातीत होते. अनेक शब्दांचा साहित्यकृतीत मोठ्या लेखकांनी केलेला उपयोग उद्धृत करताना जॉन्सनचे अफाट वाचन उपयोगी पडले. या कामी रॉबर्ट बेकनचे सारे निबंध त्याला फार मोलाचे वाटले. 'एकट्या बेकनच्या मदतीने सारा शब्दकोश पुरा करता येईल,' अशी त्याला खात्री वाटे.

प्रास्ताविकात एवढ्या प्रचंड कामात काही चुका राहणे शक्य आहे, अशी प्रांजळ कबुली त्याने दिली होती. काही शब्दांचे अर्थ त्या समर्थ भाषापंडिताने चुकीचे दिले होते. Windward आणि Leeward हे वास्तविक परस्परविरोधी अर्थाचे शब्द. पण जॉन्सनने दोन्ही शब्दांचा अर्थ एकच towards the wind (वाऱ्याच्या दिशेचा) असा दिला होता. Pastern या शब्दाचा असाच घोटाळा झाला होता. जॉन्सनने त्याचा अर्थ knee of a horse (घोड्याचा गुडघा) असा केला होता. वास्तविक खुराच्या थोडी वरच्या अंगाची जागा. एका चाणाक्ष स्त्रीने एकदा जॉन्सनला या अर्थाबद्दल डिवचले, तेव्हा 'बाईसाहेब, शुद्ध अज्ञानापोटी मी तसा अर्थ केला (ignorance, madam, pure ignorance), असे त्याने उत्तर दिल्याची बॉस्वेल नोंद करतो. सोप्या शब्दाचा अर्थ काही वेळा फार जडजंबाळ होतो. Network (जाळीदार) शब्दाचे उदाहरण बॉस्वेलने दिले आहे:- anything reticulated or decursated of equal distance with interstices between intersections.

जॉन्सनचे पूर्वग्रह आणि आवडीनिवडी फार तीव्र असत. त्याची मते फार आग्रही होती. या कोशात त्याचे प्रतिबिंब पडते. टोरी पक्षाची राजकीय मतप्रणाली त्याला फार प्रिय होती. कोशात टोरींना दिलेले प्रशस्तिपत्र पहा. मूळ टोरी शब्द आयरिश शब्दातून उद्‌भवला. त्याचा अर्थ रानगट असा होता. जॉन्सन हे नमूद करतो आणि पुढे 'इंग्लंडची राज्यघटना मानणारा, चर्च ऑफ इंग्लंडशी एकनिष्ठ राहणारा म्हणजे टोरी', अशी व्याख्या करतो. याच्या उलट टोरी पक्षाचा विरोधक विग (whig) याचा मात्र 'एक पक्षविशेष' एवढाच अर्थ देतो. राजेसाहेबाकडून जरी जॉन्सनला पुढे तहहयात निवृत्तिवेतन (पेन्शन) लाभले आणि त्याने ते आनंदाने स्वीकारले, तरी कोशात मात्र पेन्शन शब्दाचा अर्थ देऊन झाल्यावर 'इंग्लंडमध्ये मात्र देशद्रोही व्यक्तींना सरकारी रीतीने चारलेला मलिदा' अशी पुस्ती जोडली आहे. पेन्शनर शब्दाचा अर्थ 'शासनाने मिंधा करून ठेवलेला गुलाम' ठरतो. ओट हे धान्य इंग्लंडमध्ये भरड कदन्न मानले जाई. कोशात ओटचा अर्थ- एक धान्यविशेष. इंग्लंडमध्ये घोड्यांना चारतात. स्कॉटलंडमध्ये मात्र लोकही ओटवर उदरनिर्वाह करतात, असा विस्ताराने दिला आहे. वस्तुमात्रावरील उत्पादक शुल्क- एक्साइज या कोशात 'कोणतेही न्यायसंगत निकष

न लावता सरकारने नेमलेल्या क्षुद्र मनाच्या नोकरशाहीने मन मानेल तसा लादलेला एक तिरस्करणीय कर ठरतो. खुद्द शब्दकोशकार Lexicographer म्हणजे कोशकर्ता- रूक्ष, काबाडकष्ट करणारा निरुपद्रवी जीव- a harmless drudge. शब्दकोशाने जॉन्सनची कीर्ती उदंड झाली. Dictionary Johnson हे त्याचे नावच झाले. गॅरिकने एक गमतीची कविता लिहिली:

And Johnson well armed like a hero of yore
Has beat forty French and will beat forty more.

आर्थिक दृष्ट्या शब्दकोश फारसा लाभदायक ठरला नाही. प्रकाशकांनी सारा १५७५ पौंडांचा मोबदला आधीच चुकता केला होता. काम सात वर्षे लांबले आणि लेखन साहित्य, सहाय्यकांचा मोबदला इत्यादी सारा खर्च अंगावर पडला. ओढाताणीची परिस्थिती कायम होती. मासिक पत्रिकांत विविध विषयांवर लेखन चालू होते. पुस्तक परीक्षणे, प्रस्तावना, विविध साहित्यिक, तत्त्वज्ञानविषयक, ऐतिहासिक, शास्त्रीय विषयांवर निबंध, फार काय, पत्त्यांच्या खेळावर त्याने या काळात लेखन केले आहे. धीमतां अविषयो नास्ति हेच खरे, पण ही सारी लेखनकामाठीगिरी उदरनिर्वाहासाठी होती. त्या काळचे कर्जविषयक कायदे मोठे कठोर होते. बारीकसारीक कर्जफेड झाली नाही, तर तुरुंगवास घडत असे. पाच पौंड अठरा शिलिंगचे असे कर्ज झाल्यामुळे जॉन्सनने स्विर्डसन या आपल्या मित्राकडे सहा गिनींची याचना केल्याचे १७५६ मधील पत्र बॉस्वेलने या चरित्रग्रंथात छापले आहे. जॉन्सनचे या काळातील बहुतेक स्फुटलेखन लिटररी मॅगेझिन या पत्रिकेत छापले गेले. जॉन्सनची मतप्रणाली काही वेळा लोकविलक्षण असे. रोमन साम्राज्याच्या उत्कर्षापकर्षांवर बरीच चर्चा त्या दिवसांत चालू होती. जॉन्सनच्या मते 'रोमन साम्राज्याबद्दल हे एवढा गळा काढून का रडतात, हेच मला समजत नाही. वास्तविक साऱ्या मानवजातीला लुबाडून रोमची भरभराट झाली. इतर साम्राज्यांप्रमाणे ऐश्वर्याने रोमन लोक भ्रष्ट बनले. समाज म्हणून आपले सारे स्वातंत्र्य विकून टाकायला त्यांनी कमी केले नाही. रोमन लोक कंगाल होते तेव्हा साऱ्या जगाला लुटीत सुटले. ते संपन्न झाले आणि एकमेकांच्या उरावर बसू लागले.' जोनास हॅनवे या लेखकाने इंग्लंडमध्ये तेव्हा लोकप्रिय होऊ पाहणाऱ्या चहा या पेयावर कडाडून हल्ला चढविला तेव्हा जॉन्सन चहाच्या मदतीला धावून गेला. त्याने लिहिले, 'मी स्वतः अगदी निगरगट्ट चहाबाज आहे. चहाचे पाणी माझ्या घरी सतत उकळत असते. संध्याकाळी चहा हा माझा विरंगुळा असतो. अगदी मध्यरात्रीही चहामुळे मी विसावतो. सकाळचे स्वागत मी चहाशिवाय दुसऱ्या कशाने करणार?' एवढ्या चहाने जॉन्सनच्या प्रकृतीला कसलाही अपाय झाला नाही, हे बॉस्वेलने नमूद केले आहे.

१७५८ साली वीकली गॅझेट या साप्ताहिकाच्या मदतीने त्याने 'आयडलर' नावाचे

नियतकालिक सुरू केले. रॅम्ब्लरपेक्षा या नियतकालिकातील त्याचे निबंध अधिक चुरचुरीत होते. लिखाण बहुतेक वेळा घाईगर्दीने केले जाई. डाक रवाना होण्याच्या केवळ अर्धा तास आधी. एकदा दुसऱ्या दिवसाच्या 'आयडलर'साठी त्याने निबंध लिहावयास घेतला आणि तो झपाट्याने पुरा करून ऑक्सफर्डहून लंडनला डाकेने पाठविला, अशी आठवण ऑक्सफर्डला त्या काळी शिकणाऱ्या बेनेट लँग्टनने बॉस्वेलला सांगितली आहे.

इंग्रजी कवींची चरित्रे (Lives of Poets) चे लिखाण रेंगाळत चालले होते. प्रापंचिक विवंचना काही मिटत नव्हती. १७५९ साली जॉन्सनची वृद्ध आई लिचफील्ड गावी मरण पावली. तिच्या अंत्यसंस्काराचा खर्च आणि इतर देणी भागविण्यास पुरेसे पैसे नव्हते. 'रासेलस– अबिसीनियाचा राजपुत्र' ही तत्त्वज्ञानी राजपुरुषावरील कादंबरी या विवंचनेपोटी त्याने एका आठवड्यात लिहिली. पौर्वात्य ढंगामुळे आणि तात्त्विक बैठकीमुळे ही कादंबरी फार लोकप्रिय झाली.[१४] प्रकाशक स्ट्रॅहॅन यांनी या कादंबरीचे हक्क १५० पौंडांना विकत घेतले. दुसऱ्या आवृत्तीपोटी आणखी २५ पौंड लेखकाला देण्यात आले.

इंग्लंडच्या गादीवर १७६० साली आलेले राजे तिसरे जॉर्ज इतरांहून वेगळे होते. त्यांचे सारे शिक्षण इंग्लंडमध्ये झाले होते. हॅनोव्हर राजवंश परका भासू नये. राजघराणे लोकप्रिय व्हावे, विद्वानांची कदर व्हावी असे त्यांना मनापासून वाटत होते. १७६२ साली वेडरबर्न, शेरिडन इत्यादी मित्रांच्या आग्रहावरून पंतप्रधान लॉर्ड ब्यूट यांनी वार्षिक ३०० पौंडांची पेन्शन राजेसाहेबांच्या संमतीने जॉन्सनसाठी मंजूर केली.

राजघराण्याचा हा देकार कोणतीही अट न घालता केवळ जॉन्सनची वाङ्मयीन कामगिरी लक्षात घेऊन देऊ केला होता. पंतप्रधानांनी तशी ग्वाही प्रत्यक्ष भेटीत दिली होती. पण शब्दकोशातील पेन्शनरची व्याख्या जॉन्सनच करून बसला होता. (बॉस्वेलच्या अंदाजाप्रमाणे ही व्याख्या पोपच्या एका कवितेतून उद्भवली असावी) अखेर चित्रकार जोशूआ रेनॉल्ड, थॉमस शेरिडन इत्यादी मित्रांच्या सल्ल्याने पेन्शन स्वीकारावी असे ठरले.

वास्तविक पेन्शनच्या वृत्ताने जॉन्सन अगदी हरखून गेला होता. पंतप्रधानांना त्याने पाठविलेले आभाराचे पत्र पुरेसे बोलके आहे. राजेसाहेबांचे या उमद्या दातृत्वाबद्दल आभार मानल्यावर जॉन्सन लिहितो, 'वास्तविक मी कोणाचा सगासोयरा नाही, राजकारणात माझा तसा काही हातभार नाही. लघळपणे लाचारी करणे मला जमण्यासारखे नाही. तरीही कोणतीही अट न घालता, मला याचना करावयास न लावता हे निवृत्तिवेतन देऊन आपण मनाचा जो मोठेपणा दाखविला आहे, तो आपणास खचितच शोभादायक आहे. इतक्या उमदेपणाने दिलेला हा सत्कार मी आनंदाने स्वीकारतो. तुमचा हा देकार अयोग्य व्यक्तीस

---

१४. जवळजवळ सर्व युरोपियन भाषांत या कादंबरीचे भाषान्तर झाले. मराठीतील भाषान्तर कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनी केले आहे.

देण्यात आलेला नाही, याचा प्रत्यय आपल्याला येईल, इतकेच आश्वासन मी परतफेडीच्या रूपाने देऊ शकतो.'

या पेन्शनमुळे प्रथमच सॅम्युअल जॉन्सनला जीवनात स्वास्थ्य लाभले. १७६३ साली डेव्हिस या पुस्तक विक्रेत्याकडे जेम्स बॉस्वेलची जॉन्सनशी प्रथम भेट झाली, त्या वेळी जॉन्सन हा असा ख्यातनाम लॅटिन भाषापंडित, कवी, टीकाकार, निबंधकार, नाटकांचा जाणकार, शब्दकोशांचा कर्ता, लोकमान्य आणि राजमान्य भाषाप्रभू होता. ही भेट घडण्यापूर्वी थॉमस शेरिडनची एडिंबरामध्ये इंग्रजी भाषा आणि वक्तृत्व या विषयावर जी व्याख्याने झाली त्यांना बॉस्वेल श्रोता म्हणून उपस्थित होता. व्याख्यानात अनेक वेळा जॉन्सनचा, त्याच्या असामान्य विद्वत्तेचा, वाक्पटुत्वाचा आणि त्याच्याशी असलेल्या आपल्या स्नेहाचा वक्त्याने मोठ्या अभिमानाने उल्लेख केला. शेरिडन यांच्या मध्यस्थीने लंडनला गेल्यावर सॅम्युअल जॉन्सनचा परिचय करून घ्यावा, असा बॉस्वेलचा विचार होता. पण तसा योग नव्हता.[१५] डेव्हिस यत्र्यापैकी नट होता. पण उदरनिर्वाहासाठी तो पुस्तक विक्रेत्याचा धंदा करीत असे. डेव्हिडची पत्नी असामान्य रूपवती मानली जाई. त्याची राहणी छानछोकीची होती. मनाने तो उमदा आणि सुसंस्कृत होता. उभयता पतिपत्नी पाहुणचाराला मोठे तत्पर होते. डेव्हिसची घरी जॉन्सन अनेक वेळा येत असे. जॉन्सनच्या बोलण्याचालण्याची, वागण्याची डेव्हिस हुबेहूब नक्कल करीत असे. त्याची लोकविलक्षण मते, अनेक विषयांवरील त्यांचे विचार तो वारंवार उद्धृत करीत असे. १६ मे १७६३ रोजी बॉस्वेल असाच डेव्हिसकडे बसला असताना दुरून जॉन्सन येत असल्याचे पाहून हॅम्लेट नाटकात हॅम्लेटच्या बापाचे भूत येताना पाहून हॅम्लेटचा मित्र होरॅशिओ उच्चारतो ते वाक्य "Look my lord, it comes!" डेव्हिसने साभिनय उच्चारले.

जॉन्सनच्या मनात स्कॉटलंडबद्दल आणि स्कॉच माणसांबद्दल विलक्षण तुच्छता होती. पण बॉस्वेलला नाइलाजाने आपण स्कॉच असल्याचे सांगावे लागले. I do indeed come from Scotland but I cannot help it! कोटिबाज जॉन्सनने याचा अर्थ 'मी स्कॉटलंड सोडून पळून आलो आहे,' असा घेतला आणि 'महाशय, बहुतेक साऱ्या स्कॉच लोकांना असेच पळून यावे लागते नाही का' असा प्रतिप्रश्न केला.

या पहिल्या भेटीत बॉस्वेल मुख्यत्वे श्रोता होता. विविध व्यक्तींवरील रागद्वेष, जॉन्सन ठाशीवपणे मांडीत होता. या संवादाची नोंद बॉस्वेलने केली आहे. थोरामोठ्यांच्या

१५. थॉमस शेरिडन पेशाने नट होता. त्यालाही या सुमारास सरकारी पेन्शन मिळाली. एखाद्या नटाला आपल्यासारखीच पेन्शन मिळावी, याचे जॉन्सनला वैषम्य वाटले. 'यालाही पेन्शन मिळाली तर! मग माझी पेन्शन मी परत केली पाहिजे,' असे उद्गार त्याने काढले. शेरिडनच्या मनात जॉन्सनबद्दल यामुळे मोठी कटुता निर्माण झाली.

जवळपास वावरण्याची बॉस्वेलला हौस होती आणि का कोणास ठाऊक, अगदी पहिल्या भेटीपासून जॉन्सनने बॉस्वेलला आपला मानले. बॉस्वेल जेव्हा जॉन्सनच्या घरी प्रथम गेला, तेव्हा त्याला जॉन्सनचा एकंदर कारभार गबाळंग्रंथी वाटला. त्याचे मळकट ओघळणारे कपडे, पायांत कसे तरी सरकवलेले बूट, केसांचा टोप [१६] या साऱ्यांचे वर्णन बॉस्वेलने केले आहे. पण हे प्रथमदर्शनीचे मत जॉन्सनने बोलण्यासाठी तोंड उघडेपर्यंत टिके. जॉन्सनची बोलण्याची धाटणी फार स्वच्छ, आवाज घनगंभीर. वाक्यांत योग्य शब्दांवर आघात देऊन योग्य जागी वाक्य तोडून तो मोठ्या अर्थपूर्ण रीतीने थांबत असे.

प्रतिपक्षाच्या नजरेस नजर न भिडविता, थोडे जमिनीकडे पाहत तो बोले. हातवारे जरुरीपेक्षा जास्त, थोडे विचित्र. जॉन्सनसारखे बोलण्याचा अनेकजण प्रयत्न करीत, पण जॉन्सन तो जॉन्सनच. स्वरबद्ध संगीत जसे नोटेशन द्वारे लिहून ठेवता येते, तसे जॉन्सनचे संभाषण लिहून ठेवता येत नाही, याची बॉस्वेलला खंत वाटते. प्रत्येक भेटीत संभाषणाचा ओघ विविध विषयांकडे वळे. बॉस्वेलची स्मरणशक्ती तीव्र होती. घरी गेल्यावर तो सवडीने आपली दैनंदिनी लिही. त्यात ती संभाषणे शक्यतो शब्दशः लिहिली जात.

संध्याकाळी घराबाहेर पडून जॉन्सन मध्यरात्रीपर्यंत भटकत राही. रात्रीचे जेवंण तो पुष्कळदा 'मीत्रे' नामक भोजनालयात घेई. त्याच मित्रपरिवार दांडगा होता. अनेक मित्रांच्या घरी आणि चाहत्यांकडून त्याला भोजनाचे आमंत्रण येई. काही वेळा बॉस्वेलही निमंत्रितांत असे. भोजनाच्या वेळी जॉन्सनची कळी विशेष खुले. अन्नावर तो अधाशासारखा तुटून पडे. तोंडाने आवाज करीत तो जेवत असे, त्या वेळी त्याच्या कपाळावरील शीर उभी राही. भोजनापूर्वी प्रार्थना करण्याचा त्याचा रिवाज होता.

(उत्तरार्ध पुढील अंकात)

(१०, सुनीता सोसायटी, १९/२, एरंडवणे, पुणे ४११ ००४)

१६. केसांचा टोप वापरणे ही त्या काळी सर्वमान्य प्रथा होती. एका स्कॉच धर्मोपदेशकाचे वर्णन करताना an elderly man with his own black hair स्वतःचे काळे केस (टोप नव्हे), असा उल्लेख बॉस्वेल करतो.

डॉ. अ. रा. यार्दी

# द. रा. बेन्द्रे यांची मराठी कविता

बेन्द्र्यांच्या मृत्यूनंतर तब्बल १० वर्षांनी म्हणजे २६ ऑक्टोबर १९९१ रोजी त्यांच्या अप्रकाशित मराठी कवितांचा संग्रह 'उमाळा' प्रकाशित झाला. बेन्द्रे हे कन्नड कवी म्हणून सर्वपरिचित आहेत. ते मराठी मातृभाषी होते आणि तरीही त्यांनी कन्नड भाषेचे 'कविवर्य' हे बिरुद मिळवले. कन्नड काव्यविश्वात एक पर्व निर्माण केले. त्यांचं मराठीवरलं प्रेम जुन्या पिढीतील रसिकांच्या चांगल्या परिचयाचं असेल. यापूर्वी त्यांनी मराठीत स्वतंत्र आणि अनुवादित लेखन केलं आहे. 'संवाद' हा त्यांच्या मराठी कवितांचा आणि लेखांचा संग्रह संदर्भदृष्ट्या महत्त्वाचा ठरतो. याव्यतिरिक्त के.व्ही.अय्यर यांच्या कन्नड कादंबरीचा 'शांतला' अनुवाद गाजला. खणखणीत आवाजाच्या आणि ठणठणीत प्रकृतीच्या बेन्द्र्यांनी आपल्या आयुष्यभर कन्नड आणि मराठी या दोन्ही भाषांवर तेवढंच प्रेम केलं. ते कन्नड भूमीवर आले, तिथं राहिले असले तरी, त्यांनी मराठी भाषा ही आपल्या श्वासाचाच एक भाग मानली होती. त्यांच्या रक्तगत असलेल्या या भाषेकडं त्यांनी दुर्लक्ष केलं असतं, तरच नवल होतं.

'उमाळा' या त्यांच्या अप्रकाशित मराठी कविता संग्रहाच्या वाचनाच्या वेळी एक गोष्ट सतत प्रकर्षानं जाणवत राहिली. ती ही की, कवी हा मनस्वी असावा लागतो. त्याचं जगणं उत्कटतेनं भरलेलं आणि भारलेलं असावं लागतं. जीवनातला आला क्षण, गेला क्षण संपूर्ण अनुभवायचा असतो. कवीची कविता ही केवळ त्याचीच निर्मिती असते. तो त्याच्या तात्कालिन अनुभूतीचा आविष्कार असतो. कविता ही वाचकाला कळलीच पाहिजे, आणि त्यानं लावलेला अर्थच इतरांनी स्वीकारला पाहिजे, असा आग्रह कोणाही सुज्ञ माणसानं धरता कामा नये. कवी हा स्वान्तः सुखाय लिहीत असतो. आपल्या अंतःकरणात उचंबळून येणाऱ्या ऊर्मींना वाट करून द्यावी आणि पुन्हा अंतःसागराला भरती यायला मोकळीक करून द्यावी, म्हणून तो त्या 'ऊर्मीं' ना 'अक्षर' स्वरूप देऊन हातावेगळं करत असतो. तो लिहीत असतो ते जाणतेपणी आणि नेणतेपणी. अजाणतेपणानं मात्र लिहीत नसतो. त्याला येणारे अनुभव हे कित्येकदा आपल्या चिमटीत न सापडणाऱ्या वाऱ्यासारखे असतात. ते तरल असतात. अशाच तरल अनुभवांना सरलतेनं मांडण्याचा निरलस प्रयत्न करणारा बेन्द्र्यांसारखा कवी, त्या अनुभवांना शब्दांचं आणि निःशब्दांचं सौंदर्य लेववण्याचा प्रयत्न

करतो.

एकूण एकशेतेरा कविता या संग्रहात समाविष्ट केल्या आहेत. अलीकडच्या म्हणजे बेन्द्र्यांच्या आयुष्याच्या शेवटच्या उत्तरार्धात बेन्द्रे हे संख्याशास्त्राचा चक्रव्यूह भेदून सहीसलामत परत यायचे. पण कित्येकांना बेन्द्रे हे संख्याशास्त्राच्या चक्रव्यूहातच सापडल्यासारखे वाटत. या अर्थानं बेन्द्रे हे सांख्ययोगाचे उपासक बनले होते. संस्कृत विद्वानांनी सांख्ययोग हा ज्ञानयोगाचाच भाग असल्याचं मानलं आहे. याही अर्थानं बेन्द्रे हे सांख्ययोगी होते. मी त्यांच्या घरी जात असे, तेव्हा मला आठवतं, त्यांनी एक- दोनदा कोणतं तरी मासिक आणून दाखवलं आणि म्हणाले, "मला ऋचा सुचू लागल्या आहेत." ऋग्वेदातील ऋचांच्या तोडीच्या त्या ऋचा असल्याचं त्यांचं म्हणणं होतं. त्यांनी मला एकदा भगवद्‌गीतेतील अठरा अध्यायांबाबत संख्याशास्त्राच्या दृष्टीतून सांगितलं होतं. १८ मध्ये एक + आठ = नऊ आहेत. पती आणि पत्नी यांच्यात नऊ वर्षांचं अंतर असायला हवं, असं बरंच काही सांगितल्याचं पुसट आठवतं. त्यांच्या या सांगण्याकडं माझे कान तेवढे होते. ध्यान मात्र पोचू शकलं नाही, त्यामुळं त्या गोष्टींचं ज्ञान झालं नाही.

बेन्द्रे हे खऱ्या अर्थानं शब्दप्रभू होते. त्यांनी केलेली शब्दांची उकल ही कित्येक वेळा स्तिमित करणारी असे. 'सावित्री' या नावाची त्यांची एक कविता आहे. त्यात या शब्दाची केलेली अर्थघन उकल अजून माझ्या कानांत आणि ध्यानात आहे.

बऱ्याच वेळा वेळा असा आक्षेप घेतला जातो की, जे काव्य अर्थबोधाला अवघड वाटत असतं, जे दुर्बोध असतं, ते श्रेष्ठ ठरवलं जात असतं. पण हा आक्षेप सर्वस्वी स्वीकारार्ह नाही. कारण, सामान्य वाचकाच्या किंवा पढिक विद्वानांच्या दृष्टीनं ते दुर्बोध असू शकतं, पण प्रतिभेचं देणं लाभलेल्या आणि ऋतंभरा प्रज्ञेच्या जवळ पोचलेल्या कविमनाची ती शब्दघनलीला असते. म्हणूनच म्हटलं की, कवितेतला अनुभव हा सर्वस्वी कवीचा व्यक्तिगत अनुभव असतो. तो आत्यंतिक व्यक्तिगत पातळीवर घेतलेला/ आलेला अनुभव असतो.

'उमाळा' मधील एकूण एकशेतेरा कवितांपैकी बेचाळीस कवितांचा रचनाकाल उपलब्ध नाही. उरलेल्या कवितांच्या शेवटी रचनाकाल दिलेला आढळतो. कवीचा बराच काळ पुणे आणि सोलापूर या महाराष्ट्रातील शहरांत गेलेला असल्यानं त्याला महाराष्ट्राबद्दल प्रेम वाटणं सहज शक्य आहे. मराठी कवितेला वेगळ्या वळणावर नेण्यासाठी कारणीभूत ठरलेल्या 'रविकिरण मंडळा' शी बेन्द्र्यांचा संपर्क आलेल्या दिसतो. तसंच तत्कालीन - समकालीन मराठी कवी केशवसुत आणि गोविन्दाग्रज यांचाही प्रभाव त्यांच्यावर पडलेला दिसतो. काही अभ्यासकांनी बेन्द्र्यांच्यावर मराठी कवींचं ऋण असल्याचं नमूद केलं असलं, तरी समकालीनांत राहण्यानं त्यांची कविता सर्वस्वी परभृत ठरत नाही. कवितांमधून व्यक्त

झालेले विचार समान दिसत असले, तरी समान विचारांचे कवी म्हणून प्रत्येक कवीचं स्वतंत्र व्यक्तिमत्त्व तयार झालेलं असतं, या गोष्टीकडं दुर्लक्ष करता येणार नाही.

कवी हा केवळ कविता लिहिण्यापुरता कवी नसतो. तो विचार करणारा, अध्यात्मचिंतन करणारा, वैचारिक आणि संतही असतो. बहुश्रुतता, विद्वत्ता, स्फूर्ती, पांडित्य या सर्व अंगांनी समृद्ध असलेलाच 'कवी' या पदवीला पात्र ठरतो. महाकवीला लागणारी जी प्रतिभा आणि जी विचारांची झेप आवश्यक असते, मनाच्या डोहात शिरण्याची जी ताकद लागते, ती या कवीजवळ निश्चित होती. त्यांच्या जीवनात त्यांना लाभलेला संतांचा सहवास आणि आशीर्वाद, यांमुळं बेन्द्रे हे 'द्रष्टे' झाले असावेत. मुळातच तेजस्वी असलेला हिरा पैलू पाडल्यावर अधिकच तेजस्वी दिसायला हवा.

'उमाळा' या कवितासंग्रहाबद्दल लिहिताना पेच पडतो. तो असा की, 'बिंदूत सिंधू' असल्याची जाणीव होते. पण त्या बिंदूतून सिंधूच्या अंतरात शिरून मौल्यवान वस्तू मिळण्याचं धाडस क्वचितच करवतं. व्यावहारिक अनुभवावर आधारित अशा कविता वाचतानासुद्धा त्यांचा मूळचाच अध्यात्माचा झरा आपल्या अस्तित्वाची जाणीव करून देत असतो. महाराष्ट्राला वंदन करताना त्यांनी महाराष्ट्राला शतकानुशतकं एकत्र बांधून ठेवणाऱ्या महाराष्ट्राच्या चिवट अध्यात्म्याच्या धाग्याची जाणीव सतत बाळगली आहे.

समाजात चाललेल्या दांभिकपणावर कोरडे ओढताना तर, बेन्द्र्यांच्या जाणिवा कडवट होतात आणि करवतीसारखे धारदार व काटेरी शब्द लिहिले जातात :

*'मेलेल्यांच्या तोंडात माती,*
*मेल्याचे श्रेय जिते खाती*
*मेले त्यांची गीते गाती*
*सवंग जिवंत हुतात्मा (इशारा)*

बेन्द्र्यांनी 'उमाळा' या कवितासंग्रहात रचनेचे अनेक प्रकार हाताळून पाहिले आहेत. ज्ञानदेवांनी लोकप्रिय केलेल्या 'ओवी' पासून ते महाराष्ट्रातील अनेक संतांनी रचलेल्या 'कूट' अभंगांपर्यंतचा प्रवास बेन्द्र्यांचं कविमन करत जातं. आजपर्यंत मराठी कवितेला अपरिचित असलेली शब्दखेळी बेन्द्रे लीलया करतात.

वधूची निवड करताना जे प्रकार केले जात असत, त्यांचं वर्णन 'वधूची निवड' या कवितेत त्यांनी केलं आहे. उपरोध आणि विडंबन हे विशेषही बेन्द्र्यांच्या कवितांत अधूनमधून डोकावत असतात.

*"बँक बुकांचा अभिप्रेतार्थ*
*तोच मुख्य, इतर व्यर्थ*
*पाहणे बहाणे, नुसता स्वार्थ" (वधूची निवड)*

या ओळी तत्कालीन आणि आजच्याही वधू निवडीच्या प्रथेवर नेमका प्रकाश टाकतात. सामाजिक जाणिवेनं लिहिलेल्या कवितांमध्ये तत्कालीन दुष्काळ, बंगालची फाळणी, गरिबी इत्यादी गोष्टींमुळं त्रस्त झालेल्या जनतेचं चित्र उमटलं आहे.

*'शेत आहे, पाणी आहे*
*बी आहे बाबा।*
*प्राण आहे, भूक आहे*
*डोके नाही ताबा' (ठिणग्या)*

या ओळींमधून आपल्या देशात सर्व संपत्ती भरपूर प्रमाणात असून सुद्धा परकीयांच्या आक्रमणामुळं आपलं स्वत्त्व हरवून बसलेल्या रयतेची दैन्यावस्था दिसते.

केशवसुतांनी त्या काळात कवींबद्दल आणि कवितेबद्दल बऱ्याच कविता लिहिल्या. कवी आणि कविता या दोघांनाही समाजात प्रतिष्ठा मिळवून दिली. त्याच प्रकारचा पण त्याहून अधिक सखोल आणि गंभीर असा विचार बेन्द्र्यांनी आपल्या कवितेतून मांडला. 'कवन' या कवितेत कविमनाला निसर्गाचा सहवास पूरक ठरत असल्याचं सांगितलंच; पण कविता आणि कवीचं मन ही एवढी एकजीव झाली पाहिजेत, की

*आतड्याशी बोलते*
*सुप्त सुमनी गुंगते (कवन)*

असं झालं पाहिजे.

'उगवे दिन' मधली कवींची संवेदनशीलता तर कमालीच्या तरलतेनं व्यक्त होते.

*'वन अपार, स्वर हजार*
*एकैकही मधुर फार' (उगवे दिन)*

दिवस उगवतो, पण त्या दिवसाच्या उगवण्याबरोबरच इतर गोष्टीही येत असतात. त्यांकडंही लक्ष द्यायला हवं. 'कल्पना' नावाची कविता कल्पनेच्या जटिल स्वरूपाची उकल करण्यासाठीच लिहिली असावी.

नादमयता ही कवितेची प्राणसखी असते, असं मानणाऱ्या कवींमध्ये बेन्द्रेही होते. स्वप्नातीत नादाचा साक्षात्कार कवीला झाला की, तो शब्दात मांडला जात नसला, तरी कवी तसा प्रयत्न करणारच. शुद्ध भावगीत कशाला म्हणायचं, हे सांगताना कवी म्हणतो,

*'साद साद घुसळताचि नाद-लोणि येत।*
*हर्षवीन हर्ष होत अपारेंच प्रीत।*
*नसे अर्थ, नहि स्वार्थ, शुद्ध भावगीत' (कल्पना)*

बेन्द्र्यांच्या काही कवितांमधून ते शब्दांशी खेळ खेळण्यात मग्न असल्यानं त्यांचं इतरत्र लक्षच नसावं, असं वाटायला लागतं. पण तसं नसतं, हे 'अर्थात' या कवितेवरून लक्षात येतं.

रचनेचा एक नवा प्रयोग म्हणून 'कुहू' या कवितेकडं बघताना शब्द, अर्थ,भाव यांविषयीचं चिंतन करणारी कविता म्हणूनही ही कविता महत्त्वपूर्ण ठरते. या कवितेचा शेवट पहा,

*'जिवाचा घेतला घोट ।*
*झाला त्याचा उरी स्फोट ।*
*ब्रह्मांड कटाहाचा तट ।*
*फुटेला स्फुट' (कुहू)*

'असे नसेचा विरोध साचा' या कवितेत भास, आभास, अस्तित्व, साक्षात्कार इत्यादी गोष्टींचा काव्यात्म तपशील दिसतो.

*'समानतेच्या पलीकडे बघ*
*विमान उडले विशेष हे*
*प्रत्यक्षाचे प्रमाण उरले*
*निरूपम झाले अशेष हे,'*

'शांति आणि शक्ति' ही कविता वाचत असताना कवी हा आमच्या- तुमच्यातलाच आहे,त्याचे पाय या जमिनीवरच आहेत,याची जाणीव होते.

*'गोमटेशास अभिषेक झाला,*
*आणि तिकडे स्टॅलिन मेला'*
*'त्याचे नाव सायंटिस्ट,*
*त्याचे ज्ञान विषयनिष्ठ'*

या ओळी करंदीकरांच्या विज्ञानविषयक दृष्टीची आठवण करून देतात. 'कोण म्हणतो' या कवितेत कवी म्हणतो,

*'सव् ध्येयाची झाली माती*
*शस्त्रे आली सर्वां हाती*
*शस्त्रांचीही दृष्टी कोती'*
*उफाळली डिक्टेटर भक्ती*
*'करो और मरो' एकच बोला,*
*सब्कॉन्शस्च्या मनात डोला*
*भम् भम् भोला ! भम् भम् भोला'*

मर्ढेकरांची जीवनाकडं पाहण्याची जी दृष्टी होती, तशाच प्रकाची दृष्टी याही कवीची आहे. ही जीवनदृष्टी व्यक्त करण्यासाठी यापेक्षा वेगळी शैली नसावीच, एवढं रचनासाम्य या दोघांच्यात जाणवतं.

श्लीलता आणि अश्लीलता याबद्दलच्या विचारांची रणधुमाळी माजली होती, त्या

वेळी लिहिली गेलेली कविता 'श्लीलता' ही असावी. या कवितेत कवीनं जगाकडं पाहण्याचा दृष्टिकोन कसा स्वच्छ हवा, हे सांगायचा प्रयत्न केला आहे:

*'चमकते अन् लोपते पण,*
*धमक आहे त्यामधे*
*यमक हे क्षर अक्षराचे*
*गमकही साधे सुधे' (श्लीलता)*

चमक, धमक, यमक, गमक हे नादानुकारी शब्द वापरून कवीनं आपल्या शब्दसामर्थ्याची झलक दाखवली आहे. आध्यात्मिक पातळी आणि आधिभौतिक पातळी यांच्यातल्या सीमारेषा केव्हा पुसल्या जातात, हेच कळत नाही. एखादा मंत्र जपता जपता मनोलय व्हावा, तसं बेन्द्रयांच्या कविता वाचताना होतं.

त्यांच्या कविता वाचताना कधीकधी असं वाटतं की, चिंतनशीलता कशी व्यक्त करायची, हा प्रश्न त्यांच्यासमोर असावा. जे सांगायचं आहे, त्यासाठी कोणता काव्यप्रकार वापरावा, असाही प्रश्न त्यांना पडत असावा. चिन्तनाच्या मन्थनातून निघालेलं हे नवनीत मांडणं, एवढाच त्यांचा हेतू असावा, असं 'गगनात घरटे येते' ही कविता वाचल्यावर वाटू लागते.

*'गगन पालथे घातले,*
*हृदयगीत वर ओतले.'*

अवघड शब्दकळेच्या कविता त्यांनी लिहिल्या, तशा हलक्याफुलक्या कविताही लिहिल्या. 'खटारा' ही कविता त्या दृष्टीनं वाचण्यासारखी आहे. 'गाजराची पुंगी' कवितेत विडंबन, उपहास दिसतो.

*'साहित्याचा केला चिवडा*
*समालोचक बोलघेवडा'*
*शिळ्या कढीला फार ऊत*
*त्यात उकळते कोणाचे भूत' (गाजराची पुंगी)*

या कवितेत समालोचक, समीक्षक म्हणणाऱ्यांची चांगलीच हजेरी घेतली आहे. साहित्य हा पोटापाण्याचा धंदा करणाऱ्यांना या कवितेत चांगलीच चपराक दिली आहे. 'साहित्य गाजराची पुंगी' ही ओळ खूप काही सांगून जाते.

तत्कालीन परिस्थितीबद्दलचा विषाद 'भंगेल कधी हे दुःस्वप्न' या कवितेतून व्यक्त झाला आहे.

*'कोणी करविती भूदान यज्ञ ।*
*कोणी अनक्षरास प्राज्ञ ।*
*कोणी ठरविती सुज्ञांस अज्ञ ।*

*सारे कर्मयोगी'*
*'येथे घोरतो की अंधासुर।*
*दुसरे मिळविती सुराला सूर।*
*हे का संगीत की बाजार। बेजारला श्रोता जीव'*

'तीन माकडे' या कवितेतून कवीची सामाजिक जाणीव दिसून येते.

*अधिकाराची भुते नाचती*
*न्यायच आता मिटले रे*
*गीता गावी, गीता ल्यावी,*
*उपदेशक ते नटले रे (भलतंच !)*

या ओळींमधून कवीला समाजात चाललेल्या ढोंगाबद्दल केवढी चीड आहे, हे कळते.

कविता क्रमांक ४९ ते क्र. ६१ पर्यंतच्या कविता, नातीच्या कौतुकानं भिजलेल्या आहेत. कवीचं स्फूर्तिस्थान म्हणजे निरागसता याचा प्रत्यय या कवितांमधून येतो. या छोट्या बाळाच्या ओठांच्या मिठीला 'मिठ्ठी' असं अधिकच चिकटणारं विशेषण कवी देतो. 'आला प्रतिमेचा घोडा' ही कविता तर अप्रतिमच आहे. 'प्रतिमा' हे त्यांच्या नातीचं नाव. ती जेव्हा खेळू लागली, तेव्हा तिच्या बाललीलांनी घर, घराचं अंगण, एवढचं नव्हे, त्या प्रतिमानं आसमंत व्यापून टाकला. चंद्र, सूर्य, इंद्रधनुष्य, पाऊस, वारा, वीज यांच्याशीही तिनं गट्टी जमवली आहे. कवीला ती केवळ मानवी वाटत नाही. तिच्या लीला पाहत असताना, कवीला जाणवतं की, हे तिचं बागडणं, दुडदुडणं केवळ व्यावहारिक स्तरावरचं नाही. तर

*चित्र की। आर्ष दृष्टीचे।*
*भ्रमण हे। तैजस सृष्टीचे।*
*शब्द शब्द। निःशब्द घुमारा*
*प्रतिमेचा घोडाऽ। आग्रह सोडाऽ*

या प्रतिमेकडून कवी कविमनातल्या प्रतिमेच्या घोड्याबद्दलही सांगतो. लहान मुलांच्या बोबडबोलांत येणारी मूळाक्षरं गं गं, हं हं, ऊं ऊं, झं झं, या अक्षरांचा वापर करून लिहिली गेलेली 'ध्वनी' ही कविता तर भारतीय संस्कृतीच्या उगमस्रोताला जाऊन भिडते आणि वाचकाला संस्कृतीचा सुगंध अनुभवू देते. चमत्कृतिपूर्ण आणि शब्दवैभवसंपन्न असा एक 'पाळणा' बेन्द्र्यांनी लिहिला आहे. या 'पाळण्या'चं वैशिष्ट्य असं की, यातली एक ओळ मराठी, तर दुसरी ओळ कन्नड आहे. या दोन्ही ओळी एकमेकींबरोबर इतक्या एकीनं नांदतात की, त्या 'पाळण्या'तल्या ओळी वाचताना आपल्या नयनांना प्रसन्न करणारी घट्ट दुपेडी वेणी आठवू लागते.

उदा.

*जो जो जो जो जो प्रतिमाबाई*

*हुच्चव्वा मुच्चव्वा ब्रह्मांड बाई'*

(वेडे, झाक बाई, तुझं ब्रह्मांडाएवढं तोंड)

*सर्वांच्याही गाली तुझाच शिक्का*

*आता माटा नोडि अज्जण्णा नक्का*

(जादूई खेळाला आजोबा खुल्ला- खुलला)

ही कविता वाचत असताना बेन्द्र्यांच्या शब्दसामर्थ्याचा आणि भाषाप्रभुत्वाचा प्रत्यय पुनःपुन्हा येतो. ही कविता कन्नड मराठी भाषाभगिनींच्या एकोप्याचं दर्शन घडवण्याच्या दृष्टीनं महत्त्वपूर्ण ठरावी.

क्रमांक ६२ पासूनच्या सगळ्या कविता कवीच्या आध्यात्मिक क्षेत्रातील गती दर्शवणाऱ्या आहेत. योगमार्गातील अनुभव, तुर्या आणि तुर्यातीत अवस्थेचं वर्णन, पंढरीच्या पांडुरंगाबद्दल, पुंडलिकाच्या विठ्ठलाबद्दल, प्रणवाच्या अवर्णनीय अनुभूतीबद्दल त्यांनी भरभरून लिहिलं आहे. या कविता उच्च साधकावस्थेतल्या बेन्द्र्यांनी लिहिल्या आहेत. त्यांच्या आयुष्यात चैतन्याचा हुंकार घडवून आणण्यासाठी गोंदवलेकर महाराज, नित्यानंद महाराज, उपळेकर गुरुजी, गुळवणी महाराज अशी संत- महंत मंडळी कारणीभूत झाली आहेत. बेन्द्र्यांची मराठी कविता ही मुख्यत्वेकरून ज्ञानदेवीच्या उपासनेवर पोसली गेली असावी. ज्ञानदेवांच्या शब्दकळेची आठवण यांच्या अध्यात्मविषयक कविता वाचत असताना सारखी होत असते. कधीकधी बेन्द्र्यांची शब्दकळा ब्रह्मरन्ध्रात स्फुरण पावू लागलेल्या ज्ञानकिरणांसारखी विकसत जाते. प्रकाशाची कणाकणांनी वाढत जाणारी व्याप्ती, पाहणाऱ्यांच्या डोळ्यांना स्तिमित करते, दिपवून टाकते. त्याचप्रमाणे बेन्द्र्यांची शब्दकळा आहे.

उदा:-

*'कलाकला । विकला सकला*
*काही विकला । काहीना विकला ।*
*अर्धा सुकला । अर्धा पकला ।*
*कंठी तडकला । प्राणऽ देवऽ देवोदेवी ।*
*उल्लंघू घू घू धुनि पेटली ।*
*डावी उजवी एकमेकाला खेटली*
*प्रसाद । जी । प्रसाद । द्या । साद । नाद । आस्वाद । रसार्द्र*
*उपमा । अप्रतिमा ।*
*उपमा । चारुतमा ।*
*नवसा । अभ्रमा । सत्रमा । सीमा । समाधीमा*
*अध्वने । मध्वने । उर्ध्वने ।*

हे एकमेकांसमोर ठेवलेले समदर्शी शब्द, एवढंच याचं महत्त्व नाही. माणसाला, साधकावस्थेत प्रगती करत असताना ज्ञान कसं होत जातं, शब्दांमधे दडून बसलेले अर्थ आणि भाव कसा साक्षात्कार घडवतात, मनाची तरल अवस्था, शून्यावस्थेत जाता जाता

'स्फोट। मौनाचा घोट।' कसा होतो, संस्कारशुद्धी होत होत मन आणि चित्त संस्काररहित अवस्थेला पोचू लागतात, तेव्हा,

*मागचे मऽग । आठवले ।*
*मार्गी । साग । हुडकला । हुकला ।*
*काही । इतुकला । तुकला*

असा साक्षात्कार होतो. हा साक्षात्कार काही परमेश्वराची मूर्ती दिसण्यातला नाही, तर ज्या Super mind नं आदिकाव्य प्रसवलं, अशा 'सुप्रमनाची' ती झेप असते. चराचरात व्यापून राहिलेल्या 'त्या' ची जाणीव होऊ लागली की, 'त्या'ला शोधण्यासाठीची धडपड व्यर्थ वाटू लागते. मग कवी म्हणतो:

*वृथा । कशाला । शोधिसी ।*
*द्रष्टी । रोधिसी । रोदिसी ।*
*एकत्री । जो सर्वत्री । सर्व क्षेत्री ।*
*आहे । पाहे । उगा । राहे । मौन मात्र ।*

या अनुभवांची तीव्रता व्यक्त करण्यासाठी कधी कधी कवीला, शब्दांशी संबंधित अशा कल्पनांचं, भावनांचं उधाण येतं. मग त्या शब्दाच्या पोटात, हृदयात, मस्तकात शिरणं हे त्याला सहजशक्य होतं.'शुभ्र' या शब्दाच्या आणखी खोलात गेलं की 'अभ्र' दिसतं. मग 'निरभ्र'तेचं माहात्म्य कळतं. 'स्वयंप्रभ हे नभऽ नभऽ' या शब्दांतून जाणवून देण्याचा प्रयत्न कवीनं केला आहे.

'हे जिभे' या कवितेत कवी जिभेला उद्देशून म्हणतो आहे:

*जिभे । हे जिभे । तुझेवरी ।*
*जे उभे । आडवे ।*
*म्हणती नाव घे । नाव घे ।*

या दीर्घकवितेत व्यक्त झालेले विचार अत्यंत जटिल स्वरूपाचे आणि अत्यंत व्यक्तिगत स्वरूपाचे आहेत. उदा. यात 'ददद' असा एक शब्द आहे. 'ददद । संगीत गात । नावानावात ।' अशा या ओळीतून 'ददद' याचा काय अर्थबोध होणार? पण तळटीपेत ददद = दमन, दया, दत्त असं स्पष्टीकरण मिळतं.

चिंतनात हरवून गेलं, की 'मीना । ना तू । बघणे दिसणे । विरत ।' अशी अनुभूती येते. 'हे मना रे वामनाच्या मना' या कवितेत असाच जटिल अनुभव मांडता मांडता नाममाहात्म्य, संतमाहात्म्यही सांगितलं आहे.

त्यांच्या काही कविता कूटरचनेच्या स्वरूपाच्या वाटतात. त्यांचा अर्थबोध होण्यासाठी विचारांची बैठक ही आध्यात्मिक, सांस्कृतिकं आणि पौराणिक अध्ययनावर आधारित असावी लागते.

बेन्द्र्यांच्या आध्यात्मिक वाटणाऱ्या कविता या केवळ आध्यात्मिक नाहीत. त्या व्यावहारिक पातळीवरून अत्यंत हळुवारपणें आध्यात्मिक पातळीवर उतरतात. आणि, 'अध्यात्म वाटते तेवढे कठीण नाही. समजतात तेवढे सोपे नाही,' याची जाणीव करून देतात. त्यांच्या या कवितांचा विचार एवढ्या छोट्याशा जागेत शक्य नाही. ग्रंथरचनेला अवकाश करून देणाऱ्या त्यांच्या या कवितांचा केवळ परिचय करून देत आहे.

'रेघ' या कवितेचा विशेष उल्लेख करून हा परिचय संपवतो. एकच रेघ नाना तऱ्हेचे आकार घेऊ शकते. त्याचप्रमाणं चैतन्य वेगवेगळ्या रूपानं काम करू शकतं. वाणी एकच असते, पण ती वेगवेगळी रूपं धारण करते. तद्वत कविमनाच्या सामर्थ्याचं आहे.

शंकराचार्यांची सौंदर्यलहरी ज्यानं वाचली असेल, त्याला 'रेघ' या कवितेचा अर्थबोध होऊ शकेल. श्रीविद्येचे उपासक आणि श्रीयंत्राचे उपासक यांना याचा उलगडा होईल. श्रीयंत्रात असणारी चौकट, वर्तुळ, त्रिकोण, त्यांचे बिंदू यांची माहिती आणि उपासना ज्यानं केलेली आहे, त्याला ही कविता कळू शकेल.

बेन्द्र्यांचे चिरंजीव डॉ. वामन बेन्द्रे यांनी हा कवितासंग्रह सम्पादित केला. एक पुत्र-पित्याच्या नात्यानं नव्हे, तर मराठी भाषेतल्या वरकवी बेन्द्र्यांच्या कविता मराठी वाचकांपुढं याव्यात, ह्यांचा आनंद त्यांना मिळावा, या आंतरिक तळमळीनं हे पुस्तक त्यांनी प्रकाशात आणलं. प्रथितयश कवींच्या अनेक कृती अशा अप्रकाशित असण्याची शक्यता असते. त्या प्रकाशित करून आजच्या समाजाला सांस्कृतिक दृष्ट्या अधिक श्रीमंत करावं हा उद्देश सम्पादकांनी बाळगला तर ते निश्चितच कौतुकादरास पात्र आहेत/ठरतील.

मराठी वाचकांच्या रसिकांच्या दृष्टीनं हा कवितासंग्रह म्हणजे अत्यानंदाचा ठेवा ठरावा. आजपर्यंत बेन्द्र्यांच्याविषयी मराठीत जे लेखन, संशोधन झालं आहे, त्याची सविस्तर माहिती मिळविण्यासाठी प्रस्तावनेत दिलेली माहिती स्फूर्तिदायक ठरेल, यात शंका नाही.

(उमाळा : द.रा.बेन्द्रे, संपादक : डॉ.वामन बेन्द्रे, प्रकाशक : पांडुरंग बेन्द्रे, वरकवी द.रा.बेन्द्रे मार्ग, साधनकेरी, धारवाड. मूल्य रु.५०/-)

(मराठा गल्ली, मणकिल्ला, धारवाड, ५८०००१)

डॉ. सुप्रिया अत्रे

# स्त्री-जीवनाकडे पाहण्याची आस्वादक भूमिका

सौ. अश्विनी धोंगडे यांचे 'अन्वय' हे कवितांचे पुस्तक वाचनात आले. प्रथमदर्शनी संग्रहाचे अन्वय हे नाव जरा वेगळे वाटले. अर्थाच्या विविध छटा घेऊन जरी कविता आपल्या समोर येत असतात, तरी तो शोध असतो एका कवीच्या भावरम्य उत्कट क्षणांचा ! त्याच्या संवेदनाशील मनाने टिपलेल्या अनुभवांचा. साहजिकच त्यामुळे कवयित्रींने कोणते क्षण यांत व्यक्त केलेत व त्यांचा अन्वय काय लावला आहे, हे पाहण्याची उत्सुकता होती.

या कवितासंग्रहात एकूण एकोणपन्नास कविता आहेत. काही कवितांचे विषय सोडले तर बहुतांश कविता या स्त्री जन्माच्याच विविध पैलूंचे दर्शन एका वेगळ्या चष्म्यातून घेताना दिसतात. अर्थात पहिल्याच कवितेत त्यांनी 'धन्यो स्त्रीजन्मः' असे स्वीकारून आपल्या व्यथेला वाट मोकळी करून दिली आहे. आपल्या या कवितांच्या प्रवासातून 'मी'पासून सुरू केलेली ही वाट, 'जन्म', 'व्यवहार', 'श्रद्धा', 'वास्तव', 'नाते', 'दुःख', 'सुसंस्कृत', 'घर', 'गर्दी', 'मरणसोहळा', 'असणे नसणे' आणि 'मृत्यू' अशा विविध जाणिवा व्यक्त करीत प्रत्येकाचा अन्वय लावत जाते.

'फुले करून राग मांळून घ्यावा' किंवा 'कडू बोलणी कर्णफुले करून टाकावीत', असे म्हणणारी ती, शेवटी

*असे जळावे, सजावे*
*त्याला मात्र डोळे द्यावे. जाई जुईचे...*

असे म्हणते. अनंतातून धुमसणारे एक वादळ 'ती' च्या मध्ये असताना कवयित्रीं व्यवहाराचे गणित मांडते आणि मी व तू च्या खेळात फासे उलटे पडले तरी का रडावे, असा सवाल टाकते. या सगळ्या आजूबाजूंच्या गोतावळ्यात असूनही आपण अगदी एकटे असतो हे कटू सत्य तिने 'एकटे' या कवितेत अतिशय सुरेख पद्धतीने सांगितले आहे.

*'आपण एकटे असतो, आपल्या सावलीपासूनसुद्धा'*

असे ती स्पष्टपणे म्हणते. एवढेच नाही, तर मुक्त वाटेवर दिशा बोलावतात तेव्हा ते आपलेच एकटेपण पोरक्या पाखरासारखे आपल्याला उचलून नेते. हे सांगताना कवयित्रीची भावगम्य अवस्था अतिशय समर्पकपणे जाणवते.

'या नव्या सुंदर जगात' ही तिची एक वास्तवाचे प्रखर चित्रण करणारी कविता. आपल्या



अनुक्रमणिका






लहानग्याला जन्म दिल्यानंतर त्याच्या स्वागताची तयारी सुरू आहे, पण समोर दिसते आहे ते जाळणारे वास्तव आणि सचिंत भविष्यकाळ. या दोन्हीतून डोकावणारे 'स्त्री'मन त्यातून व्यक्त होते. मात्र ही कविता वाचताना पद्मा गोळे यांच्या कवितांची वारंवार आठवण येते.

जाहिरातबाजीच्या आजच्या काळात कोणत्याही गोष्टीची त्यापासून सुटका नाही. मालाच्या खपासाठी वाटेल त्या प्रकारची जाहिरात करून ग्राहकाला भुलविले जाते. मात्र आजकाल जे एक 'वेडेपण' आपण रोजच्या वर्तमानपत्रातून वाचीत असतो, माणूस गेल्यावर त्याचा चौकटीत फोटो छापून त्यांच्या आठवणीने व्याकुळ होणाऱ्यांची नामावली छापलेली असते, त्यांच्या प्रेमाबद्दल शंका यावी, इतपत या गोष्टींचे प्रस्थ माजले आहे. जन्मभर पदराआड आपला चेहरा लपवीत आयुष्य जगणाऱ्या एका सामान्य स्त्रीचा तिच्या घराण्याच्या इभ्रतीला साजेलसा असा एक 'मरणसोहळा' कवितेतून साजरा होतो. एक विदारक सत्यच जणू येथे सादर होताना दिसते.

या कविता वाचताना या कवयित्रीबरोबर आपले मनही प्रवास करीत आहे असे वाटते. कारण यातल्या बहुतेक भावनांशी आपणही नाते सांगू शकतो. पण फक्त आपण ते शब्दबद्ध करू शकत नाही. म्हणूनच या कविता आपल्या जवळच्या वाटतात.

'स्थितप्रज्ञ आपण सारेच' ही या संग्रहातील एक सुरेख कविता. आपल्याला स्वतःत डोकावायला लावणारी. रोज आपण टी. व्ही.समोर बसतो. बातम्या चालू असतात. आपण टेबलावर जेवायची तयारी करीत असतो. तोंडाने बडबड चालूच असते. पार्श्वसंगीतासारख्या मागून बातम्या एक तोंडीलावणे म्हणून, आपल्या सुरक्षित घरात बसून, सुखासीनपणे आयुष्य घालवणारे आपण. जगाची चिंता फक्त 'बातम्यां'पुरतीच मर्यादित करतो. त्या बातम्या फक्त डोळ्यांना दिसतात. परिणाम म्हणाल तर आपल्यावर शून्य, म्हणूनच आपण स्थितप्रज्ञ.

संग्रहातील कवितांबरोबर काही छोट्या कणिकाही येथे आहेत. ज्यांत एके ठिकाणी ती म्हणते—

*शब्दांइतके असंवादी*
*काहीच नसते*
*शरीराइतके बोलके*
*काहीच नसते.*

किंवा

*ज्यांना कधी बहर येत नाही*
*जी वाढत नाहीत, फुलत नाहीत*
*काटे मात्र बोचरे, मान वर करून उभे असतात*
*अशी झाडे आपल्या आसपास जोमाने वाढत असतात.*



अनुक्रमणिका

आकाशातील चंद्र, शीतल वाऱ्याची अवखळ झुळूक, श्रावणसरी, प्रेमी जीवांची विरहव्यथा इ. नेहमीच्या साचेबंद गोष्टींना फाटा देऊन कवयित्रीने जीवनातील सच्च्या पण कटू गोष्टींची जाणीव आपल्या या कवितांमधून उत्कटपणे व्यक्त केली आहे. साध्या सोप्या शब्दांतून आशय निर्माण करून परिणाम साधण्याची हातोटी कवयित्रीला चांगली साधली आहे. 'दुःख' या कवितेत ती म्हणते,

*'दुःख कमी होत नाही काळाने*
*ते फक्त पिकून समंजस होते'*

किंवा, 'पोचे आलेल्या' या कवितेतील

*'जाळीदार निवर त्वचेलाही*
*संवेदाचे हिरवे धुमारे फुटतात'*

या ओळी याची साक्ष पटवतात.

जुन्या बाजारात वस्तू येतात त्या मोडीत काढलेल्या टाकाऊ वस्तू. पण तिला दिसते ती सद्य परिस्थिती. ज्यात खरोखर, देशभक्ताचे देशप्रेम, ध्येयवादी माणसाची अनामिक निष्ठा, वीराची निधडी छाती, आर्द्र करुणा, प्रेमिकांची धडपड याच गोष्टी मोडीत निघाल्या आहेत. त्यांचाच हा जणू बाजार आहे.

तसेच येथे एक अगदी वेगळी कविता आहे, वेगवेगळ्या वाहनांमुळे झालेल्या अपघातांतील जखमींना सरकारी मदत मिळते. त्यावरचे एक विदारक सत्य येथे वर्णिले आहे. आपले मरण हे परमेश्वराच्या हातात असल्याने आपले काही चालत नाही. अन्यथा आपण नक्कीच जन्मल्यावर कोणी, कुठे व कसे मरायचे याचे आरक्षण केले असते. आत्मपरीक्षण करायला लावणाऱ्या या कवितांमधून कवयित्रीची समाजमनस्कताच आपल्यासमोर येते.

स्त्री जीवनाकडे पाहण्याची कवयित्रीची आस्वादक भूमिका ह्या संग्रहात दृष्टीस पडते. साऱ्याच कविता चांगल्या असून, काही ठिकाणी 'स्व'चे प्रतिबिंब पडलेले विशेषत्वाने जाणवते.

खरं तर हा आहे एक प्रवास, आयुष्यात भेटलेल्या काही सोनेरी क्षणांचा, काही भंगलेल्या स्वप्नांचा तर काही सुखद आशांचा.

तिच्याच भाषेत,

*शेवटी काय आयुष्यभर*
*एकेक शब्द लावत जायचे*
*चष्मा घालून, भिंग घेऊन, अर्थाचे अन्वय शोधायचे!*

*(अन्वय– कवितासंग्रह, सौ. अश्विनी धोंगडे, दिलीपराज, प्रकाशन, पुणे)*

*(बी. ७, काशिनाथ अपार्ट. ६२, रामबाग कॉलनी, पौड रोड, पुणे ३८)*



अनुक्रमणिका







डॉ. चंद्रकांत देऊळगावकर

# मूक वेदनांचा प्रत्ययकारी आविष्कार

मूक वेदनांचा आविष्कार असलेला 'स्पंदन' हा डॉ. रोहिदास वाघमारे यांचा पहिला काव्यसंग्रह. 'महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळा'चे अनुदान या काव्यसंग्रहाच्या प्रकाशनार्थ मिळाले आहे. डॉ. रोहिदास वाघमारे यांच्या काव्यसंग्रहाबद्दल लिहिताना डॉक्टराच्या जीवनाचा पण विचार करणे अगत्याचे ठरते. कारण मराठवाड्यासारख्या मागासलेल्या भागातील उदगीरच्या एका खेड्यातील दलित समाजात डॉ. वाघमारे यांचा जन्म झाला. पण आज ते सर. जे. जे. हॉस्पिटलमध्ये रेसिडेंट मेडिकल ऑफिसर आहेत व हृदयरोगतज्ज्ञ म्हणून त्यांचा लौकिक आहे. त्यांच्या कार्याची पूर्ण ओळख करून देण्याचे हे स्थळ नव्हे. पण त्यांचा जीवनपट पाहिला म्हणजे मन थक्क होते. मुंबईस गेल्यावर त्यांनी सामाजिक, साहित्यिक, सांस्कृतिक, आकाशवाणी, दूरदर्शन ही क्षेत्रे अक्षरशः काबीज केली आहेत. विद्यार्थीदशेपासूनच त्यांनी साहित्य व नाट्य क्षेत्रात उज्ज्वल यश संपादन केले होते. संधी मिळाल्यास माणूस किती प्रगती करू शकतो, हे डॉ. वाघमारे यांनी दाखवून दिले. फक्त त्यासाठी जिद्द व परिश्रम पाहिजे.

दलित कविता ही प्रामुख्याने शोषितांची, पीडितांची, दुःखितांची, वेदनांनी विव्हळणाऱ्या माणसांची व दारिद्र्याने पिचलेल्या उपेक्षितांची आहे. साहजिकच या कवितेत विद्रोह येणार. प्रस्थापितांविरुद्ध नकार असणार. कारण त्या प्रस्थापित मूल्याच्या आधारेच दलित समाजावर अन्याय झाला आहे व त्यांचे शोषणही झाले आहे.

'परिवर्तन' या कवितेत वर्णिलेला हा अनुवाद बोलका आहे:

*पाटलाच्या विहिरीचे पाणी*
*पोहऱ्याने घेतले, तवा*
*विहीर बाटली म्हणून*
*एका रंगारी बाईने*
*बोंबाबोंब केली*
*सोपान पाटलाच्या घरातून*
*तांब्यात पाणी आणले*
*त्यानेच तसे सांगितले होते*

*तरी त्याने संतापून थोबाडीत मारले*

पण गंमत अशी की तोच सोपान पाटील

*माझी पोरगी अडली हो*
*तिला वाचवा म्हणून हात जोडून*
*उभा राहिला.*
*गादीवर माझा मानपान झाला*
*पोरीला औषधपाणी दिले*
*उपकार म्हणून पाटील*
*माझ्या पायावर पडला*
*माझ्या म्हाताऱ्या मायबापांना*
*खूप आनंद होतो*

खरोखरी या घटनेतील आनंद डॉ. वाघमारे यांना त्यांच्या कुटुंबाला झाला त्यांच्या सारख्याच अन्य कुटुंबाना कळणार. पण डॉ. वाघमारे यांनी व त्यांच्या इतर बांधवांनी घोर अपमान सहन केले आहेत, म्हणूनच ते 'शोधायचे आहे मला' या कवितेत म्हणतात–

*दलिताचा स्वाभिमान*
*शोधावयाचा आहे मला*
*जातीधर्मांच्या*
*वर्ण वर्ग पंथाच्या*
*दडपणाखाली गुदमरून गेलेला.*

मेलेल्या स्वाभिमानाचा त्यांना शोध घ्यावयाचा आहे. हा अभिमान त्यांना सतत जागृत ठेवावयाचा आहे. डॉ. बाबासाहेबांनी जरी दलितांना मुक्त केले असले तरी, आपला उद्धार आपल्यालाच करून घ्यावयाचा आहे, हे कठोर सत्य डॉ. वाघमारे यांनी सांगितले आहे. ते म्हणतात,

*बाबासाहेबांची विचार ज्योत*
*दलितांच्या मनात प्रज्ज्वली*

आता या बाबासाहेबांच्या विचारज्योतीच्या साह्याने आपला उद्धार आपल्यालाच करून घ्यावयाचा आहे. डॉक्टर वाघमारे यांनी आपल्या आचरणाने हे खरे करून दाखवले आहे. दलितांना मुक्त करणारी एकमेव व्यक्ती म्हणजे डॉ. बाबासाहेब याची, जाणीव सर्व दलितबंधूंना आहे. डॉ. वाघमारे म्हणतात–

*विश्वात एकच तू*
*दलितांस मुक्त केलेस*
*दास्य शृंखला तोडल्या*

*तिमिरात प्रकाश तू*

डॉ. बाबासाहेबांच्या विचारांनीच दलितांमधील स्वाभिमान जागा झाला. अन्यायाला वाचा फोडण्याचे सामर्थ्य आले. त्या सामर्थ्यापोटीच डॉ. वाघमारे 'हिशोब' मागतात –

*संपले ते दिवस*
*पाटील पांड्यांना*
*सतरा वेळा येताजाता*
*झुकून मुजरा करण्याचे*
*बाळकडू पाजले आम्हा*
*बाबांनी समता बंधुत्वाचे.*
*उघडे आहे आता दार*
*नोंदविण्यास निषेध*
*या क्रूर अमानवी*
*नराधमांचा*

हा निषेध करण्याचे कार्य दलित साहित्य करीत आहे. भाषा कशी आहे, याला महत्त्व नाही. हे शब्द दलितांचे, शोषितांचे, उपेक्षितांचे, हमालांचे आहेत, नसतील या भाषेत अलंकार, पण हे शब्द सच्चे आहेत. या शब्दांतून त्यांना बंड पुकारावयाचे आहे. डॉ. वाघमारे म्हणतात–

*'गाऱ्हाणे गाणार आहेत ते शब्द*
*शब्दांनी स्थापलीय आपली एक संघटना*
*स्वाभिमान टिकविण्यासाठी*
*अन्यायाविरुद्ध बंड पुकारण्यासाठी' (शब्द)*

दलित स्त्रियांवर अत्याचार झाल्याच्या बातम्या नेहमी येतात. अत्याचार करणाऱ्या नराधमांना डॉ. वाघमारे इशारा देत आहेत–

*'आता तरी जागे व्हा*
*नाहीतर तुमचाच बळी द्यावा लागेल*
*आयुष्यभर भोगलेल्या*
*ऐषआरामाचे, अन्याय अत्याचाराचे*
*प्रायश्चित्त म्हणून' (बलात्कार)*

मानवी मूल्याची राखरांगोळी झाल्याची खंत वाघमारे 'हक्क' या कवितेत व्यक्त करतात.

उच्चभ्रू कॉलनीतील दिवाळीचा झगमगाट व रंगीबेरंगी कपड्यांनी नटवलेली बायापोरं पाहून झोपडपट्टीतील मुलांच्या मनात व डॉक्टरांच्या मनात निर्माण झालेला

प्रश्नच उभा राहणार :

*'आमच्या वस्तीतला अंधार*
*कायमचा नष्ट करण्यासाठी*
*येणारी प्रत्येक दिवाळी*
*झोपडी झोपडीत आनंदाने*
*नाचेल का हो कधी तरी ?'*

किती व्याकुळता व कारुण्य आहे या प्रश्नात !

संघर्ष हा तर दलितांच्या जीवनाचा स्थायी भाव.

भाकरीच्या तुकड्यासाठीसुद्धा संघर्ष. डॉक्टरांनी स्वतः असे जीवन अनुभवले आहे. मनोगतामध्ये ते म्हणतात– 'माझी आई गुडाबाई व वडील मारुतीराव यांनी हाडाचे पाणी करून मला शिकवले, 'संघर्ष' या कवितेत ते म्हणतात–

*उन्हातान्हात खडी फोडता फोडता*
*मेल्यागत झालंय शरीर त्यांचे'*

पण हा संघर्ष कुठवर–

*संधी मिळताच*
*हे रक्त उफाळणार उसळणार*
*आणि तोच हातोडा*
*ज्याच्या बळावर, मंदिरे*
*मस्जिदी, बंगले, मिनारे उभारली*
*उद्ध्वस्त भुईसपाट करील*
*तेव्हा विझेल हे*
*संघर्षाचे पेटलेले वादळ*

माणसातील माणूसपण जेव्हा जागे होईल तेव्हाच लोकशाही खऱ्या अर्थाने टिकेल, असे डॉ. वाघमारे यांना वाटते. पण तसे घडत नाही याचे त्यांना वाईट वाटते. त्यातून 'लोकशाही', 'देशप्रेम', 'होळी', 'अंधाराचा बाजार' अशा कविता ते लिहीत जातात. 'देशप्रेम' या कवितेत ते म्हणतात–

*'माझ्या देशावर*
*माझे प्रेम आहे*
*म्हणणाऱ्यांच्या प्रथम*
*निष्ठा तपासून बघा'*

हा प्रश्न केवळ डॉ. वाघमारे यांचाच नाही, तर सर्व भारतीयांच्या मनात निर्माण झालेला प्रश्न आहे. डॉ. वाघमारे यांनी आपले अनुभवविश्व कवितेतून साकार केले आहे.



अनुक्रमणिका

मनोगतामध्ये ते म्हणतात, 'मला कळत नव्हते तेव्हापासून मी कविता जगतो आहे. आता जगण्याला कवितेच्या जन्मापासून महत्त्व प्राप्त झाले आहे. माझी कविता जीवनाचे निखळ सत्य सांगणारी असल्याने, तेथे शब्द पॉलीश केलेले नसतील अथवा व्याकरणाचे पोस्टमार्टम झालेले असेल, पण शब्द मुके नाहीत.' त्यांचा हा प्रामाणिकपणा त्यांच्या कवितेतून जाणवल्याशिवाय राहत नाही. सर्व दलित कवींची ही व्यथा आहे की, माणूस म्हणून दलितांना वागवले गेले नाही. 'माणूस' या कवितेत डॉक्टर म्हणतात–

*'हे मानवपुत्रा*
*तुझे जन्ममृत्यूचे विज्ञान*
*आम्ही अनुभवतो, वाचतो*
*पण*
*अनुभवली, वाचली नाहीत*
*माणसांना माणुसकी*
*मिळाल्याची उदाहरणे*

'गावकुसाबाहेरील पोरानं शिकूनशान चमत्कार केला' म्हणून त्याचा सत्कार करावयाचे ठरले होते, पण सत्काराआधीच हारतुरे गायब झाले, असे ते 'सत्कार' या कवितेत म्हणतात. त्यातून सत्कार करणाऱ्या लोकांची मनोवृत्ती दिसून येते. विकासाचे झाड फुलोऱ्याआधीच सुकून गेले अशी विचित्र परिस्थिती निर्माण होते. 'पक्ष्यांतून पक्षी निर्माण होतात' पण 'माणसातून माणूस जन्मत नाही', ही डॉक्टरांची रास्त तक्रार आहे. शिकूनसवरून, शेवटी जन्माने 'दलित' दलित ठरतो. अशा माणुसकीची होळी होते. हे शल्य त्यांच्या मनाला टोचते. म्हणून 'जात' या कवितेत ते म्हणतात–

*जातीचे पोवाडे*
*कशाला गावेत एवढे*
*ज्या जातीने आम्हाला*
*मातीत गाडले*
*जी जा म्हणल्याने जात नाही*
*तिला परत कशाला उराशी*
*कवटाळावयाचे.*

या जातीवर त्यांना 'रापी' मारावयाची आहे आणि 'हस्ती' हत्यारही चालवावयाचे आहे. या काव्यसंग्रहाला प्रस्तावना लिहिणारे भारतीय दलित साहित्य अकादमीचे अध्यक्ष श्री. राम बसाखेते यांनी म्हटले आहे, 'ही कविता पारंपरिक लादलेले दास्यत्व, अंधश्रद्धा, प्रतिगामिता, विषमता, जातिव्यवस्था, वर्णव्यवस्था आणि नतद्रष्ट संस्कृती नाकारते.' अत्यंत योग्य शब्दांत श्री. राम बसाखेते यांनी डॉ. वाघमारे यांच्या कवितेबद्दल आपले मत व्यक्त

केल आहे.

डॉ. वाघमारे यांचा 'स्पंदन' हा पहिलाच काव्यसंग्रह असला, तरी काव्यगुणांनी नटला आहे. काही शब्दांचे दोष राहून गेले आहेत, पण ते नगण्य आहेत. या कवितेत उत्कटता आहे. आपल्या मनातील 'स्पंदनांना' योग्य आविष्कार देण्याचा त्यांचा प्रामाणिक प्रयत्न आहे. 'कवीचे लग्न', 'प्रिय लोकल' या कविता कल्पनारम्य अशा आहेत. 'परिवार नियोजन', 'दारूचे दुष्परिणाम', 'रक्तदान' या कविता सामाजिक राष्ट्रीय विचार व्यक्त करणाऱ्या आहेत. सर्वच कवितांचा परामर्श घेणे अशक्य.

डॉ. वाघमारे यांनी कुणाच्याही शैलीचे अनुकरण केले नाही. त्यांच्या कवितेवर त्यांच्या प्रामाणिकपणाचा ठसा आहे हेच चांगले आहे. कविवर्य कुसुमाग्रज यांनी डॉक्टरांच्या काव्यसंग्रहाचे कौतुक केले आहे व शुभेच्छा दिल्या आहेत. माजी राष्ट्रपती ग्यानी झैलसिंग यांच्या हस्ते काव्यसंग्रहाचे प्रकाशन झाले. या गोष्टी निर्विवादपणे कौतुकास्पद आहेत. डॉ. रोहिदास वाघमारे यांची काव्यनिर्मिती एका काव्यसंग्रहापुरती मर्यादित राहणार नाही, हीच त्यांच्याकडून अपेक्षा आहे

('स्पंदन' डॉ. रोहिदास वाघमारे, शलाका प्रकाशन, मुंबई, किंमत रु. २०)

(चंद्रमौळी, [illegible] लातूर ४१ [illegible])

---

## चुकीची दुरुस्ती

'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'च्या मागच्या म्हणजे एप्रिल-जून १९९२ च्या अंकात श्रीमती विद्या सप्रे-चौधरी यांनी लिहिलेले 'दिना दिसे मज दिनरजनी' या पुस्तकावरील परीक्षण प्रसिद्ध झाले असून त्यात त्यांनी पृष्ठ ५८ वर 'कल्पवृक्ष कन्येसाठी लावुनिया बाबा गेला' या गीताचा उल्लेख केला आहे. हे प्रसिद्ध गीत कविवर्य ग. दि. माडगूळकर यांनी लिहिल्याचा त्या लेखातील उल्लेख चुकीचा आहे. कविवर्य श्री. पी. सावळाराम यांच्या प्रासादिक लेखणीतून ते गीत उतरले आहे. श्रीमती सप्रे-चौधरी यांच्या हातून अनवधानाने झालेल्या या चुकीबद्दल दिलगीर आहोत.

संपादक



अनुक्रमणिका

हरी नरके

# सोयरा दुष्काळ सोबतीस

'फकिराचे अभंग' हा कवी फ.मुं. शिंदे यांचा या दशकातील लक्षणीय काव्यसंग्रह. अभंग वृत्ताचा वापर करून समकालीन वास्तवावर कठोरपणे प्रहार करणाऱ्या ८० कवितांचा हा संग्रह. ह्या संग्रहाने अनेक मान्यवरांचे लक्ष वेधून घेतले. त्यांच्या पसंतीची दाद मिळवली. या संग्रहावर दिले गेलेले विविध अभिप्राय संपादित करून सौ. लीला शिंदे यांनी 'फकिराच्या अभंगाचे पारायण' हा समीक्षाग्रंथ साकेत प्रकाशनामार्फत प्रसिद्ध केला आहे.

मराठीमध्ये अशा प्रकारे एखाद्या वाङ्मयकृतीचा विविध अंगांनी वेधास्वाद घेणारी अगदी मोजकी पुस्तके आहेत. कोसला, गोतावळा, बलुतं आणि मुक्काम पोस्ट देवाचे गोठणे या गाजलेल्या पुस्तकांवरचे संग्रह यापूर्वी प्रकाशित झाले आहेत.

एखाद्या पुस्तकावरचे अनेक समीक्षकांचे लेखन एकत्र उपलब्ध करून दिल्याने त्या कृतीच्या आकलनाला मदत तर होतेच; परंतु वाचकाची समज, सजगता व गोडी वाढण्याला आणि विद्यार्थी, प्राध्यापक यांनाही असा पुस्तकांचा उपयोग होतो. एकूणच वाङ्मयीन जाणिवा प्रगल्भ व्हायला हातभार लागतो.

मराठीत ठराविक नामवंत कवी सोडले, तर इतरांच्या कवितासंग्रहांना क्वचितच मागणी असते. अशा वेळी कवितासंग्रहावरचा समीक्षाग्रंथ प्रकाशित करण्याचा प्रयत्न धाडशी ठरावा. 'पारायण' या शब्दाला असणारी आध्यात्मिकता, सराईतपणा आणि कर्मकांड उरकण्याची अर्थच्छटा लक्षात घेता पुस्तकाचे नाव मात्र तितकेसे समर्पक वाटत नाही.

*आहेस तू कुठे । सामान्य माणसा ।*
*असूनही कसा । नसलेला ।*

जनसामान्यांच्या अस्तित्वाचा प्रश्न लावून धरणाऱ्या 'फ.मुं.'च्या कात्र्यावर लिहिणारे तसे नामवंतांच्या समीक्षापीठाचे मान्यताप्राप्त पदवीधारक नाहीत. त्यांना ही कविता जशी दिसली आणि भावली तसे त्यांनी लिहिले.

कवी विठ्ठल वाघ यांना वाटते की, ही कविता मेंदूचे झाड गदागदा हलवते. भास्कर चंदनशीव यांच्या मते स्वातंत्र्य या मूल्याचे फमुंइतके सखोल चिंतन समकालीन कवींनी क्वचितच केले असेल. फकिराचे अभंग ही निर्दोष छंदोमयी रचना आज विशेष दुर्मिळ ठरावी, अशी असल्याचा अभिप्राय कवी वसंत सावंत नोंदवतात. आशयाला अनुकूल अशी










सु. म. तडकोड

# ना.सी.फडके यांच्या लेखनवैशिष्ट्यांची मीमांसा

डॉ. प्रल्हाद बा. वडेर यांच्या चिकित्सक वृत्तीचा प्रत्यय त्यांच्या विद्यार्थ्यांना जसा नेहमी अनुभवास येतो, तसा त्यांच्या वाचकांनाही येत राहतो. डॉ. वडेर यांनी स्वतंत्र तसेच अनुकारीत कथा (चढण, वीज, कोणीकडून कोणीकडे) संग्रह, लघुनिबन्ध, स्वतंत्र तसेच अनुकारीत एकांकिका व इतर प्रसंगोपात्त लेखन केलेले असले, तरी त्यांचे चित्त लागते ते साहित्यचर्चेतच. एका बाजूने 'गगनगन्ध' (सत्यकथा, दिवाळी १९७८) सारखा ललितनिबंध निहीत असले, तरी मनोहर माळगावकरांच्या कथा असोत किंवा संत तुकाराम आणि श्रीमद्‌भागवत असोत, डॉ. वडेरांच्या वृत्तीला लालित्यापेक्षा चिंतनशील चिकित्सकपणा अधिक मानवतो. त्याचे प्रत्यंतर त्यांच्या 'अनुभव आणि आकार' (अजब–१९७५), 'आशय आणि आविष्कार' (अजब–१९८८) या पुस्तकांत दिसते; त्या वृत्तीचे प्रतिबिम्ब त्यांच्या 'ना.सी.फडके: एक चिकित्सक अभ्यास' या प्रबन्धात्मक ग्रन्थातही दिसते.

खरे तर ना. सी. फडके यांच्या साहित्याचा अभ्यास करणे, त्यात पीएच.डी. सारख्या संशोधकीय प्रयोजनास दृष्टीसमोर ठेवून करणे, हे एके काळी हास्यास्पद मानले जात असे. प्रा. माधव मनोहर यांच्यासारखे मुरलेले समीक्षक 'फडक्यांनी कोणती कथा कोणत्या कथेवरून बेतली. हे स्वच्छ सांगणारी फडक्यांची दस्तुरखुद्द पत्रे आज माझ्या संग्रही आहेत. पण त्यावरून मूळ इंग्रजी कादंबऱ्या वाचून तुम्ही काही तौलनिक विवेचन अभ्यासपूर्वक करणार आहात का ? हे काम कष्टाचे आहे आणि तुम्हाला ते झेपेल, असे वाटत नाही,' असे उपहासगर्भ उद्गार (ललित-जाने. १९८१) काढीत असत.

परंतु याचा अर्थ असा नव्हे की, फडके यांच्या लेखनावर समीक्षणात्मक लेखन झालेच नाही. यापूर्वी म.ना. अदवन्त, वि. बा. आंबेकर, नी. म. केळकर, वि.स. खांडेकर, 'गोदागौरव'कार चंद्रशेखर, अरविन्द मंगरूळकर, प्रभाकर माचवे, दे.द. वाडेकर, लक्ष्मणराव सरदेसाई, श्री. के. क्षीरसागर, 'आनंदयात्री' (१९९२) व 'युगप्रवर्तक फडके' (१९६७) लिहिणारे वि.वा. पत्की यांसारखे नामांकित लेखक फडके यांच्या लेखनाचे आलोचन करीत असत. त्यात आक्षेप असत, प्रत्येक घरात मुलांना कोणत्या कादंबरीतील नावे अधिक ठेवली गेली, याचे सर्वेक्षण करून वा. म. जोशी यांच्या 'रागिणी' कादंबरीपेक्षा फडक्यांच्या कादंबऱ्या अधिक लोकप्रिय झाल्या, असा प्रशंसात्मक निष्कर्ष (पत्कींकडून) काढला जात



अनुक्रमणिका

असे. काही जण फडके यांना 'युगप्रवर्तक' म्हणत असत, तर बुडबुड्यांसारखे नश्वर शब्दजाल उभे करणारा लेखक, असे म्हणणारे पुरोगामी आणि समाजवादी टीकाकारही असत; 'मराठी लघुकथेचा शिल्पकार' असे यांनी म्हणावे, तर 'हरिभाऊ व अन्य समकालीन लेखकांनी लिहिलेल्या कादंबरीच्या पांडित्यपूर्ण व बोजड भाषेला फडके यांनी प्रवाहीपणा, नाट्मधुरता, वेग आणि खेळकरपणा आणला' असे सुभाष भेंडे यांनी आपले मत नोंदवावे, असे फडके यांच्या साहित्यावरील रोष किंवा भक्ती दाखविणारे चित्र दिसते.

या पार्श्वभूमीवर डॉ. वडेर यांनी आपल्या पीएच.डी. (१९७६)साठी लिहिलेल्या प्रबंधाचे पुनर्लेखन करताना समर्थन वा विरोध आत्यंतिक पातळीवर न नेण्याचे बंधन घालून घेण्याचा संयम आपल्यावर घालून घेतलेला दिसतो, हे या 'ना. सी. फडके : एक चिकित्सक अभ्यास' ग्रंथात अखेरीस जाणवते. फडके, खांडेकर, माडखोलकर या त्रयींचा अभ्यास करण्यासाठी अतिरिक्त प्रीती दाखविणारे व अतिरेकी दोषदिग्दर्शन करणारे समोर असताना डॉ. वडेर यांना तारेवरची कसरत करावी लागली असेल, असेही मत होऊ शकेल. परंतु कादंबरी लेखनाच्या रेखा फडके यांच्याकडे ज्या इंग्रजीतून आल्या, त्या इंग्रजीचे डॉ. वडेर हे काही काळ पदव्युत्तर प्राध्यापक होते. त्यामुळे साहित्यमीमांसा करताना आवश्यक असलेला नीरक्षीरविवेक डॉ. वडेर यांच्यापाशी आहे, हे विसरून चालणार नाही.

डॉ. वडेर यांनी हा ग्रंथ फडके यांच्या समग्र साहित्याचा विचार करण्यासाठी लिहिलेला आहे. त्यामुळे फडके यांचे वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व, टीकादृष्टी, कादंबऱ्या, लघुकथा अशा साहित्यसंसाराचा ऊहापोह करणे ओघाने येते. त्यासाठी ग्रंथसूची, लेखसूची, जीवनकाळ यावरील दृष्टी ही सम्यकच ठेवली पाहिजे, याचेही भान डॉ. वडेर यांनी बाळगलेले दिसते. अशा भान बाळगणाऱ्या जाणिवेतून फडके यांच्या लेखनाचा हा वस्तुनिष्ठ अभ्यास मराठी साहित्याच्या इतिहासातील त्यांचे स्थान निश्चित करण्याचा प्रयत्न आहे, असे म्हणता येईल.

याचबरोबर डॉ. वडेर यांना फडके यांच्या प्रतिभेचा आवाका जाणून घ्यावयाचा आहे. प्रतिभेतील नैसर्गिक व कृत्रिम मूलतत्त्वे शोधावयाची आहेत. 'वस्तुतः आपल्या समाजात प्रेम ही केवळ कल्पना असून तिचा वाङ्मयीन अर्थ लैंगिकता होता, कारण प्रेमात तोलून धरणारी पाश्चात्त्य पद्धतीची स्त्री-पुरुषसंबंधीची व्यासपीठे आपल्याकडे नाहीत,' अशी मते (टीकास्वयंवर, भालचंद्र नेमाडे, साकेत प्रकाशन, सप्टें. १९९०, मूल्य १६०/- पृष्ठसंख्या ३२६) जरी तपासली गेली नसली, तरी फडके यांची प्रतिभा बांधेसूद कथानके देणारी होती. फडके यांच्या कादंबऱ्यांची मोहिनी गेल्या पन्नास वर्षांपूर्वी मराठी पिढीवर होती. त्यासाठी स्त्रीशिक्षणाचे वारे, स्वातंत्र्यचळवळीचे व्यापक क्षेत्र, हे जसे अनुरूप वातावरण होते तसेच सोबतीला कुशल निवेदनपद्धती होती, याकडे विशेष लक्ष दिले गेलेले दिसते.

असे संशोधनात्मक निष्कर्ष काढण्यापूर्वी डॉ. वडेर स्वतःला मूलगामी प्रश्न विचारतात– '... त्यांच्या (फडके यांच्या) समग्र वाङ्मयाचा विचार केल्यावर वाचकांच्या मनावर कोणता कायमचा ठसा उमटतो ? त्यांच्या (७४ पैकी) किती कादंबऱ्या, किती (२९ संग्रहांपैकी) लघुकथा कायमच्या लक्षात राहतात ? दोन-चार कादंबऱ्या, हाताच्या बोटांवर मोजण्याहून कमी लघुकथा, काही लघुनिबंध, काही कलाकृतींची रसग्रहणे... बस्स ! फक्त एवढेच ! हे असे का व्हावे ? ज्या लेखकाला सूक्ष्म निरीक्षणशक्ती, नवीन अनुभवाचा सतत शोध घेण्याची आवड, उत्कृष्ट तंत्रकौशल्य आणि कुणीही हेवा करण्याजोगी भाषा व शैली लाभली आहे, त्याच्या लेखनाबाबत सतत असमाधानाचे सूरच रसिकांच्या व समीक्षकांच्या मनात का उमटावेत ? 'भाषेची दौलत उधळणारा जादूगार' असे ज्यांचे वर्णन कै. शि.म. परांजपे यांनी केले... त्यांच्या 'दौलत व 'जादूगार', 'या कादंबऱ्या शाप ठरल्या. त्या दोन कादंबऱ्या वाचूनच माझ्यावर टीका होते', असे फडके यांना वाटण्याइतपत वातावरण निर्माण का व्हावे ?' असे काही प्रश्न विचारून डॉ. वडेर उत्तरासाठी फडके यांच्या वाङ्मयीन व्यक्तिमत्त्वाकडे वळतात.

परंतु डॉ. वडेर यांच्या प्रश्नांतून उद्भवणारे प्रतिप्रश्न मात्र अनुत्तरित राहतात. जे कायमचे लक्षात राहायचे असते, त्या कलाकृतीच्या चिरंजीवित्वामागची कोणती कारणे असतात ? जे कायमचे लक्षात राहत नाही, ते साहित्यिक दर्जात उणे असते किंवा काय ? त्याचे भान फडके यांना होते किंवा काय ?

डॉ. वडेर स्वतःला जे प्रश्न विचारतात, त्यांची उत्तरे मिळविण्याकरता फडके यांच्या वाङ्मयीन व्यक्तिमत्त्वाकडे वळतात. त्या वेळी त्यांना आढळते की– 'कलेसाठी कला' या तत्त्वाचा (फडके यांनी) सतत पुरस्कार केला, पण त्यातही कोणत्याही अनुभवात स्वतःला झोकून न घेता, खोल न जाता, त्यातील वैचित्र्य व सुखमयता वाढविण्याकडेच त्यांनी आपले लक्ष्य (लक्ष ?) केंद्रित केलेले दिसते."

फडके यांच्या टीकालेखनात खूपच पुनरावृत्ती आढळते. त्यात १९२० ते १९३० या दशकातील हडसन, पर्सील्य बक, आर्नोल्ड बेनेट, गॉल्सवर्दी वगैरेंचा विचारच फडके यांनी मांडला. शिवाय त्यांच्यावर क्लेटन हॅमिल्टनचा तर प्रभावच होता. 'मराठी वाङ्मय हे इतके परिपुष्ट आहे की ते पुरेसे परिपुष्ट नाही,' त्यातील उपहासगर्भ रोख फडके यांच्यावर तर नाही ना ? कारण समीक्षेतील परभृतपणा तसा फडके यांच्यापासूनच विशेष सुरू झालेला आहे. फडक्यांच्या लेखनात पुनरावृत्ती असण्याचे कारण त्यात मुद्दलच परके आहे. त्यामुळे 'प्रतिभासाधन' काय किंवा 'मराठी लघुनिबंधाचा जनक कोण ?' काय, फडके यांचे लेखन– जरी त्यात मूळ पुस्तकांचा अनुल्लेख असला, तरी– हा इंग्रजी वाङ्मयाचा मराठी अनुकार होता, असा निष्कर्ष डॉ. वडेर काढतात. फडके यांचा कलाविचार हा

केळकर-कोल्हटकर यांच्या आधारे असल्याने फडके हे कुठेच अभिजात दिसत नाहीत, हेदेखील डॉ. वडेर दाखवून देतात. पुढे 'रत्नाकर'मधून दिसणारे १९२६ तील फडके १९३१ मध्ये नीती व कला यांचा संबंध नाही, अशी विरोधी भूमिका घेतात, तर १९४१ तील फडके 'साहित्य हे ध्येयप्रवृत्तपर असले पाहिजे', असे म्हणून घुमजाव करतात. हे पाहून डॉ. वडेर नमूद करतात की, यामुळे पुरोगामी व गांधीवादी तसेच साम्यवादी आक्रमण परतवले गेले. तसेच फडके हे मर्ढेकर व ह.ना. आपटे यांच्या सोवतीने मराठी साहित्यात उभे आहेत.

फडके यांच्या लेखनात कादंबरीचा परीघ खूपच मोठा आहे. परंतु फडके यांच्या टीकालेखनासंदर्भात ६८ पृष्ठे लिहिणारे डॉ. वडेर या वेळी केवळ ४० पृष्ठांतच आटोपून घेतात. त्या वेळी तत्कालीन कादंबरीकारांशी तुलना करून 'त्यांच्या कादंवरीतील आधुनिकता, आकर्षकता, बांधेसूद घाट, भाषा व शैली यांचा गोडवा या गुणांचे कौतुक करूनही आभासपूर्ण विश्व रंगविण्यात शृंगारिकता, कामुकता सजविण्यात त्यांच्या कलेने कृतार्थता मानली, हे त्यांचे मोठे अपयश आहे,' अशी टिप्पणी डॉ. वडेर करतात.

डॉ. वडेर म्हणतात– 'फडके यांनी कादंबरीत तांत्रिक प्रयोग केले. भाषेला एक मृदुमुलायम वळण दिले आणि चतुर व चित्तवेधक निवेदन, खेळकर संवाद, निसर्गवर्णने व नवी पार्श्वभूमी यांची तिला जोड देऊन तिची आकर्षकता वाढवली, पण त्याचबरोबर पोशाखी संवाद आणि चर्चा त्यांनी रूढ केल्या. फडक्यांच्या कादंबरीला जीवनविषयक प्रगल्भ अनुभवांचे, विचारांचे अधिष्ठान लाभले नाही. कलावृत्तीतील आशय व अभिव्यक्ती यांची कृत्रिम फारकत करून तंत्रावरील प्रभुत्व कायम ठेवले.' अशी नोंद करण्यापूर्वी जो ताळेबंद डॉ. वडेर यांनी घेतला त्यास संकलनाचे स्वरूप येऊ न देता फडके यांच्या टीकाकारांनी केलेली आलोचना, तत्कालीन टीका वर्तुळातील समीक्षेचे स्वरूप आणि फडके यांच्या साहित्याचा परामर्श अंतर्भूत आहे. त्यामुळे आलेला वस्तुनिष्ठपणा अपरिहार्यच वाटतो. स्टीव्हनसन, वेल्स, ह.ना. आपटे व व्हिक्टोरियन कादंबरी यांचा प्रभाव फडके यांच्यावर होता, हे सांगण्यापूर्वी तत्कालीन मराठी कादंबरीचे तंत्र व भाषात्मक स्वरूप न्याहाळतात म्हणूनच निष्कर्षात्मक समीक्षेसाठी आवश्यक असलेला मुद्देसूदपणा आलेला दिसतो.

या निमित्ताने मराठी कादंवरीलेखनाचा आलेख काढण्याची संधी डॉ. वडेर सोडत नाहीत. पण काही मुद्द्यांचा परामर्शही त्या वेळी घेता आला असता.

'हरिभाऊंच्या कादंवरीशेजारीच जिची व्याप्ती कथेपलीकडे जाऊ शकत नव्हती, अशी एक सुटसुटीत व रंजनवादी कादंबरी उदयाला येऊ लागली,' असे वा.ल. कुलकर्णी म्हणतात, परंतु ते चूक असल्याचे नेमाडे यांनी 'मुक्तामाला प्रवृत्ती'त दाखवून दिले आहे. ही रंजनवादी कादंवरी हळबे, नारो सदाशिव रिसबूड यांच्याकडून फडके, खांडेकर वगैरेंकडे

गेली असल्याचे दाखवून दिले आहे. (मराठी कादंबरी : प्रेरणा व स्वरूप, अनुष्टुभ, ऑगस्ट १९८०). या संदर्भात काही विशेष विचार मांडता आले असते. डॉ. वडेर हे नेमाडे यांचा कादंबरीकार म्हणून उल्लेख करतात, पण टीकाकार म्हणून टाळतात किंवा काय, असे सहज वाटून जाते.

फडके यांच्या लघुकथालेखनासंदर्भात मराठी लघुकथेच्या विकासाची दिशा दाखविणे, हे अपरिहार्यच होते. परंतु इंग्रजी शॉर्ट स्टोरी आणि फडके यांची लघुकथा यांतील अंतःस्थ नाते ज्या तऱ्हेने डॉ. वडेर यांनी उलगडवून दाखविले, ते विशेष उल्लेखनीय आहे. फडके यांच्या कथेमध्ये त्यांच्याच कादंबरीतील चमत्कृती, योगायोग, रहस्य आढळते. एका बाजूने वा.लं.नी, 'जिची व्याप्ती कथेपलीकडे जाऊ शकत नव्हती, अशी एक सुटसुटीत व चटपटीत रंजनवादी कादंबरी उदयाला येऊ लागली', असे म्हणून फडक्यांची कादंबरी म्हणजे एक विस्तृत केलेली लघुकथाच होती, असे तर सुचविले नाही ना? या संदर्भात काही विचार करता येईल किंवा काय, ते पाहायला हवे होते. गुंतागुंत, निरगाठ व शेवटी उकल या तंत्राधिष्ठित लघुकथालेखनास १९४५ नंतर गंज का चढला, याचे अलिप्त, वस्तुनिष्ठ व निष्कर्षात्मक विवेचन केले आहे. कथेतील सुटसुटीत भाषा, तंत्रशुद्धलेखनातून घडत गेलेले रूपसौंदर्य हे फडके यांच्या शैलीचे विशेष होते. त्यामुळेच ती एका कालखंडाचे प्रतिनिधित्व करू शकली. म्हणूनच तर गंगाधर गाडगीळ यांनी 'प्रा. फडके यांनाच आपण मराठी लघुकथेचे जनक म्हटले पाहिजे,' असे म्हटले.

असे असले तरी, लघुकथा हा प्रकारच जर नाकारायचे ठरविले तर?

'लघुकथा हा निव्वळ मासिकं चालविणारा क्षुद्र वाङ्मयप्रकार आहे. काहीतरी एक-दोन चमत्कृतिपूर्ण माणसं किंवा घटना चोळून चोळून चार-पाच पानं धूर्तपणानं लिहिणाऱ्यांसाठी हा चिटुकला प्रकार ठीक आहे. एक तर लघुकथेच्या तीन-चार पानांत इतका छोटा भाषिक अवकाश अभिप्रेत असतो की, कोणाला फारसं काही सांगता येत नाही. छोटेपणामुळे अतिशयोक्तीकडे कल वाढतो. चटपटीतपणा हा एक गुण होऊन बसतो. छोट्या फॉर्मसाठी भाषेवर भलताच ताबा असला पाहिजे. कवितेसारखा. काहीतरी मानसिक, भावुक किंवा अंधुक, जाणूनबुजून फालतू ताण मांडणाऱ्या, 'आभाळ भरून आलं होतं,' किंवा 'बाहेर ऊन मी म्हणत होतं,' अशी सुरुवात करणाऱ्या, धड गद्यही नाही आणि धड पद्यही नाही, अशा लघुकथा लिहिणाऱ्यांची मराठीत फार गर्दी झाली आहे. शरीरानं, मनानं आणि बुद्धीनंही निष्क्रिय अशा वर्गाचं हे द्योतक आहे,' असे जेव्हा नेमाडे म्हणतात त्या वेळी त्यांच्या म्हणण्यावर गुंतागुंत, निरगाठ व उकल या तंत्रातून घडलेल्या फडके यांच्या कथेची फलश्रुती न्याहाळायला हवी होती.

नेमाडे यांचे लघुकथेसंदर्भात असलेले हे मत काही निर्णायक नव्हे, कारण खांडेकर

अंडरग्रॅज्युएट शैलीकार, तर फडके हे पोस्ट ग्रॅजुएट शैलीकार म्हणणारे नेमाडे एका बाजूने लघुकथेला हिणकस ठरवितात. मग डॉ. वडेर यांनी "'यात्रिक' ही कथा वाचल्यानंतर अनुक्रमणिकेत ती चुकून 'कथा' या विभागात आली (तर) नाही ना, असे वाटले... सबंध कथा वाचत असताना... सारखे आपण एक तात्त्विक निबंध वाचत आहो, असे मला तरी जाणवत होते. त्यातील पात्रांना कोठेही स्वतंत्र व्यक्तिमत्त्व आलेले नाही किंवा ती एकूण कलात्मक पातळीवर कोठेही जात नाही. . . जी.ए. कुलकर्णी यांच्या कथालेखनाने अलीकडच्या काळात एक नवे गूढ, तात्त्विक वळण घेतले आहे, त्याचे हे अतिरेकी रूप असावे" (सत्यकथा, सप्टें. १९७५) असे म्हटले आहे. अशा वेळी कथा या चटपटीत असतात व तात्त्विकही असतात, हे कसे स्पष्ट होणार. बरे तर बरे, नेमाडे हे जी.एं.ना एक चांगले कथाकार मानतात. खुद्द जी.ए. काय म्हणतात? ज्या वेळी 'यात्रिक' ही कथा त्यांनी 'सत्यकथे'पाशी पाठविली त्या वेळी त्यांनी संपादकास लिहिले होते–

'सोबत एक लेख पाठवीत आहे. माझ्या पुष्कळशा कथा या कथा आहेत की नाहीत हे मला बहुतेकदा इतरांकडूनच समजले आहे. पण काही वेळा त्यांच्यांत मतभेद असत. सोबतच्या लेखाबद्दल मात्र दुमत संभवत नाही. तो बहुतेक कथा नसावाच.'

अशा पार्श्वभूमीवर फडके यांची कथारचना म्हणजे आशय, आविष्कारपद्धती, रचनाकौशल्य असे म्हणता येईल. त्यांचा टीकाविवेक देशी-विदेशी तत्त्वविचारांवर आधारलेला होता; तो लेखनावेळी जागृत असे डॉ. वडेर सुचवितात.

'फडके यांचा लघुनिबंध' या संदर्भात डॉ. वडेर नको तितके सावध होऊन नोंदी करताना दिसतात. लघुनिबंध हा फडके यांचा विशेष प्रांत. त्यातील रसिक व रसशोधक जीवनदृष्टीचा मनोहर प्रत्यय वाचक घेत असतो. त्यामागे तांत्रिक सफाई व डौलदार भाषाशैली असते, हे विसरता येणार नाही. डॉ. वडेर मात्र त्यांचा रस प्राशन करू शकले नाहीत. उलट त्यातील वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व शोधत राहिले. कदाचित लघुनिबंधाच्या संदर्भात जे काही कटू वाद निर्माण झाले, त्या वादातील संबंधित अद्यापि हयात आहेत. त्यामुळे सावध नोंदी करण्याचा पवित्रा डॉ. वडेर यांनी घेतला असेल. अन्यथा तात्त्विक व वस्तुनिष्ठ निष्कर्ष काढण्याचा प्रयत्न निश्चितच झाला असता, यात संशय नाही.

फडके यांनी गुजगोष्टी लिहून एक प्रकारे मराठी साहित्यास फार मोठी देणगी दिली आहे. अर्थात त्यापेक्षा वेगळा प्रयत्न वि. स. खांडेकर यांनी 'वैनतेय'मधून केला होता, हे नोंद करण्यासारखेच होते. या संदर्भात केवळ मतभेद आहेत, असे डॉ. वडेर म्हणतात व त्या वादातून मराठी साहित्यात लघुनिबंधाच्या जनकत्वाचे स्थान फडके यांना जरी मिळत नसले, तरी या वाङ्मयरूपकाचे पालकत्व फडके यांनी स्वीकारले, असे सावधपणे लिहून जातात. शिवाय डॉ. आनंद यादव यांच्या संदर्भात पुरेसे स्पष्टीकरण मिळत नाही. जरी असे असले

तरी फडके यांच्या लघुनिबंधाचा स्तर मात्र ठरवून टाकतात, तेही 'अप्रत्यक्षपणे. रिचर्ड किंगसारख्या विशेष महत्त्वपूर्ण नसलेल्या लेखकाचा कित्ता फडके यांनी गिरविल्याबद्दल डॉ.वडेर खंत व्यक्त करतात. शिवाय तो लघुनिबंधात्मक आविष्कार मोकळा वाटत नाही, त्यामुळे कृत्रिमताच येते, अनुभवाची उथळ वृत्ती, चमत्कृतीचा हव्यास जाणवल्याचे नोंदून ठेवतात.

फडके यांनी 'रुमझूम' हा आपल्या कवितांचा संग्रह प्रकाशित केला होता. त्यांची वृत्तबद्ध काव्यरचनेवर पकड होती. 'प्रतिभासाधन' हाती असूनही रसरशीतपणा त्या काव्यात आणता आलेला नव्हता. याचे कारण म्हणजे फडके यांना मुळातच नावड असावी. आणि कविताक्षेत्रातील तत्कालीन दिग्गजांच्या सान्निध्यात राहण्यात त्यांनी रसही दाखविला नव्हता.

जसे कवितांबाबत तसे नाट्यलेखनाबाबत फारसा चमकदार प्रयत्न फडके यांनी केलेला दिसत नाही. १९३१ ते १९५० या वीस वर्षांत त्यांची युगांतर, संजीवन, तोतया नाटककार, काळेगोरे व जानकी, जडावाची देवी, आगलावी, क्षमेसाठी अपराध, बाईसाठी बुवा अशा नाट्यरचना आढळतात. परंतु यांमुळे त्यांचे स्थान वैशिष्ट्यपूर्ण आहे, असे समीक्षक व इतिहासकार यांना वाटलेले दिसत नाही.

चरित्रलेखनातही फारसे वेगळे प्रयत्न फडके यांनी केले, असे दिसत नाही. दादाभाई नौरोजी, बाळ गंगाधर टिळक, मोहनदास करमचंद गांधी, कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर यांच्यावर चरित्रात्मक निबंध वा प्रबंध लिहिलेले दिसतात. कदाचित चरित्र आणि आत्मचरित्र यांमध्ये विशेष रस त्यांना नसावा. आत्मचरित्र लिहिणाऱ्याच्या वाट्याला शिव्या येतात, असे गृहित धरल्याने 'माझं जीवन : एक कादंबरी'त आत्मदर्शन पुरेसे सावध राहूनच केलेले दिसते. जीवनातल्या अंतरंगात इतरांनी डोकावू नये, असाच प्रयत्न करताना फडके दिसतात. त्यामुळे त्यांनी स्वतःचे मूल्यमापन करण्याचा व इतरांनी त्यांच्याकडून तसे अपेक्षिण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही.

डॉ. वडेर यांनी प्रास्ताविकात म्हटले आहे, 'टीका, कादंबरी, लघुकथा व लघुनिबंध या प्रकरणांचे नव्याने पुनर्लेखन करून सादर करताना मुळातील फडके यांची नाटके, चरित्रे, आत्मचरित्रे व कविता हे विभाग पृष्ठसंख्येच्या मर्यादेमुळे व फडके यांच्या साहित्यातील त्यांचे दुय्यम स्थान लक्षात घेऊन वगळले आहेत. फडक्यांचे इंग्रजी आणि क्रिकेट व संगीत यांवरील लेखनाचाही मुळातच समावेश केलेला नव्हता.' पुढे त्याच प्रास्ताविकात म्हटले आहे की. . . 'त्यांच्या जवळजवळ समग्र ललित व टीकासाहित्याचा परामर्श घेणारा हा पहिलाच ग्रंथ, असे म्हणता येईल.'

अशा दोन विधानांमुळे कोणीही विचारू शकेल ते हे की, जवळजवळ समग्र म्हणजे

नाटके, चरित्रे, आत्मचरित्रे, कविता, इंग्रजी, क्रिकेट, मानसोपचार आणि संगीत, हा एवढा मोठा भाग टाळल्यानंतर जे राहते, ते 'समग्र' का? पण असा प्रश्न विचारण्यापूर्वी प्रश्नकर्त्याने हे विसरता कामा नये ते हे की, पृष्ठसंख्येची मर्यादा लेखकावर प्रकाशकाने घातलेली असते त्यामुळे समग्र साहित्याचा अभ्यास करूनही ते वाचकांपर्यंत पोहोचलेले नाही, एवढेच काय ते! एखाद्या अभ्यासकाला तो समग्र अभ्यास हवा असल्यास मुंबई विद्यापीठात त्या लेखकाच्या मूळ प्रबंधात्मक प्रतीची चौकशी करता येईल. वरील प्रकरणातील अचर्चित विभाग डॉ. वडेर यांनी परामर्श घेतलेला असणे अगदी शक्य आहे.

एकूण या ग्रंथात असा अभ्यास दिसतो. ना.सी. फडके यांचे वाङ्मयीन माहात्म्य वा दैवतीकरण करण्याचा प्रयत्न नसल्याने डॉ. वडेर यांनी सांगोपांग चर्चा करीत असताना फडके यांच्या साहित्यातील अपूर्णता, विरोधाभास, वैगुण्य, सिद्धांतविसंगती, आत्मश्लाघा याकडे पाहण्याची निर्लेप अभ्यासकाची भूमिका घेतलेली आहे, ती नैसर्गिक वाटते. फडके यांच्या तंत्रपद्धतीची ओळख, कुतुहल, कल्पनारम्य वास्तवता, पाश्चात्य साहित्याचा अनुकार· करण्याचा प्रयत्न डॉ. वडेर यांनी उलगडून दाखविला आहे. आपल्या पीएच.डी.च्या अभ्यासासाठी घेतलेल्या समग्र साहित्याचे परिशीलन करताना, 'फडके यांचा अतिरिक्त गुणगौरव करून त्यांना पाश्चात्य लेखकांपेक्षा श्रेष्ठ ठरविण्याची जशी भाबडी व बालिश भूमिका नाही, तसेच त्यांना श्रेय देण्याची वा श्रेयच्युत करण्याची वा युगप्रवर्तक ठरविण्याची कोणतीच भूमिका गृहित धरून हे लेखन केलेले नाही,' अशी दिलेली ग्वाही पटतेही.

अंदाजे पंधरा वर्षांनंतर पुस्तक प्रकाशित मजकुरात थोडीशी काटछाट करून इतर अप्रकाशित भाग घेता आला असता, असेही काही जण म्हणू शकतील..

आता, या पुस्तकामुळे ना.सी. फडके यांचे एक वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व म्हणून मराठी साहित्यातील स्थान निश्चित होईल काय, फडके यांच्या विपुल वाङ्मयातून मराठी साहित्याला दीर्घकालीन लाभांश प्राप्त होण्यासारखे काही विशेष आहे काय, फडके यांच्या साहित्याकडे डॉ. प्र. बा. वडेर यांच्या या ग्रंथामुळे अभ्यासक खेचला जाऊ शकेल काय, असे प्रश्न काही जणांना पडू शकतील.

पण यापूर्वी अनेक वेळा फडके यांच्या साहित्याचा परिपूर्ण जरी नसला तरी काही प्रमाणात परामर्श घेण्यात आलेला आहे. त्या त्या लेखकांकडे आवश्यक ती वस्तुनिष्ठ टीकादृष्टी नसेलही, पण आस्वादकता तरी होती, आहे. ज्यातून आस्वाद घ्यावा असे अनेक वेळा वाटते, अशा प्रकारचे साहित्य फडके यांनी निर्माण केले आणि त्या प्रकारच्या साहित्याचा प्रथम प्रबंधात्मक अभ्यास व नंतर पुनर्लेखन करून त्याचे ग्रंथप्रकाशन करावे, असे वाटले; यातच फडके यांच्या लेखनाची सुखदायक फलनिष्पत्ती दिसून येते. दरम्यानच्या काळात फडके यांच्या साहित्यावर कवयित्री इंदिरा संत व डॉ. वडेर यांचे



अनुक्रमणिका

पुस्तक दिल्लीची साहित्य अकादमी प्रकाशित करते, यावरूनच फडके यांच्या या 'युगप्रवर्तक' साहित्यिकाचे निश्चित स्थान स्वीकारार्ह आहे, असे मत नोंदवून ठेवावेसे वाटते.

(ना.सी. फडके : एक चिकित्सक अभ्यास – डॉ. प्रल्हाद वडेर, राजहंस वितरण, पृष्ठे २५६, मूल्य, २५० रुपये.)

(मराठी विभागप्रमुख, शासकीय साहित्य, विज्ञान आणि वाणिज्य महाविद्यालय, खांडोळा, मार्शेल, गोवा ४०३१०७)

---

## साभार स्वीकार

**डमरू राक्षस झिंदाबाद–** सूर्यकांत तावडे, गमभन प्रकाशन, पुणे– ३०, पृष्ठे ८०, पंधरा रुपये.

**नवी वाळं–** भास्कर चंदनशिव, अनुपम प्रकाशन केंद्र, औरंगाबाद, पृष्ठे १४९, पंच्याहत्तर रुपये.

**मराठवाडी माणसं–** डॉ. यू. म. पठाण, अनुपम प्रकाशन केंद्र, गुलमंडी चौक, औरंगाबाद, पृष्ठे १२२, साठ रुपये.

**आत्मस्वर–** महावीर जोंधळे, अनुपम प्रकाशन केंद्र, गुलमंडी चौक, औरंगाबाद, पृष्ठे ११९, पस्तीस रुपये.

**गाणारं घर–** महावीर जोंधळे, अनुपम प्रकाशन केंद्र, पृष्ठे ३२, सहा रुपये.

**आयुष्य वेचताना–** फ. मुं. शिंदे, अनुपम प्रकाशन केंद्र, पृष्ठे ६०, तीस रुपये.

**साक्षेप–** भु. द. वाडीकर, अनुपम प्रकाशन केंद्र, पृष्ठे– १२८, साठ रुपये.

**नाल नसलेल्या घोड्याचा मालक–** महावीर जोंधळे, अनुपम प्रकाशन केंद्र, पृष्ठे १००, पस्तीस रुपये.

**दुराव्याचे बंध–** भूषण भन्साळी, चेतश्री प्रकाशन, मुक्ताई, अंमळनेर, पृष्ठे १४८, तीस रुपये.

**अजब दुनिया-अफाट माणसे–** नरेन तांबे, चेतश्री प्रकाशन, मुक्ताई, अंमळनेर, पृष्ठे ७७, पन्नास रुपये.

**ध्रुवपद–** डॉ. सु. श्री. पांढरीपांडे, चेतश्री प्रकाशन, मुक्ताई, अंमळनेर, पृष्ठे १५६, ऐंशी रुपये.

**प्रिय मुली–** दादा धर्माधिकारी, चेतश्री प्रकाशन, मुक्ताई, अंमळनेर, पृष्ठे ५३, पस्तीस रुपये.

**तग–** प्रल्हाद जाधव, चेतश्री प्रकाशन, अंमळनेर, पृष्ठे १००, चाळीस रुपये.



अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे,

## वार्षिक साधारण सभेचे इतिवृत्त

म. सा. परिषदेची या वर्षाची वार्षिक साधारण सभा रविवार दि. २६.७.९२ रोजी सायं. ४.३० वाजता परिषदेच्या माधवराव पटवर्धन सभागृहात बोलावण्यात आली होती. ४.३० वाजता गणसंख्यापूर्ती झाली नसल्याने नियमानुसार १५ मिनिटांसाठी सभा स्थगित ठेवण्यात आली. त्यानंतर सभेचे कामकाज ठीक ४.४५ वाजता सुरू झाले.

कार्याध्यक्ष डॉ. म. वि. गोखले यांनी सभेच्या अध्यक्षपदाबाबत केलेल्या सूचनेस डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांनी अनुमोदन दिल्यानंतर परिषदेच्या अध्यक्ष डॉ. सरोजिनी वाबर यांनी सभेचे अध्यक्षस्थान स्वीकारले.

डॉ. सरोजिनी बाबर यांनी उपस्थितांचे स्वागत केले व परिषदेच्या कार्यात सर्वांनी सहभागी व्हावे असे सभासदांना आवाहन केले.

१. गेल्या वर्षी २८.७.९१ रोजी झालेल्या वार्षिक साधारण सभेनंतरच्या कालावधीतील साहित्य, संस्कृती, शिक्षण इत्यादी क्षेत्रांतील दिवंगतांना सभेने श्रद्धांजली अर्पण केली.

२. दि. २८.७.९१ रोजी झालेल्या वार्षिक साधारण सभेचे वृत्त कार्यवाहांनी वाचून दाखविले व ते कायम करण्यात येऊन मा. अध्यक्षांनी त्यावर स्वाक्षरी केली.

३. १९९१-९२ या वर्षाचे परिषदेचे कार्यवृत्त सभेला सादर करण्यात आले. या कार्यवृत्तासंबंधी श्री. मु. पां. देशपांडे, श्री. रवीन्द्र कुलकर्णी, श्री. रा.व्यं. छत्रपती व डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांनी केलेल्या सूचनांची नोंद करण्यात आली व सभेने कार्यवृत्त संमत केले.

सूचक – डॉ. प्र. चिं. शेजवलकर

अनुमोदक– श्री. कमलाकर किंकर

(परिषदेच्या परीक्षाकार्यासंबंधी समाधान व्यक्त करताना, शुद्धलेखन व हस्ताक्षर या उपक्रमांस चालना मिळावी म्हणून, परिषदेने शुद्धलेखन स्पर्धा व हस्ताक्षर स्पर्धा सुरू करावी व या दोन्ही स्पर्धांसाठी प्रत्येकी ५०० रु. येथून दहा वर्षांसाठी आपण देणगी म्हणून देत राहू, अशी घोषणा श्री. किंकर यांनी या वेळी केली; तिचे सभेने स्वागत केले. ही सूचना पुढील कार्यवाहीसाठी पदाधिकारी समितीकडे पाठविण्यात आली.)

४. कोषाध्यक्ष श्री. ना. गो. जोशी यांनी परिषदेचा १९९१-९२ चा ताळेबंद व उत्पन्न-खर्च पत्रक सभेस सादर केल्यावर त्यासंबंधी श्री. अरविंद नवरे, श्री. किंकर, श्री. मु. पां. देशपांडे इत्यादींनी आपले विचार व्यक्त केले. ताळेबंद व उत्पन्न खर्च पत्रकात अनेक इंग्रजी

शब्द वापरण्यात आले आहेत, त्यांऐवजी मराठी शब्द योजावेत, अशी सूचना अनेक सभासदांनी केली. सभासदांनी केलेल्या सूचना स्वीकारण्यात आल्या व ताळेबंद तसेच उत्पन्न- खर्च पत्रक सभेने संमत केले.

सूचक – श्री. अरविंद नवरे

अनुमोदक – श्री. मु. पां. देशपांडे

५. त्यानंतर १९९२-९३ चा अर्थसंकल्प सभेस सादर करण्यात आला. या अर्थसंकल्पातील विविध तरतुदींसंबंधी श्री. उत्तम कानिटकर, श्री. जवाहर मुथा, श्री. किंकर, श्री. मु. पां. देशपांडे, श्री. माधव नावडीकर, श्री. हेमंत बळकुंद्री इत्यादींनी आपले विचार व्यक्त केले. डॉ. प्र. चिं शेजवलकर यांनी अर्थसंकल्पासंबंधी सविस्तर मतप्रदर्शन करून परिषदेने विविध मार्गांनी उत्पन्न वाढविणे कसे आवश्यक आहे हे स्पष्ट केले. त्यानंतर सभेने अर्थसंकल्प संमत केला.

सूचक – श्री. पां. श्री. घारे

अनुमोदक – श्री. सदानंद बोंगाणे

६. १९९२-९३ या वर्षाकरिता परिषदेचे हिशोबतपासनीस म्हणून मे. पाटणकर असोसिएटस् यांची सभेने नियुक्ती केली.

७. कार्यकारी मंडळाने सुचविलेल्या घटनेतील किरकोळ दुरुस्त्या सभेच्या मंजुरीसाठी कार्यवाह डॉ. गं. ना जोगळेकर यांनी सभेपुढे ठेवल्या. १ ऑक्टोबर १९९१ पासून अमलात आलेल्या परिषदेच्या घटनेत काही ठिकाणी संदिग्धता राहिली आहे, तर काही ठिकाणी विसंगती निर्माण झाली आहे. अशा सर्व ठिकाणांचे स्पष्टीकरण कार्यवाहांनी केल्यानंतर सभेने या दुरुस्त्या स्वीकारल्या व तशी नोंद करण्यात आली. (घटनेतील कोणत्या कलमांच्या बाबत या दुरुस्त्या करण्यात आल्या आहेत याची नोंद पुढे केली आहे.)

७ अ. यानंतर अतिथीगृहासंबंधी कार्यकारी मंडळाने सुचविलेली दुरुस्ती सभेच्या मान्यतेसाठी ठेवण्यात आली. यासंबंधी कार्याध्यक्ष डॉ. म. वि. गोखले, कार्यवाह श्री. रवीन्द्र भट, डॉ. कल्याणी दिवेकर व डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी सविस्तर निवेदन करून अतिथीगृह चालविण्यात येणाऱ्या विविध अडचणी सभेस कथन केल्या.

श्री. जवाहर मुथा, श्री. म. श्री. दीक्षित, श्री. रामदास फुटाणे प्रभृतींनी या चर्चेत भाग घेतला व अतिथीगृहासंबंधी कार्यकारी मंडळाने व्यक्त केलेल्या अडचणी वस्तुस्थितीनिदर्शक असल्याबद्दल आपली सहमती दर्शविली. तथापि 'किरकोळ बदल' म्हणून अतिथीगृहासंबंधी निर्णय घेणे योग्य होणार नाही, त्यामुळे ही दुरुस्ती स्वीकारता येणार नाही असा निर्णय दिला. मात्र घटनेतील तरतुदीनुसार अतिथीगृहासंबंधी वेळोवेळी नियम करण्याचे अधिकार कार्यकारी मंडळास असल्याने अतिथीगृहासंबंधीच्या अडचणी

लक्षात घेऊन कार्यकारी मंडळाने तसे नियम करावेत, असे सभेने सुचविले. या सूचनेसह ही शिफारस कार्यकारी मंडळाकडे योग्य त्या कार्यवाहीसाठी पाठविण्यात आली.

(वार्षिक साधारण सभेच्या या निर्णयास अनुसरून कार्यकारी मंडळाने अतिथीगृहाबद्दलची नियमावली आपल्या पुढील बैठकीत ठराव करून निश्चित केली. ही नियमावली त्यामागील भूमिकेसह परिषदेच्या सभासदांच्या माहितीसाठी या अंकात अन्यत्र देण्यात आली आहे. सभासदांनी या नियमावलीची नोंद घ्यावी.)

सभेच्या अध्यक्ष डॉ. सरोजिनी बाबर यांनी समारोपाचे भाषण करून सर्वांनी केलेल्या सहकार्याबद्दल सभेचे आभार मानले. शेवटी कार्यवाह श्री. रवीन्द्र भट यांनी मा. अध्यक्षांचे व उपस्थितांचे आभार मानल्यावर सभेचे काम समाप्त झाले.

डॉ. गं. ना. जोगळेकर
कार्यवाह

## दि. २६-७-९२ रोजी भरलेल्या म. सा. परिषदेच्या वार्षिक साधारण सभेने केलेल्या घटनेतील दुरुस्त्या–

१. घटना पृ. ६ क्र. ९ यांतील २ मध्ये 'सूचना देऊन' या शब्दांनंतर 'परिषदेच्या कार्यालयात व कार्यालयीन वेळेमध्ये' हे शब्द समाविष्ट करण्यात यावेत.

२. घटना पृ. १९, क्र. २८ आ मधील 'रिकामी झाल्यास' या शब्दांनंतर 'किंवा भरली गेली नसल्यास' हे शब्द समाविष्ट करावेत.

३. घटना पृ. ८, क्र. १२ यांमधील (अ) हे प्रारंभीचे अक्षर वगळावे. 'परिषदेचे कार्यकारी' येथपासून 'एकूण २३' येथपर्यंतचा मजकूर आहे तसाच ठेवावा. त्यानंतरच्या मजकुराची मांडणी पुढे दिल्याप्रमाणे करावी :

कार्यकारी मंडळाच्या निर्वाचित सदस्यांनी आपल्या पहिल्या सभेत क्रमशः पुढीलप्रमाणे कामकाज करावे–

(अ) त्रैवार्षिक निवडणुकीत कोणत्याही कारणाने ज्या जिल्ह्यांना किंवा जिल्हा गटांना कार्यकारी मंडळावर प्रतिनिधित्व मिळाले नसेल अशा जिल्ह्यातील किंवा जिल्हा गटांतील आजीव सदस्यांमधून उपस्थित सदस्यांनी अशा प्रतिनिधींची निवड करून २३ ही संख्या पूर्ण करावी.

(आ) परिषदेच्या कार्यक्षेत्रातील दोन आजीव सदस्यांची कार्यकारी मंडळावर स्वीकृत सदस्य म्हणून निवड करावी.

(इ) परिषदेचे एक अध्यक्ष, तीन उपाध्यक्ष, पुण्यातील दोन कार्यवाह व पुण्याबाहेरील एक कार्यवाह यांची निवड करावी.



अनुक्रमणिका

४.घटना पृ.२४,१३ अ यांतील 'निष्पक्षपातीपणाने' हा शब्द कमी करावा.

५.घटना पृ.२७,परिशिष्ट 'ब' यांमधील 'क'मध्ये 'एक महिन्याच्या आत' ऐवजी 'दोन महिन्यांच्या आत' हा बदल करावा.

(इ) मध्ये 'दहा टक्के' याऐवजी 'पंचवीस टक्के' हा बदल करावा.

६.घटना पृ.२३ यांवरील क्र.११ 'इ' मध्ये 'त्याशिवाय एक सभासद केंद्राने नियुक्त करावा' या वाक्याचे स्पष्टीकरण पुढे दिल्याप्रमाणे राहील :

म.सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळावरील संबंधित जिल्हा किंवा जिल्हा गट यांचा जो प्रतिनिधी असेल तोच या शाखेवर केंद्राचा नियुक्त सभासद राहील.

**कार्यवाह**

---

**साभार स्वीकार**

**कर्मयोगिनी**– सौ. विजया जहागीरदार, चेतश्री प्रकाशन, अंमळनेर, पृष्ठे ३८७, दोनशे रुपये.

**इब्सेन**– अनिरुद्ध कुलकर्णी, कॉंटिनेंटल प्रकाशन, विजयानगर, पुणे– ३०, पृष्ठे ४६३, नव्वद रुपये.

**प्रिय आईस**– वसंत कानेटकर,पॉप्युलर प्रकाशन,मुंबई,पृष्ठे ६२,पन्नास रुपये.

**असे वृक्ष असे देव**– शा.प्र.दीक्षित,कॉंटिनेंटल प्रकाशन,पुणे ३०,पृष्ठे ११८,पंचवीस रुपये.

**दिल्ली ते मॉस्को**– दंगल झाल्टे,दवबिंदू प्रकाशन, अरुण नासिककर,शरणपूर,नाशिक– २, पृष्ठे १०२,बत्तीस रुपये.

**गाणे गुलमोहराचे**– अतुल पेठे,सुगावा प्रकाशन,८६१/१,सदाशिव पेठ,पुणे– ३०,पृष्ठे ३७,आठ रुपये.

**मराठी लोककथा**– संपादक, मधुकर वाकोडे, साहित्य अकादमी रवींद्र भवन, ३५, फिरोजशहा रोड,न्यू दिल्ली– १,पृष्ठे १२१,पासष्ट रुपये.

**अन्वय**– अश्विनी धोंगडे,दिलीपराज प्रकाशन,पृष्ठे ५६,बत्तीस रुपये.

**ग्रामीण कथा : स्वरूप आणि विकास**– डॉ. वासुदेव मुलाटे, साहित्य सेवा प्रकाशन, औरंगाबाद,पृष्ठे २८१,एकशे दहा रुपये.

**घाटाखालची माणसं**– डॉ. दिनकर गायकवाड, व्होग पब्लिकेशन, R-३४४, आदिनाथ सोसायटी,पुणे ३७,पृष्ठे १२०,साठ रुपये.

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

## अतिथी-गृहासंबंधी निवेदन

म.सा.पत्रिकेच्या या अंकात सर्व सभासदांच्या माहितीसाठी कार्यकारी मंडळाने अतिथीगृहासंबंधी केलेली नियमावली प्रसिद्ध करण्यात येत आहे. यासंबंधी आवश्यक ते निवेदन येथे करीत आहोत.

१. १९६४ साली कै. काकासाहेब गाडगीळ यांच्या पुढाकाराने दिल्ली महाराष्ट्रीय समाजाच्या देणगीतून, परिषदेच्या सध्याच्या अतिथीगृहाच्या ४ खोल्या बांधण्यात आल्या. कलकत्ता, दिल्ली, मद्रास इत्यादी ठिकाणी असलेल्या महाराष्ट्र मंडळांच्या अतिथीनिवासात ज्याप्रमाणे महाराष्ट्रातून जाणाऱ्या मराठी माणसांची राहण्याची व्यवस्था केली जात असते, त्याप्रमाणे महाराष्ट्राबाहेरून पुण्यात काही कामानिमित्त येणाऱ्या मराठी माणसांच्या निवासाची सोय व्हावी, या हेतूने दिल्ली महाराष्ट्रीय समाजाने ही देणगी दिली होती.

२. व्याख्याने, चर्चा इ. परिषदेच्या कार्यक्रमांसाठी महाराष्ट्राच्या विविध भागांतून वक्त्यांना आमंत्रित केले जाते. अतिथीगृह अस्तित्वात नव्हते, तेव्हा अशा निमंत्रितांच्या निवासाची व्यवस्था अन्यत्र करावी लागत असे. अशा व्यक्तींची परिषदेच्या अतिथीनिवासात सोय करावी व त्यांचे श्रम वाचवावेत, असाही हे अतिथीगृह बांधण्यामागे उद्देश होता आणि हीच स्थिती प्रारंभी अनेक वर्षे होती.

३. परिषदेच्या कार्यकारी मंडळावर मुंबई, विदर्भ, मराठवाडा अशा परिषदेच्या कार्यक्षेत्राबाहेरील सभासदही बरीच वर्षे निवडले जात असत. अशा सभासदांच्या निवासाची व्यवस्थाही अतिथीनिवासात करण्यात येत असे. अ.भा. मराठी साहित्य महामंडळाचे कार्यालय बरीच वर्षे पुण्यात असल्याने महामंडळ सभासदांच्या निवासाची व्यनस्थाही अतिथीनिवासात केली जात असे.

४. कालांतराने, पुण्याबाहेरचे लेखक साहित्यिक कारणांसाठी पुण्यात आले व त्यांनी या अतिथीनिवासात राहण्याची इच्छा व्यक्त केल्यास व त्या वेळी जागा उपलब्ध असल्यास अशा लेखकांची अतिथीनिवासात सोय करण्यात येऊ लागली. अशा लेखकांकडून नाममात्र देणगीशुल्क घेतले जात असे. असे लेखक मूलतः परिषदेचे सदस्य असले पाहिजेत, असे बंधन होते.

५. अतिथीनिवास अस्तित्वात आले त्या वेळी महाराष्ट्रातील व महाराष्ट्राबाहेरील मिळून परिषदेची सभासदसंख्या ८०० होती. गेल्या १०-१५ वर्षांत परिषदेच्या

सभासदसंख्येत लक्षणीय वाढ झाली. आज परिषदेच्या पुण्याबाहेरील सदस्यांची संख्या सुमारे २००० एवढी आहे. असे सदस्य व्यक्तिगत, संस्थात्मक व विद्यापीठीय इ. कारणांसाठी अनेकदा पुण्यास येत असतात. सतत वर्षभर कोणत्या ना कोणत्या सभासदांकडून अतिथीगृहाचा वापर होत राहिल्यामुळे अतिथीगृहाची देखभाल करणे व आवश्यक त्या सुविधा पुरविणे, हेच अलीकडे परिषदेच्या कार्यालयाचे मुख्य काम होऊन बसले आहे. अशा अनेक सभासदांनी येणार असल्याची पुरेशी आधी कल्पनाही दिलेली नसते. त्यामुळे वारंवार उभयपक्षी अडचणीची परिस्थिती निर्माण होते. सभासद त्यांच्या सोयीनुसार केव्हाही येत व जात असल्यामुळे त्यांच्यासाठी चोवीस तास अतिथीगृह सेवा देण्याची गरज निर्माण होते. चार खोल्यांचे अतिथीगृह चालविणे हे परिषदेचे मुख्य कार्य होऊ शकत नाही. तसेच आर्थिकदृष्ट्याही ते परवडणे शक्य नाही.

६. अशा परिस्थितीत घटनेतील तरतुदीप्रमाणे आवश्यक ते नियम करून त्यांची काटेकोर अंमलबजावणी करणे अनिवार्य झाले आहे. मुंबई मराठी साहित्य संघाकडे अशा एकमेव खोलीत साहित्य संघाच्या नाट्यकलावंतांची कारणपरत्वे सोय केली जाते. विदर्भ साहित्य संघाच्या चार खोल्यांच्या अतिथीगृहातही फक्त निमंत्रितांनाच राहता येते. परिषदेचे सभासद ही सर्व परिस्थिती समजून घेऊन सहकार्य करतील अशी अपेक्षा आहे.

**कार्यवाह**

**कार्यकारी मंडळाचा ठराव क्रमांक १/४-८-१९९२**

म.सा.परिषदेच्या अतिथीगृहाच्या संदर्भात पुढीलप्रमाणे नियमावली करण्यात येत असून, या नियमांची अंमलबजावणी दिनांक १-९-१९९२ पासून करण्यात येत आहे. (घटनेतील नियम क्रमांक ९ मधील ३ नुसार अतिथीगृहाच्या संदर्भात वेळोवेळी नियम करण्याचे अधिकार कार्यकारी मंडळाकडे सोपविण्यात आले आहेत.)

**नियम**

१. म.सा.परिषदेच्या अतिथीगृहाचा लाभ म.सा.परिषदेच्या पुण्याबाहेरील कार्यकारी मंडळाच्या सभासदांना ते परिषदेच्या कामासाठी आले असताना घेता येईल.

२. म.सा.परिषदेच्या पुण्याबाहेरील विश्वस्तांना/ अध्यक्षांना/उपाध्यक्षांना, ते परिषदेच्या कामासाठी आले असताना अतिथीगृहाचा लाभ घेता येईल.

३. म.सा.परिषदेच्या विविध उपसमित्यांच्या पुण्याबाहेरील सदस्यांना, त्यांना परिषदेच्या कामासाठी निमंत्रित केले असताना, अतिथीगृहाचा लाभ घेता येईल.

४. म.सा.परिषदेच्या पुण्याबाहेरील विविध शाखांच्या पदाधिकाऱ्यांना व शाखांच्या

कार्यकारी मंडळाच्या सभासदांना ते परिषदेच्या वा संबंधित शाखेच्या कामासाठी आले असताना अतिथीगृहाचा लाभ घेता येईल.

५. परिषदेने व्याख्याने, चर्चा, परिसंवाद, कविसंमेलन इत्यादी कार्यक्रमांसाठी पुण्यावाहेरील निमंत्रित केलेल्या व्यक्तींना अतिथीगृहाचा लाभ घेता येईल.

६. म.सा.परिषदेच्या वार्षिक साधारण किंवा विशेष साधारण सभांना उपस्थित राहणाऱ्या पुण्याबाहेरील सदस्यांना त्यांनी किमान ८ दिवसांची पूर्वसूचना दिल्यास व जागा उपलब्ध असल्यास अतिथीगृहाचा लाभ घेता येईल.

७. अ.भा. मराठी साहित्य महामंडळाच्या पुण्याबाहेरील सदस्यांना ते महामंडळाच्या कामासाठी आले असताना अतिथीगृहाचा लाभ घेता येईल.

८. परिषदेने निमंत्रित केलेले पुण्याबाहेरील शासकीय अधिकारी वा विविध महामंडळांचे पदाधिकारी यांना अतिथीगृहाचा लाभ घेता येईल.

९. वरील १ ते ८ क्रमांकामधील व्यक्तींना एका वेळी तीन दिवसांपर्यंतच अतिथीगृहाचा लाभ घेता येईल.

१०. अपवादात्मक परिस्थितीत वरील क्रमांक ९ मध्ये सवलत देण्याचा अधिकार परिषदेच्या पदाधिकाऱ्यांना राहील.

११. अतिथीगृहातील विविध सोयी-सुविधांचा वापर करण्यासंबंधी अतिथीगृहात तपशीलवार सूचना लावण्यात आल्या आहेत. त्यांचे काटेकोर पालन करणे वरील सर्व प्रकारच्या व्यक्तींना बंधनकारक राहील.

१२. हे नवीन नियम अमलात येताच यापूर्वी केलेले अतिथीगृहासंबंधीचे नियम रद्द समजण्यात येतील.

□

---

**साभार स्वीकार**

**दलित साहित्य : दिशा आणि दिशांतर**– दत्ता भगत, अभय प्रकाशन, ११२, नंदादीप विवेक नगर, नांदेड– ४३१६०१, पृष्ठे १५३, साठ रुपये.

**मी तो हमाल**– आप्पा कोरपे, मोरया प्रकाशन, डोंबिवली, (प.) पृष्ठे १३६, साठ रुपये.

**खुर्ची : एक अत्याधुनिक देवता**– डॉ. शं. पां. पाध्ये, मोरया प्रकाशन, संपदा नगरपालिका दवाखान्याजवळ डोंबिवली, (प.) पृष्ठे ८४, पंचवीस रुपये.

**काव्यचंद्रिका बहिणाबाई चौधरी**– शांता वि. परांजपे, मोरया प्रकाशन, संपदा नगरपालिका दवाखान्याजवळ, डोंबिवली (प.) पृष्ठे ८४, तीस रुपये.

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

## कार्यवृत्त : जुलै-ऑगस्ट १९९२.

७ जुलै — **कै. र. वा. दिघे, स्मृतिदिन**

वक्त्या : डॉ. नीलिमा गुंडी

विषय : 'पाणकळा'च्या निमित्ताने.

'पाणकळा' या पन्नास वर्षांपूर्वीच्या कादंबरीकडे सद्यस्थितीच्या संदर्भात पाहताना त्यातील सनातन विचार आजही मानवी जीवनाला मार्गदर्शक कसे ठरू शकतात, हे डॉ. नीलिमा गुंडी यांनी आपल्या व्याख्यानात दाखवून दिले.

८ जुलै — **शोकसभा**

डॉ. स. गं. मालशे,

श्री. शिवाजीराव भावे आणि

डॉ. वसंत वऱ्हाडपांडे

या थोर साहित्यिकांच्या दुःखद निधनानिमित्त शोकसभा आयोजित करण्यात आली होती. या मान्यवरांना श्री. श्रीपाद जोशी, डॉ. हेमंत इनामदार, श्री. सविता भावे आणि श्री. श्री. म. जोशी यांनी आदरांजली वाहिली. डॉ. म. वि. गोखले यांनी प्रास्ताविक केले आणि सभेच्या अखेर या दिवंगतांना श्रद्धांजली वाहणारे ठराव वाचून दाखविले.

दि. २० जुलै — **वा. म. जोशी स्मृतिदिन**

वक्त्या : डॉ. अंजली सोमण.

विषय : वामन मल्हार जोशी यांच्या साहित्यातील स्त्री.

ज्येष्ठ साहित्यिक वा. म. जोशी यांना परिषदेतर्फे प्रारंभी कार्यवाह रवींद्र भट यांनी आदरांजली वाहिली. डॉ. अंजली सोमण यांनी नव्या स्त्रीचा उद्गार व्यक्त करणारे कादंबरीकार असा वा. म. जोशी यांचा गौरव केला. त्या निमित्ताने स्त्री जाणिवेच्या विकासाचा विचार वा. म. जोशी यांच्या साहित्यात कसा मांडला गेला, याची त्यांनी मूलभूत चर्चा केली.

**धुळे**

नवीन घटनेप्रमाणे, धुळे जिल्हा शाखेची सर्वसाधारण सभा दि. २८ जून ९२ रोजी परिषदेचे ज्येष्ठ सदस्य श्री. सदाशिवराव माळी यांच्या अध्यक्षतेखाली घेण्यात आली.

त्यात पुढील तीन वर्षांसाठी एकमताने खालीलप्रमाणे कार्यकारी मंडळ निवडण्यात आले.

**कार्याध्यक्ष** : श्री. डी. बी. जगतपुरिया.

**कोषाध्यक्ष** : प्रा. पुं. म. चित्रे

**प्रमुख कार्यवाह** : प्रा. सौ. उषा पाटील.

**कार्यवाह** : प्रा. सौ. भाग्यरेखा जोशी.

**कार्यकारिणी सदस्य** : सर्वश्री के. के. सोनार, एस. बी. रावळे, सुधाकर रनाळकर, वसंतराव वानखेडे, प्रा. कैलास सार्वेकर, (नवापूर) प्रा. विश्वासराव मराठे, प्रा. दिलीप कुलकर्णी (नंदुरबार), प्रा. सौ. लीला देवरे, प्रा. डॉ. सलीम अन्सारी.

नवनिर्वाचित कार्यकारी मंडळाने एकमताने पुढील पदाधिकाऱ्यांची निवड केली.

**अध्यक्ष** : प्रा. पुरुषोत्तम पाटील.

**उपाध्यक्ष (१)** : प्रा. सदाशिवराव माळी.

**उपाध्यक्ष (२)** : प्रा. अनिल सोनार.

**स्वीकृत सदस्य** : प्रा. सौ. राजश्री शेलकर.

सदर सभेस निर्वाचन अधिकारी म्हणून प्राचार्य जे.जी. खैरनार उपस्थित होते. केंद्रीय परिषदेचे प्रतिनिधी म्हणून धुळे जिल्हा म.सा.प. प्रतिनिधी तथा कार्यवाह प्रा. भगवान ठाकूर उपस्थित होते.

डी. बी. जगतपुरिया

**कल्याण**

महाराष्ट्र साहित्य परिषद, कल्याण शाखेची सर्वसाधारण सभा दि. ३१ मे ९२ रोजी दुपारी ४ वाजता अभिनव विद्यामंदिर, कै. रामभाऊ म्हाळगी सभागृह (टिळक चौक) येथे शाखेचे अध्यक्ष श्री. द. य. केळकर यांच्या अध्यक्षतेखाली भरली होती.

म.सा.प. कल्याण शाखेचे कार्यवाह श्री. भालचंद्र रेडे यांनी प्रथम सूचनापत्राचे वाचन केले व नंतर मागील सभेचा वृत्तांत सभेपुढे वाचला. तो एकमताने मंजूर झाला.

परिषदेच्या स्थापनेपासून म्हणजे २९-४-९० ते ३१-३-९२ पर्यंतच्या कार्याचा अहवाल सभेपुढे सादर केला. त्यात दोन दुरुस्त्या सभेने सुचवून तो एकमताने मंजूर झाला.

म.सा.प. कल्याण शाखेचे कोपाध्यक्ष श्री. बाळकृष्ण विरारी यांनी ३१ मार्च ९२ पर्यंतचा जमाखर्च, ताळेबंद व पुढील वर्षाचे अंदाजपत्रक सभेपुढे ठेवले. या सर्वांस सर्वसाधारण सभेने मंजुरी दिली. तसेच श्री. एम.डी. बापट आणि कंपनी यांची हिशोब तपासनीस म्हणून पुढील वर्षासाठी नेमणूक केली.

म.सा.प. कल्याण शाखेचे कार्याध्यक्ष श्री. प्र. अ. संत यांनी ध्येय,धोरणे व कार्यक्रम यासंबंधी विचार मांडले. त्यावर सभासदांनी अनेक उपयुक्त सूचना केल्या.

म.सा.प. कल्याण शाखेने निवडणुकीसाठी श्री. कृ. ना. वैद्य यांची निवडणूक अधिकारी म्हणून नेमणूक केली होती. जेवढ्या कार्यकारिणीच्या जागा तेवढेच अर्ज आल्यामुळे ते सर्व बिनविरोध निवडून आले.

**अध्यक्ष :** श्री. प्र. अ. संत

**उपाध्यक्ष :** श्री. द. य. केळकर

**उपाध्यक्ष :** श्री. क.ह. देशपांडे

**कार्याध्यक्ष :** श्री. भालचंद्र रेडे

**कोषाध्यक्ष :** श्री. विजय चिपळूणकर

**कार्यवाह :** श्री. अनंत जोशी

**सहकार्यवाह :** डॉ. गिरीश लटके

**सदस्य :** सर्वश्री योगेश विजय जोशी, श्री. कृष्णाजी अ. जोगळेकर, श्री. पद्माकर कुलकर्णी, श्री. माधव डोळे, श्री. सतीश बापट, श्री. दिलीप म. बंगाली, श्री. यशवंत वैद्य, श्री. प्रवीण श्रीराम देशमुख, सौ. जयश्री विजय दीक्षित, श्री. सदानंद फणसे, प्रा. भगवान भोईर

प्रा. अनंत मा. जोशी.

**अहमदनगर**

७ एप्रिल १९९२ रोजी कार्यकारिणी सदस्यांची बैठक होऊन त्यात १० मे १९९२ रोजी नव्या कार्यकारिणी व पदाधिकाऱ्यांच्या निवडीसाठी विशेष सर्वसाधारण सभा घेण्याचे ठरले.

त्यानुसार १० मे रोजी केंद्रीय कार्यकारिणीचे सदस्य डॉ. सु. प्र. कुलकर्णी यांच्या उपस्थितीत व श्री. भास्करराव जाधव यांच्या अध्यक्षतेखाली सभा भरली.

सभेच्या प्रारंभी पुढील दिवंगत साहित्यिकांना आणि नामवंत व्यक्तींना श्रद्धांजली अर्पण करण्यात आली.

कै. रणजित देसाई, डॉ. शरद्चंद्र चिरमुले, कै. द.ग. गोडसे, डॉ. वि. कृ. गोकाक,



अनुक्रमणिका

भारतरत्न व ऑस्कर विजेते सत्यजित रे, आचार्य श्री. आनंदऋषीजी महाराज, मोतीलालजी फिरोदिया, सुप्रसिद्ध गायक कुमार गंधर्व.

तद्नंतर सर्वसाधारण सभेच्या सूचनापत्राचे वाचन करण्यात आले. मसुदा क्र. ४ मध्ये 'मा. अध्यक्षांचा' ऐवजी 'कार्यकारिणीने मंजूर केलेला अहवाल' अशी अध्यक्षांच्या ऐनवेळेच्या आदेशान्वये दुरुस्ती करण्यात आली.

मागील सभेचे इतिवृत्त वाचून दाखविण्यात आले.

कार्यकारिणीत मंजूर झालेला अहवाल वाचून दाखविण्यात आला.

मागील वर्षाच्या जमाखर्चाचे पत्रक मंजूर करण्यात आले.

पुढील वर्षाचे अंदाजपत्रक सादर करण्यात आले.

पुढील वर्षासाठी अंतर्गत तपासणीसाठी नियुक्ती करण्यात आली.

श्री. अर्जुनराव सदाफुले, आचार्य संबोधी महाविद्यालय, अहमदनगर यांची कार्याध्यक्षपदी बिनविरोध निवड करण्यात आली.

प्रा. मेधा काळे यांची कोषाध्यक्षपदी बिनविरोध निवड करण्यात आली.

१९९२ ते ९५ साठी कार्यकारी मंडळावर घटनेप्रमाणे ११ सदस्यांची निवड करण्यात आली.

नवनिर्वाचित कार्यकारिणीची पहिली सभा प्रा. डॉ. सु. प्र. कुलकर्णी यांच्या उपस्थितीत दि. १६ मे ९२ रोजी सायंकाळी ६ वाजता संबोधी महाविद्यालयात होऊन त्यात पुढील ठराव संमत करण्यात आले.

१. मागील कार्यकारिणी सभेचे इतिवृत्त, कार्यवाह चंद्रकांत पालवे यांनी वाचून ते मंजूर करण्यात आले.

२. नवनिर्वाचित कार्यकारीमध्ये एक स्वीकृत सदस्य निवडणे.

श्री. डी. एम. कांबळे यांची स्वीकृत सदस्य म्हणून निवड करण्यात आली.

३. नवनिर्वाचित कार्यकारिणीत एक केंद्रीय सदस्य स्वीकृत करून केंद्र कचेरीस कळविणे.

४. प्रा. डॉ. सु. प्र. कुलकर्णी यांची वरील जागेसाठी बिनविरोध निवड करण्यात आली.

कार्यकारी मंडळावर पुढील व्यक्तींची बिनविरोध निवड करण्यात आली:

प्रा. जवाहर मुथा, चंद्रकांत पालवे, राजाभाऊ भोंजाळ, टी. एन. परदेशी, प्रा. सुधाकर कुऱ्हाडे, जनुभाऊ काणे, प्राचार्य. ब.सो. सोळंकी, अॅड. सुषमा जाधव, प्रा. स. वा. मुळे, श्री. रामचंद्र धर्माधिकारी, डॉ. सौ. क्रांतिकला अनभुले.

ह्या निवडीनंतर विभागीय संमेलन, नगर येथे घेण्याचा ठराव करण्यात येऊन तसे निमंत्रण देण्याचे ठरले.



अनुक्रमणिका

**श्री. चंद्रकांत पालवे** यांची कार्यवाहपदी, तर **श्री. गा. सुधाकर कुऱ्हाडे** यांची सहकार्यवाहपदी बिनविरोध निवड करण्यात आली.

कार्यकारिणी सभेत नगरशाखेचा अध्यक्ष निवडणे. सभेत **प्रा. जवाहर मुथा** यांची बिनविरोध निवड करण्यात आली.

प्रा. जवाहर मुथा यांच्या अध्यक्षपदामुळे रिक्त झालेल्या जागेवर **सौ. सुजाता महाजन** यांची बिनविरोध निवड करण्यात आली.

**श्री. मामासाहेब वडझीरकर** आणि **श्री. अरुण शेवते** या दोघांची उपाध्यक्ष म्हणून बिनविरोध निवड करण्यात आली.

विविध उपसमित्यांची निवड पुढीलप्रमाणे करण्यात आली.

**कार्यक्रम समिती :** श्री. चंद्रकांत पालवे.

**परीक्षा समिती :** प्रा. ब. सो. सोळंकी.

**वार्षिक नियोजन समिती :** श्री. टी. एन. परदेशी.

**इतर :** प्रा. खाजेकर, प्रा. शिंदे, वसंत दिवाणे.

ऐनवेळचे विषय म्हणून मागील अध्यक्ष यांचे आभार मानण्यात आले. तसेच जिल्ह्यातील मागील वर्षाचे राज्यपुरस्कार व म.सा.प. पुरस्कार विजेत्या साहित्यिकांचा मानचिन्ह देऊन गौरव करण्याचे ठरले.

नव्या कार्यकारिणीने आयोजित केलेला पहिला कार्यक्रम २५ जून रोजी पुरस्कारप्राप्त साहित्यिकांच्या सत्कारसमारंभाने साजरा झाला. ह्या प्रसंगी ज्येष्ठ साहित्यिक श्री. वि. स. वाळिंबे यांना प्रमुख पाहुणे म्हणून बोलावले होते. ह्या प्रसंगी 'दुःशासनपर्व'चे लेखक श्री. ॲड. माणिकराव पाटील (म.सा.प. लोकहितवादी पुरस्कार प्राप्त), प्रा. पोपट सातपुते, प्रा. रंगनाथ पठारे, श्री. अरुण शेवते, श्रीमती मालती देशपांडे, प्रा. वासुदेव मुलाटे ह्या राज्यपुरस्कार प्राप्त साहित्यिकांचा मानचिन्ह व श्रीफल श्री. वि.स. वाळिंबे यांचे हस्ते देऊन सत्कार करण्यात आला. अध्यक्षस्थानी म.सा.प. शाखा नगरचे अध्यक्ष प्रा. जवाहर मुथा होते. कार्याध्यक्ष श्री. अर्जुनराव सदाफुले यांनी प्रास्ताविक केल्यानंतर, कार्यवाह श्री. चंद्रकांत पालवे यांनी श्री. वि. स. वाळिंबे यांचा यथोचित परिचय करून दिला. तसेच पुरस्कारप्राप्त साहित्यिकांबद्दल माहिती दिली.

आपल्या प्रमुख भाषणात श्री. वि.स. वाळिंबे यांनी नगर शाखेने आयोजित केलेल्या सौहार्दपूर्ण समारंभाबद्दल धन्यता व्यक्त केली. साहित्यिकाचे सामाजिक भान आणि त्याचे साहित्य यांच्या अतूट संबंधाबद्दल त्यांनी विचार व्यक्त केले. नगर शाखेतर्फे त्यांचा आणि सौ. वाळिंबे यांचा शाल, श्रीफल देऊन अध्यक्ष प्रा. जवाहर मुथा यांच्या हस्ते सत्कार करण्यात आला.

**दि. २२ जुलै** **कै. ग. ल. ठोकळ स्मृतिदिन**

वैजापूर येथील श्री. उत्तम बावस्कर यांच्या 'बुजगावनं' या कथासंग्रहाला कै. ग. ल. ठोकळ पुरस्कार देण्याचा समारंभ परिषदेच्या सभागृहात पार पडला. अध्यक्षस्थानी डॉ. आनंद यादव होते. डॉ. कल्याणी दिवेकर यांनी प्रास्ताविक केले. त्यानंतर श्री. उत्तम बावस्कर यांना अध्यक्षांच्या हस्ते पारितोषिक प्रदान करण्यात आले. परीक्षकांच्या तर्फे प्रा. विजय कसवेकर यांनी मनोगत व्यक्त केले. डॉ. आनंद यादव यांनी ग्रामीण साहित्याच्या चळवळीत तात्त्विक अधिष्ठान आहे काय, या विषयावर आपले विचार व्यक्त केले.

**दि. ३० जुलै** **संत सावता माळी पुण्यतिथी (१)**

वक्ते : डॉ. अशोक कामत

विषय : संत साहित्यावरील आक्षेप.

प्रारंभी कार्यवाह श्री. रवींद्र भट यांनी प्रास्ताविक केले. आजच्या वेगवान ऐहिक जीवनात संतांचे विचार कालबाह्य आहेत, असे म्हणण्याऱ्या लोकांना मूळ संतसाहित्य वाचले आहे काय, असा त्यांनी प्रश्न केला. संतांनी भक्तिकाव्य निर्माण केले, संत परंपरा हे बहुजनांचे आंदोलन आहे, उदार विचार, उत्कट आचार आणि त्यातून निर्माण झालेले आंदोलन हीच ज्ञानप्रसाराची त्रिसूत्री आहे, असे डॉ. कामत यांनी प्रतिपादन केले.

**३१ जुलै** **संत सावतामाळी पुण्यतिथी (२)**

वक्त्या : डॉ. अंजली कान्हेरे

विषय : संत साहित्यातील स्त्री.

अनेक संतांच्या साहित्यातील स्त्रीजीवनाचे विश्लेषण करताना महानुभावांपासून रामदासांपर्यंत संतांच्या रचनेमधील स्त्री जीवनाच्या दर्शनामधून त्या वेळचे समाजजीवन व्यक्त होते, असे डॉ. अंजली कान्हेरे यांनी प्रतिपादन केले

**१० ऑगस्ट** **शंकर पाटील पारितोषिक वितरण**

श्री. रंगनाथ पठारे यांच्या 'टोकदार सावलीचे वर्तमान' या कादंबरीस शंकर पाटील पारितोषिक डॉ. भालचंद्र फडके यांच्या हस्ते देण्यात आले. परीक्षकांच्या वतीने वसुधा माने यांनी पुस्तकाविषयी मनोगत व्यक्त केले. कार्यक्रमाचे प्रास्ताविक कार्यवाह कल्याणी दिवेकर यांनी केले.



अनुक्रमणिका

**१९ ऑगस्ट** **कै. पु. भा. भावे स्मृतिदिन**

वक्ते : डॉ. न. म. जोशी.

विषय : पु. भा. भावे यांच्या जीवननिष्ठा.

दरवर्षीप्रमाणे पु. भा. भावे स्मारक समितीच्या सहकार्याने पु. भा. भावे स्मृतिदिनाचा कार्यक्रम पार पडला. विद्यापीटात पहिल्या आलेल्या विद्यार्थ्यांचा सत्कार तसेच रोख पुरस्कार आणि निबंधस्पर्धेसाठी निवड झालेल्या विद्यार्थ्यांना पारितोपिके प्रदान करण्यात आली. डॉ. न. म. जोशी यांचे "भाव्यांच्या जीवननिष्ठा" या विषयावर भाषण झाल्यानंतर डॉ. उत्कर्षा नाईक यांनी रंजनात्मक कार्यक्रम सादर केला.

**कार्याध्यक्षांची भेट**

म.सा.परिपदेचे कार्याध्यक्ष डॉ. म. वि. गोखले यांनी ठाणे, डोंबिवले आणि कल्याण या शाखांच्या कार्यकर्त्यांशी विचारविनिमय करण्यासाठी मुद्दाम भेट दिली.

**वारामती शाखेचा शुभारंभ**

'सुसंगती सदा घडो सुजनवाक्य कानी पडो', अशी आपल्या केकावलीमधून आकांक्षा व्यक्त करणाऱ्या कविवर्य मोरोपंतांच्या बारामतीचा अलीकडे सर्वांगीण विकास झाला आहे. परंतु आजवर तेथे महाराष्ट्र साहित्य परिपदेची शाखा अस्तित्वात नव्हती. मोरोपंतांच्या या कर्मभूमीत बुधवार दि. १९ ऑगस्ट रोजी सायंकाळी ६ ॥ वाजता श्री. आप्पासाहेब पवार यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या समारंभात म.सा.परिषदेच्या शाखेचा शुभारंभ करण्यात आला. श्री. संदीप सुभेदार, अनंत सुमंत, अनिल गलांडे, अवधूत कुलकर्णी प्रभृतींनी या शाखेच्या निर्मितीसाठी परिश्रम घेतलेले जाणवत होते. महाराष्ट्र साहित्य परिपदेच्या कार्याची माहिती कार्याध्यक्ष डॉ. म.वि. गोखले यांना विशद करून सांगितली. त्याचप्रमाणे साहित्य चळवळीमागील सामाजिक प्रेरणांचा आढावा श्री. रवींद्र भट यांनी आपल्या भाषणात घेतला. नगरपालिकेच्या उपाध्यक्षा श्रीमती शहा यांनी शाखेला सर्व सहकार्य देण्याचे आश्वासन दिले.

**रवींद्र भट**
कार्यवाह



अनुक्रमणिका

# शाखा कार्यवृत्त

**कोल्हापूर**

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कोल्हापूर शाखेची वार्षिक सर्वसाधारण सभा प्रा. पां. ना. कुलकर्णी यांच्या अध्यक्षतेखाली झाली. सभेत पुढील तीन वर्षासाठी बिनविरोध आलेल्या कार्यकारी मंडळाची नावे निर्वाचन अधिकारी प्रा. म. अ. कुलकर्णी यांनी जाहीर केली. कार्याध्यक्ष : प्रा. भैरव कुंभार, कोपाध्यक्ष : ॲड शशिकांत आडिव्रेकर, सदस्यः शिवशंकर उपासे, प्रा. नन्दा कदम, डॉ. प्रकाश कुंभार, श्रीपाद गोसावी, डॉ. रमेश जाधव, विनायक दिवाण, मधुकर पातकर व राजीव वावळे. निरीक्षक म्हणून परिषदेचे प्रतिनिधी पाटलोबा पाटील उपस्थित होते.

प्रा. म. अ. कुलकर्णी, पाटलोबा पाटील, डॉ. जयंत कळके, डॉ. विभा शहा, डॉ. शिवराम माळी, रजनी हिरळीकर, वसंत निगवेकर, दिलीप भाटवडेकर यांनी चर्चेत भाग घेऊन नवीन कार्यकारी मंडळाचे अभिनंदन केले.

सभासदांनी व्यक्त केलेल्या विश्वासास पात्र राहून, सर्वांच्या सहकार्याने शाखेचे कार्य यशस्वी करून दाखवू, असे सांगून कार्याध्यक्ष भैरव कुंभार यांनी कार्यकारी मंडळ बिनविरोध निवडून दिल्याबद्दल सभासदांना धन्यवाद दिले व कृतज्ञता व्यक्त केली. कोपाध्यक्ष शशिकांत आडिवरेकर यांनी मावळत्या कार्यकारी मंडळाच्या आभाराचा ठराव मांडला.

सभेचे अध्यक्ष पां. ना. कुलकर्णी यांनी ६५ वे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन कोल्हापूरच्या लौकिकाला साजेसे यशस्वी केल्याबद्दल सर्वांना धन्यवाद देऊन सभेला मार्गदर्शन केले.

प्रारंभी दिवंगत साहित्यिकांना श्रद्धांजली वाहिल्यानंतर मंदा खांडेकर यांनी प्रास्ताविक केले..भैरव कुंभार यांनी अहवाल सादर केला. महाडेश्वर यांनी जमाखर्च मांडला. मधुमालती कोटीभास्कर यांनी आभार मानले.

प्रा. भैरव कुंभार.

**मालेगाव**

म.सा.प.च्या मालेगाव शाखेची सर्वसाधारण सभा दि. २२ मे ९२ रोजी झाली. त्यात कार्यकारिणी सभासद व शाखेचे पदाधिकारी खालीलप्रमाणे नियुक्त केले गेले :

**अध्यक्ष :** प्रा. द. बा. कुलकर्णी

**उपाध्यक्ष :** प्रा. श्रीमती तापाबाई पवार

**कार्याध्यक्ष :** प्रा. डॉ. र. रा. गोसावी

**कोषाध्यक्षा :** सौ. शोभा वडवे

**कार्यवाह :** श्री. प्रा. सुधाकर पगार, श्री. कमलाकर देसले.

**कार्यकारी मंडळ सदस्य :** प्रा. सौ. वीणा गोसावी, प्रा. रामदास मोरे, प्रा. बा. म. डोळे, प्रा. डॉ. उत्तमराव धोंगडे, प्रा. सौ. पद्मा वाव्हळ, प्रा. सौ. शशिकला पवार- केदार, प्रा. सुभाष वाडेकर, डॉ. दिलीप भामरे, श्री. संजय भोसले, श्री. विजय सोनावणे, श्री. अशोक देशमुख

सुधाकर पगार

**डोंबिवली**

१-१०-९२ पासून अमलात आलेल्या घटनेनुसार १९९२-९५ कालावधीसाठी पदाधिकारी व कार्यकारी मंडळाची निवड दि. २९ मार्च ९२ रोजी डोंबिवली येथील आजीव सभासदांच्या बैठकीत झाली. डोंबिवली शाखेच्या कार्यकारी मंडळाचे सभासद खालीलप्रमाणे निवडले गेले.

**कार्याध्यक्ष :** श्री. रवींद्र आवटी

**कोषाध्यक्ष :** श्री. अरुण खाडिलकर

**कार्यवाह :** श्री. मधुकर देशपांडे, सौ. मंगला देशपांडे.

**सदस्य :** सर्वश्री बाबा देवस्थळी, अनिल संत, वसंत खानवेलकर, श्रीराम शिधये, शिल्पा जोशी, मेघना कुलकर्णी, शिल्पा शहा, कौमुदी भट, सुहासिनी बापट.

नवीन निवडून आलेल्या कार्यकारी मंडळाची त्याच दिवशी बैठक झाली. अध्यक्ष व दोन उपाध्यक्षांची निवड बहुमताने खालीलप्रमाणे करण्यात आली.

**अध्यक्ष :** श्री. दिलीप महाजन.

**उपाध्यक्ष :** श्री. रविप्रकाश कुलकर्णी, सौ. स्मिता तळेकर.

सभेच्या सुरुवातीस श्री. रणजीत देसाई व प्रा. शरदचंद्र चिरमुले यांना २ मिनिटे स्तब्धता पाळून श्रद्धांजली वाहण्यात आली.

मधुकर देशपांडे.



अनुक्रमणिका

सहकार्यवाह प्रा. सुधाकर कुऱ्हाडे यांनी आभार मानले. सत्कारसमारंभाला सनई-चौघड्याच्या मंगलस्वरांची पार्श्वभूमी आणि नगरपालिकेचे भव्य सभागृह यामुळे अधिकच गोडवा आला.

कार्यक्रमाचे सूत्रसंचालन प्रा. डॉ. सु. प्र. कुलकर्णी यांनी केले.

दरवर्षीप्रमाणे ह्या वर्षीही म.सा.प शाखा अ'नगरने कै. ग.ल. ठोकळ स्मृतिदिन पाळला. हा कार्यक्रम दि. २२ जुलै १९९२ रोजी संबोधी महाविद्यालयात संध्याकाळी ६ वाजता घेण्यात आला. प्रमुख वक्ते प्रा. डॉ. सु. प्र. कुलकर्णी यांनी 'कै. ग.ल. ठोकळ यांची ग्रामीण कविता' ह्या विषयावर व्याख्यान दिले.

तसेच नगरमधील २२ कवींनी स्वरचित ग्रामीण कवितांचे वाचन केले. प्रास्ताविक कार्यवाह चंद्रकांत पालवे यांनी केले, तर कार्यक्रमाचे अध्यक्ष प्रा. जवाहर मुथा हे होते. आभारप्रदर्शन प्रा. मेधा काळे यांनी केले. तसेच कार्याध्यक्ष अर्जुनराव सदाफुले यांनी समारोप केला. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन प्रा. दीपक शिंदे यांनी केले. ह्या कार्यक्रमाला श्री. भास्करराव डिक्कर, श्री. डी. एम. कांबळे श्री. भोंजाळ इत्यादी प्रतिष्ठित व्यक्ती उपस्थित होत्या.

चंद्रकांत पालवे

---

## साभार स्वीकार

**तीन रंगांचे इंद्रधनुष्य**– गोविंद कुलकर्णी, स्वयंप्रभा प्रकाशन, 'चाफा' एन.डी. ४, सिडको, नांदेड– ४३१६०३, पृष्ठे ७२, साठ रुपये.

**पापणीच्या काठावर**– श्री. त्र्यं. आठल्ये, डॉ. म. प. पेठे, श्री ५७ मुकुंदनगर, पुणे– ३७, पृष्ठे ५९, वीस रुपये.

**शरच्चंद्र**– रमानंदन, भ. ना. चापेकर, १५७५/अ, सदाशिव पेठ, पुणे– ३०, पृष्ठे ३२७, एकशे पन्नास रुपये.

**बुजगावनं**– उत्तम बावस्कर, आनंद प्रकाशन, जयसिंगपुरा, औरंगाबाद, पृष्ठे ८७, सतरा रुपये.

**मुक्त कैदी**– पी. बी. गुरव, परिमल प्रकाशन, परिमल, खडकेश्वर, औरंगाबाद– ४३१००१, पृष्ठे १०४, चाळीस रुपये.

**भोवरा**– पी. बी. गुरव, आरती प्रकाशन, बी/१२, आसावरी, गुप्ते रोड, डोंबिवली, (प.) पृष्ठे १२८, बावीस रुपये.

**श्री वासुदेव महाराज**– डॉ. भीमाशंकर देशपांडे, देशपांडे साहित्य संशोधन आळंद, पृष्ठे १२, चार रुपये.

**पार्थिव पूजा विज्ञान आणि विधान**– डॉ. भीमाशंकर देशपांडे, देशपांडे साहित्य संशोधन, आळंदी, पृष्ठे २४, पाच रुपये.

**शिवाजीच्या हिंदवी स्वराज्याचे खरे शत्रू कोण– महंमदी की ब्राह्मणी?** – शरद पाटील, सत्यशोधक मार्क्सवादी प्रकाशन, पृष्ठे ४८, वीस रुपये.

**उन्हातलं झाड**– भगवान भोईर, स्वप्नील प्रकाशन, द्वारा प्रा. भगवान भोईर, बी. एन. एन. कॉलेज भिवंडी जि. ठाणे– ४२१३०५, पृष्ठे ४५, पंचवीस रुपये.

**काश्मीर– धुमसते बर्फ**– जगमोहन अनुवाद मो. ग. तपस्वी, मोरया प्रकाशन, 'संपदा', शास्त्रीनगर, नगरपालिका दवाखान्याजवळ, डोंबिवली (प)– ४२१२०२, पृष्ठे ६०८, एकशेसाठ रुपये.

**फुलांचे गाव**– विलास मोहिते, इंद्रजित प्रकाशन, सी-२१, त्रिमूर्ती, रुक्मिणीनगर, कराड (जि. सातारा– ४१५ ११०, पृष्ठे– ११२, पन्नास रुपये.

**अल्प सेवा**– मधुकर गोगटे, सतीश भिडे, श्री. राजमुद्रा मुद्रणालय, प्रभादेवी, मुंबई– ४०००२५, पृष्ठे ७८, तीस रुपये.

**भास्कर स्मरणिका**– वा. भा. जोशी, सचिव, हिंगणे, स्त्रीशिक्षण संस्था, कर्वेनगर, पुणे– ५२, पृष्ठे ५६.

**लोकहित मे ९२**– संपादक, जयवंत गुजर, मधु नेने कार्यवाह, वसंत व्याख्यानमाला, अमृत महोत्सव व टिळक स्मारक संस्था, हीरक महोत्सव, संयुक्त स्मारक समिती, वाई, पृष्ठे १३२, पंचवीस रुपये.

**मुलाम्याचं नाणं**– डॉ. दिनकर गायकवाड, ग्रामस्थ मंडळ पिसुर्टी, पृष्ठे ७१, पंचवीस रुपये.

**तोल**– प्रा. श्रीमती गवळण कलकत्ते, 'श्री' प्रकाशन, दौंड, जि. पुणे, पृष्ठे ११८, पन्नास रुपये.

**स्पंदन**– रोहिदास वाघमारे, शलाका प्रकाशन, मुंबई– ५८, पृष्ठे ५२, पंधरा रुपये.

**प्राचीन मराठी हस्तलिखिते : संशोधन आणि संपादन**– डॉ. श्री. रं. कुलकर्णी, का. स. वाणी, मराठी प्रगत अध्ययन संस्था, उन्नतीनगर, देवपूर धुळे– ४२४००२, पृष्ठे २४३, शंभर रुपये.

**तापीतीर**– गणेश कुडे, का. स. वाणी मराठी प्रगत अध्ययन संस्था, उन्नतीनगर, देवपूर, धुळे, पृष्ठे– ७५, चाळीस रुपये.

**दिशांताची वाट**– प्रमोद म. कोपर्डे, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठे १२९, चाळीस रुपये.

**देवाचिये द्वारी**– डॉ. सौ. सुहास बाळदेव, देवघर प्रकाशन, 'देवघर', हिंदुस्थान कॉलनी,

अमरावती रोड, नागपूर- १०, पृष्ठे ९९, पन्नास रुपये.

**आम्ही काबाडाचे धनी-** इंद्रजित भालेराव, मंगला हवालदार, बी रघुनाथ प्रकाशन परभणी, पृष्ठे ६४, वीस रुपये.

**बिलोरी-** चित्रा रविकिरण, रविकिरण प्रकाशन, नाशिक, ८ ब, वनविहार कॉलनी, सातपूर, नाशिक-४२२००७, पृष्ठे ७२, चाळीस रुपये.

□

# प्रा. ग. प्र. प्रधान यांनी म.सा. परिषदेला भेट दिलेली पुस्तके

## साहित्य अकादमीची प्रकाशने

**फाउस्ट**– जर्मन महाकवी गटे, विंदा करंदीकर, पृष्ठे १९१, वीस रुपये.

**भारतीय साहित्याचे निर्माते बा. भ. बोरकर**– प्रभा गणोरकर, पृष्ठे ११२, पंधरा रुपये.

**बंकिमचंद्र चतर्जी**– सुबोधचंद्र सेनगुप्त, श्री. बा. जोशी, पृष्ठे ७७, पंधरा रुपये.

**चेम्मीन**– तकसी शिवशंकर पिल्लै, प्रमोद जोशी, पृष्ठे १८८, तीस रुपये.

**सात शिखरे**– अख्तर मुहिउद्दीन, दत्ता भगत, पृष्ठे ४४, दहा रुपये.

**तृणपर्णे**– वॉल्ट व्हिटमन, सदानंद रेगे, पृष्ठे १८१, पंधरा रुपये.

**दत्तकवी**– अनुराधा पोतदार, पृष्ठे ७०, पंधरा रुपये.

**माधव ज्यूलियन**– सु. रा. चुनेकर, पृष्ठे ९८, पंधरा रुपये.

**नाट्याचार्य खाडिलकर**– नारायण कृष्ण शनवारे, पृष्ठे ८६, पंधरा रुपये.

**भारतीय इंग्रजी साहित्याचा इतिहास**– मधुकर कृ. नाईक, पृष्ठे ३७१, पन्नास रुपये.

**सार्थवाह**– डॉ. मोतीचंद्र, मा. कृ. पारधी, पृष्ठे २८७, वीस रुपये.

**कन्नड साहित्याचा इतिहास**– रं. श्री. मुगळी, गौरीश कायकिणी, पृष्ठे २७८, चाळीस रुपये.

**अलबेरुनीचा भारत खंड पहिला**– अलबेरूनी, यू. म. पठाण, पृष्ठे १७७, तीस रुपये.

**सहा विघे जमीन**– फकीर मोहन सेनापती, उमाकांत ठोमरे, पृष्ठे २११, पंचवीस रुपये.

**विषकन्यका**– एस. के. पोट्टेकाट्ट, धनश्री हळबे, पृष्ठे १७८, तीस रुपये.

**जा ओलांडुनी**– सन्तेशिवरा लिंगण्णैया भैरप्पा, सौ. उमा कुलकर्णी, पृष्ठे ४३९, शंभर रुपये.

**राजवाडे लेखसंग्रह**– संपादक तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, पृष्ठे ३०६, शंभर रुपये.

**समर्थ रामदास विवेकदर्शन**– संपादक वि. रा. करंदीकर, पृष्ठे २३१, तीस रुपये.

**निवडक ना. सी. फडके**– संपादक, इंदिरा संत, प्रल्हाद वडेर, पृष्ठे २८०, साठ रुपये.

**निवडक सिंधी कथा**– संपादक गोविंद माल्ही कला रीझसिंघाणी, डॉ. सविता जाजोदिया, पृष्ठे २०९, वीस रुपये.

**गुजराती साहित्याचा इतिहास**– मनसुखलाल झव्हेरी, जयंत र. जोशी, पृष्ठे ३२७, पंचेचाळीस रुपये.

**स्वातंत्र्यसंग्रामाचे महाभारत**– ग. प्र. प्रधान, साधना प्रकाशन, पृष्ठे ४५६, एकशे पन्नास रुपये.

**साने गुरुजींची जीवनगाथा**– राजा मंगळवेढेकर, साधना प्रकाशन, पृष्ठे ४०८, एकशेपन्नास रुपये.



**श्रीमती आनंदीबाई शिर्के**

जन्म : ३ जून १८९२ निधन : ३१ ऑक्टोबर १९८६

जळगाव येथे १९३६ मध्ये भरलेल्या
अ. भा. मराठी साहित्य संमेलनाच्या स्वागताध्यक्षा

अनुक्रमणिका




